

* ॐ श्री जय गजानन *

# कशापासोनि जग झाले..

-लेखिका-

* रामवेणा *



* मैत्रेयी प्रकाशन *







● प्रकाशक - मैत्रेयी प्रकाशन
फ्लॅट क्र. ९, राठी संकुल, मालवीय चौक, पंचवटी, नाशिक-४२२००३. मोबाईल- ९८५०४३४५५७-९८२२६६०९७६

● मुद्रक - श्री. राहुल मारुलकर
मंदार प्रिंटर्स, ७५६, कसबा पेठ, पुणे - ११

● प्रथमावृत्ति- श्रीश्रीगजाननमहाराज प्रगटदिनोत्सव शुक्रवासरे- श्रीमाघवद्य सप्तमीदिने-तथा ५.२.२०१०. प्रथमावृत्ती प्रकाशनपुर्वच समाप्त.
द्वितीयावृत्ती- श्रीश्रीदासनवमी रविवासरे- श्रीमाघवद्य नवमीदिने- तथा ७.२.२०१०

● मुखपृष्ठ - श्रीप्रेरणा-मैत्रेयी

● श्रीप्रसाद मुल्य - ३००/- रु.



---

## -श्रीश्री चरणवंदना-



श्रीश्रीश्री समर्थ हृदय..

जयजयाजी ज्ञानबोधा..

महाबली प्राणनाथा..

श्रीश्रीगजानन महाराज..

श्रीराम श्रीतात..

वेणी अंतःकरण -

---



## -श्रीश्री समर्पण-

राम लोचनी राम हृदयी..राम राम अंतःकरणी..

रामचरण रामशरण..राम राम अंतःस्फुर्ती..

रामगणेश रामशारदा..राम राम एकैकाक्षर..

रामवेणा दासवेणा..रामदास तियेचा राम..

-इति वेणीराम

---







## * श्रीश्री ग्रंथराज दासबोधाचा मुळारंभ *

---

कशापासोनि जग झाले..



आजही पांडव पाचच आहेत
नी संख्येने कौरव शंभर
लक्षात ठेवा..
हिंसेची मानसिक ताकद शून्य असते
नी अहिंसक मनाला हजार हत्तींचे बळ असते..
उठा..संघटित व्हा.. एक व्हा
आज भारतभूला गरज आहे
कुरुक्षेत्रावरील युद्धाची नव्हे तर
भगवद्गीतेच्या प्रगटीकरणाची......









..श्रीराजाधिराज रामचंद्र भगवान..





..श्रीश्रीमन् महादेव..



..श्रीश्रीज्ञानेश्वर भगवान..



कशापासोनि जग झाले..

...श्रीजगत्त्रयी...

..श्रीदिग्धिपति श्रीहनुमंतस्वामि महाराज..









..श्रीमहद्भूत श्रीरामप्रागट्य

श्रीश्रीरामदासस्वामिमहाराज..





..श्रीश्रीकोदंडधारिण श्रीरामवेला स्थली

श्रीश्रीमद् समर्थ सद्गुरु श्रीश्रीगजानन महाराज..

कशापासोनि जग झाले..



उत्खननात अचानक..सापडली श्रद्धा..
म्हणे...मला बाहेर काढू नका
उपयोग नाही कोरड्या जगतात
मी नी भक्ती आत सुखात-
थोडे गेलो पुढे..निष्ठा नी दृढता,
तळ्यात उभ्या शांत..म्हणे पाणी उपसू नका..
विवेक..विचार..सद्वर्तन..साऱ्यांनी दार लावून घेतलं-
ग्रंथांमधुन आमचं अस्तित्व..जाणलं तर होईल सोनं..
राहू दे आम्हाला असेच..मातीच्या पोटात
उघड्या बोडक्या उजाड शहरात
उंच इमारती नी..वाहनांच्या ताफ्यात..झकपक झगमग..
त्यात हवी कुणाला..निरांजनाची वात??
माणुस शोधून मिळत नाही..भावना जपून कुणी जगत नाही
कोरडे व्यवहार ओलावा शून्य..जगण्यापेक्षा मरणच बरं..
हसलं कुणीसं..क..काय झालं..मृतांच्या जगतात..चैतन्य फसलं....

---

## ..चालिली चालिली श्रीरामकथा ब्रह्मांड भेदोन चालिली..

हे पुस्तक हाती देतांना अत्यंत आनंद होत आहे. असे नेहमीच्या साच्यातील लिहावेसेच वाटत नाही. आज हृदयीचे सांगावे वाटते आहे. आपणही ते हृदयपूर्वकचि घ्यावे ऐसी पदी विदिता जी. **वेणीसी श्रीसमर्थ आज्ञा, 'रामकथा ब्रह्मांडा भेदोन पैलां न्यावी..वेणीये जीव सान. श्रीस्वामिन्कीर्तीमहान. परी श्रीस्वामीकृपे मनन राखियेले वेणाने'.** नी आज तो योग सर्वांसमक्ष सम्मुखे आला..चालिली चालिली रामकथा ब्रह्मांड भेदोन चालिली...त्रैलोक्य चालिल्या फौजा..सौख्यबंध विमोचने..मोहीम मांडीली मोठी..मोठ्या मोहीमेचे हे भारतवर्ष. हे रामराज्य. सत्याचा शोध घेणारे कोण आहे..कोण जागे आहे शोधा, सत्य शोधा. असे आईसाहेब आपणांस कोजागिरीच्या वेळी जागवितात. नी आपले स्मरणसूत्र त्याजागी जोडू इच्छीतात, जेथून आपणांस स्वरुपाचाच विसर पडीला. त्याच विस्मरणास सजग-सावधान करण्याकरीता श्रीस्वामिन् आज्ञेकरोन, **'कशापासोनी जग झाले..'** ही ग्रंथ ब्रह्मांडरचना जाली.

'वेणीसी आज्ञा ऐसी, रामकथा ब्रह्मांड भेदोन पैलां न्यावी..' वेणीसुत्रस्मरणी अखंड ज्योती तेवती. अर्हरात्र अर्हदिनी जन्मसुत्र स्वामिन् चरणी चिरंजीवा. वेणीये जीवन श्रीरामदासचरण..तेथ अमुप तिर्थे क्षाळणा करीती. जैसा स्वामिन् सांगावा तैसाचि आपुले चरणी ठेवियेला. श्रुति वोपियेला. हृदयी कथिला. श्रीगजानने वेणिये करी दिधली ही ग्रं सूत्री. श्रीमहाबली हनुमंतराये आज्ञापविती वेणिसी ही सूत्री. स्वामिन् हृदयी ब्रह्मपट. आपणांसाठी अपार उदक. तीर्थी बुंथी घेवोनिया सखोल, क्षाळणा करावी अनंतजन्मींची. स्वामिन् हृदयीचे सुत्रकल्लोळे जेथ ग्रहणे नाहीचि. रामरुपी अंतरात्मा..वेणीये भर्वसा. रामरुपी अंतरात्मा असितो कैसा, देखियेला.

हे सारे श्रीसमर्थांनी कैसे आज्ञापविले..हा सारा अतिशय हृदयंगम प्रवास आहे. अनंतजन्मांची ती सूत्ररचना आहे. नी महाबलीश्रीहनुमंतस्वामिमहाराज-श्रीसमर्थरामदासस्वामिमहाराज-

श्रीसद्गुरुगजाननमहाराज यांचिये कृपेचे सूत्र अखंड हृदयात धरोन वेणा ज्योति या पृथेस तयांनीचि लावियेली आहे. **अशा त्या श्रीमद्ग्रंथराज दासबोधाचा ग्रंथारंभ श्रीसमर्थांनी ज्या 'ग्रं' या अक्षराने केला, केवळ त्याच 'ग्रं' या एका अक्षराची उकल या ग्रंथात करण्यात आली आहे. आजपर्यंत अगम्य असलेले ते श्रीज्ञानभांडार जीवावरील प्रेमाकरीता केवळ श्रीसमर्थांनी येथे लुटविले आहे.** आपण संक्रातीला जसे तिळगुळ लुटीतो तसे श्रींनी जीवावर संक्रात येउ नये म्हणोन हा श्रीराममेवा लुटविला आहे. अशाश्वतातून शाश्वताकडे आपण जावे हे तो श्रीगजाननमहाराजांचे जीवासी सांगणे आहे. हा सारा संवादस्वरुपी वाहिलेला ग्रंथ आहे. त्यासी आपणही संवादीतेच व्हावयाचे आहे. पथ्य एकच, हा संवाद आत्मा नी परमात्मा यांचेमधील आहे. त्यात मी ने मधे यावयाचे नाही. तरच या ग्रंथाची उकल स्पष्ट होणार आहे. आपणांस आजतागायत अज्ञात असलेल्या कितीतरी सूत्रांवरील पट या ग्रंथाने उकलणार आहेत. आपणांस या ग्रंथाच्या एकैकाक्षर दालानातून फिरतांना श्रीसमर्थ हृदयाचीच ओळख होणार आहे. नी आपल्याही ग्रं च्या गाठी उकलून तो गलबला निवारण होणार आहे. येथे ही सारी ग्रं सूत्रपट रचना श्रीसमर्थांनी उलगडीली आहे. हे स्वर्गपैलचे ज्ञान आहे. कारण ही श्रीरामकथा आहे. हिसच तर ब्रह्मांड भेदोन न्यावयाची आहे नां. नी आपण सारे त्या श्रीरामकथेतील अक्षरे आहोत. प्रत्येकाच्या वाट्यास श्रीरामकथेतील एकैकाक्षर आलेले आहे. त्या एकैकाक्षरात किती राम आहे. कुठे श्रीराम आहे. कसा श्रीराम आहे. या साऱ्याचा शोध-संशोधन जीवाचे झाले पाहिजे. हा ग्रंथ आपणांस स्वशोधाकडे-संशोधनाकडे वळवित आहे. श्रीसमर्थांची जीवावर अनन्यकृपा की तयांनी हे ब्रह्मांडीचे वैभव आपणांसाठी दिधले. हा ग्रंथ जो आपणांसमोर येत आहे, यास एक महावस्त्र समजावे नी या वस्त्राची घडी उलगडावयास घ्यावी. श्रींबरोबर हे वस्त्र लेवून एकेका दालनातून आपणही जीवनमुक्तावस्थेचा आनंद घेत घेत विहारावयाचे आहे. या ग्रंथातील भाषा ही श्रीसमर्थांची त्यावेळीची भाषा आहे. आता आपण आपल्या

भाषेचे सपाटीकरण केलेले आहे. त्यामुळे ही भाषा आपणांस थोडा विस्मय निर्माण करील. परंतु जेव्हा एकेक दालन आपणांस ज्ञानाने समृद्ध करीत जाईल तेव्हा आपण, ही भाषा-ही अक्षरे या साऱ्यातून बाहेर पडून मुग्धावस्थेत प्रवेशिणार आहोत. नी श्रीस्वामिन्‌चरणी अनन्यभाव समर्पिते होणार आहोत.

'कशापासोनी जग झाले' हा खरेतर प्रश्न नाही. फक्त उत्तराकडे आपले लक्षच गेले नाही अजूनी. स्वरुपी जाग आल्यावर जो मुक्तीचा सोहळा आपणांस लाभणार आहे..त्या त्या 'रामोच्छ्वाकरीताच' खरेतर आपण सारे धरेवरी आलो आहोत. श्रीकपिवर आपणांस श्रीरामरायांचे चरणी वोपिणारच आहेत. आपण मात्र या ग्रं मधून या श्रीत्रयिंची अनन्यसेवा करुन आपले देहक्षेत्र धन्य करवून घ्यावयाचे आहे. केवळ अभ्यासावयाचे हे पुस्तक नसून जयाचा ध्यासचि घ्यावा अशी ही आपुली सर्व श्रीराम बांधवांचि ग्रं बीज धारणा आहे. आता इये फलिचा रसस्वादु चाखिण्या इये अंतरंगी रंगावे..

श्रीमद्‌महावज्रमहाबलीअंजनीकुमार-
जयजयजय...
श्रीश्रीवैभववेलाश्रीमद्‌रामदासस्वामिमहाराज-
जयजयजय...
श्रीश्रीमहद्‌भूतरामवेलावेणीमुख्यप्राणश्रीसमर्थसद्‌गुरु
श्रीगजाननमहाराज-जयजयकारे दुमदुमविले दुदुंभीने अभयांतरे...



जय गजानन..






## ..श्रीश्रीगदेश्वरी श्रीहनुमंत कुळवल्ली..



कशापासोनि जग झाले..

## + नमो कोदंडधारी श्रीरामरायांचे अंतःहृदय +

वीररसाच्या भारतात मानवताधर्म संरक्षणासाठी युद्धे झाली, परंतु श्रीरामदासस्वामीसमर्थांना सौख्यबंध विमोचनासाठी चालिलेल्या फौजा हव्या आहेत. सर्व सुखप्राप्ती-सच्चिदानंद प्राप्ती जयांस उमगली आहे, असा फौजफाटा. एकेक माणूस हा सैन्यदलाच्या शक्तीचाच. पण हे सारे कसे तर, श्रीसमर्थ जसे राहिले तसे. निःशस्त्र-निर्भय-शांत-तेजस्वी-ब्रह्मपालनानेयुक्त-स्वधर्मचे प्रणेते-जाणते-कर्ते असे. तो अंतस्थधर्म जागविणारे-प्रेमळ-जाणिव-विवेक-ज्ञानाने परिपूर्ण अशा अंतःकरणाचे हवेत. असे एकएक अंतःकरण हवे. असे एकएक मनगट हवे. युद्धाने प्रश्न सुटत नसतात, तर कायमस्वरुपी एकमेकांत-परस्परांत तेढ निर्माण करतात. नी मग एकुण साऱ्यांनाच-या पृथ्वीवरीलच साऱ्यांना कायम एका शीतयुद्धाच्या वातावरणातच रहावे-वावरावे लागते. 'जाणिव' हे एक असे रसायन आहे की ते प्राप्त झाल्याने स्वतःसच स्वतःचा शोध लागणार आहे. नी स्वतःचा शोध म्हणिजे काय? तर, श्रीपरमईश्वर-परमशक्तीमान अशा त्या श्रीमध्ये नी आपणांत काहीही अंतर नाही. भेद नाही. कमी-उणीव नाही. म्हणिजेच श्रीभगवंत नी आपण यात भेद नाही-अंतर नाही. तो नी तू एकच, हा शोध. हाच अंतिम शोध. श्रीश्रीगजानन महाराज म्हणतात, त्याप्रमाणे तुम्ही आम्ही भेद तेथ, नाही उरला यत्किंचित एवढे एकरुप. एवढी ऐक्यता. एवढे साम्य. नी एकदा हे रहस्य जीवास कळल्यावर मग मिळवावयाचे ते काय? मग शत्रु नाही-सत्ता-स्पर्धा-चढाओढ-वैर-सूड-प्रतिशोध-युद्ध-रक्तपात सारेच शून्य होऊन जाईल. शून्य ठरेल. हे सारे जाणणाऱ्या-जाणून घेतलेल्या-सर्वत्रांची जाणिव राखणाऱ्या अशा 'फौजा'. म्हणिजेच अशी मने-अशी अंतःकरणे होय. नी अशी अंतःकरणे-अशी मने कशाने तयार होतील? कशी तयार होतील?हेच सारे श्रीसमर्थांनी त्यांच्या श्रीमद्ग्रंथराज दासबोधात उदधृत केले आहे. श्री या ग्रंथाविषयी जीवास सांगतात, माझे स्वरुप स्वतःसिद्ध तो हा ग्रंथ

दासबोध. अशी या ग्रंथराजातील श्रीसमर्थांची वाक्ये-अक्षरे-काना-मात्रा-वेलांटी-दंड-अकार-उकार-मकार-रफार-जोडाक्षरे-अनुस्वार-सारी संकेतचिन्हे ही अत्यंत गूढ-रम्य-परिपूर्ण-ज्ञानाने भरलेली आहेत. ती सारीच्यासारी जशीच्यातशी समजून घ्यावयाची तर एक जन्म कमीच वाटेल. एक जन्म कमीच पडेल. परंतु या साऱ्या अक्षर संकेतांचा वापर श्रीसमर्थांनी जीवाच्या सौभाग्यासाठी नी त्रैलोक्यसुखासाठीच केलेला आहे. तो समजून घेणे हे जीवाचे प्रधान कार्य आहे. त्यातूनच मग आपणांसाठी मोक्ष-मुक्तीची उपवने. भक्ती-शक्तीची सरोवरे. श्रद्धा-निष्ठेच्या पर्वतरांगा. जाणिव-विवेकाचे चंद्र-सूर्य. सेवेचें तारांगण. परिपूर्ण परिपक्वतेची लव्हाळी. ज्ञानबोधाची वृक्षराजी. स्मरणानंदाची वसुंधरा. दास्य-सख्य सरीता. प्रेमाचे अनंत ब्रह्मांड. अर्चन-वंदनाचे निर्झर. श्रवण-किर्तनाचे सागर. चरणसेवेचे घाट-काठ. सेवाभावाची पहाट. त्यागाची जाग. निःस्पृहाचा दिवस. यशाचा मेरु. सौभाग्याचा कळस नी श्रीरामरायांचे चरणसौख्य प्राप्त होणार आहे. नी तद्नंतर जनीजनार्दनाच्या सेवेची कुसुमे. नी देह त्यागिता किर्ती मागे उरावी ही फलप्राप्ती. एका अक्षरात-एकेका संकेतचिन्हात केवळ यश-किर्ती-प्रताप भरलेला आहे. श्रीराम कर्ता..असे ते सुखकर्ता दुःखहर्ता रुप आपण जाणून घेणेच खूप महत्वाचे नी आवश्यक असे आहे. नी तेवढेच आपणांकडून होतांना दिसत नाही. अध्यात्म म्हंटले की आपणांस एक भिती असते, की आपल्या हातून काही चुकते की काय? चुकले तर काय? परंतु श्रीसमर्थ येथेच आपली ती भिती काढून टाकीत आहेत. नी आपण नक्की काय करायला हवे, तेच आपणांस या पुस्तकातून उलगडून सांगणार आहेत. ग्रंथ वाचावयाचे ते, निजकाज जाणण्याकरीता. तो संदेश श्रीसमर्थांनी यातून पेरुनच ठेविला आहे. आपण फक्त 'कृषिकर्म' करावयाचे आहे. थोडक्यात आपण शेतकरी व्हावयाचे आहे. त्यात मात्र हयगय करता कामा नये. कृषिवल हा मुख्य-अन्नदाता जगाचा. हे आपण जाणिले पाहिजे. काय पेरिले म्हणिजे काय उगवेल? कीती पेरावे-कसे पेरावे-काय पेरावे-कधी पेरावे, म्हणिजे हवे तसे उगवेल? कोणी पेरावे-कोणाचे हात त्या श्रीपेरणीस लागावे? कोणाचे उपयोगात ते सारे येईल? पेरलेले

मनासारीखे उगवेल नां?माती-जमिन-सिंचन-रोपणी-लावणी-मिळणी-तोडणी-खुडणी-पाखडणी-जोडणी, हे सारेचसारे आपणांसही उमगले पाहिजे. श्री जेव्हा म्हणतात, ग्रंथराज दासबोध..माझे स्वरुप स्वतःसिद्ध. तर मग या श्रीमद् दासबोध ग्रंथराजाची आपण किती बरे सेवा केली पाहिजे. अक्षर नी अक्षर जर श्री आहेत. बिंदु नी अनुस्वार जर श्रीसमर्थ आहेत. तर त्या एकेका मौक्तिकास आपण शिंपली होउनच जपावयास हवे नां. नी म्हणूनच एकेक अक्षर काय काय मौक्तिके घेऊन आले आहे, याचा अभ्यास आपणच करावयाचा आहे. आता हा अभ्यास कसा करावा, ते आपण जाणून घेउ या. यासाठी आपण श्रीमद्ग्रंथराज दासबोधाकडेच वळणार आहोत. श्रीसमर्थांनी या ग्रंथराजाचा आरंभ, 'ग्रंथारंभ लक्षणाने' केलेला आहे. नी तद्नंतर येते ते श्रीगणेशस्तवन. आता या गणेशस्तवनातील फक्त ग, या एकाच अक्षराचा जर अभ्यास करावयाचे आपण ठरविले, तर अगोदर अ या अक्षराचाच अभ्यास आपणांस करावा लागेल. कारण, ग या अक्षर उच्चाराचे पूर्वी आपणांस अ चाच उच्चार जाणवतो. असे हे अ अक्षर म्हणजेच हे गणेशातील ग हे अक्षर श्रीं नी या ग्रंथराजात प्रारंभी न योजिता, या ग ची उत्पत्ती जेथून झाली, ते ग्रं हे अक्षर या आपल्या स्वतःसिद्ध स्वरुपी म्हणिजेच श्रीग्रंथराज दासबोधी योजिले आहे. **अशी ही ग्रं अक्षरयोजना श्रीसमर्थांनी प्रारंभीच का केली, ते आता आपण या पुस्तकातून समजून-उमजून अभ्यासून-जाणून घेणार आहोत.**

**..ग्रं या अक्षराची उत्पत्ती..**

आत ग्रं या अक्षराची उत्पत्ती आपण पाहू या. या ग्रं ची फोड करताना, ग्रं या उच्चारातून जे जे ध्वनित होते ती अक्षरे आता आपण पाहू या. **अ ग र ङ न** अशा या पाच अक्षरातून ग्रं हे एक अक्षर निघते. तयार होते. आता यातील **अ** हे अक्षर, पृथाकारक म्हणिजेच आधारहेतु आहे. **ग** हा उजव्या शुंडेचा निदर्शक असा आहे. तर **र** हा ज्ञानकारक आहे. **र** अक्षराच्या उच्चाराने आपल्यातील ज्ञानकेंद्रे ज्ञानरस प्रसवितात. जर आपण नुसते ग असे अक्षर काढले तर, या अक्षरातून काहीच अर्थबोध होत नाही. परंतु जर या ग सच आपण काना दिला की त्या अक्षरास

पूर्णत्व येउन आपण ग, या अक्षराचा उच्चार करु शकतो. मात्र र हे अक्षर पूर्णाक्षर आहे. कसे तर बघा- र या अक्षरास काना देण्याची आवश्यकता पडत नाही. जर दिलाच तर उच्चार रा असा होईल. म्हणून र हे स्वतंत्र असे पूर्ण अक्षर होय. म्हणून र हे अक्षर अ प्रसविणारे. अ चे उद्‌बीज म्हणून म्हणता येईल. पृथेत जे जे आहे ते तें जाणण्याची शक्ती देणारे असे र हे अक्षर आहे. ङ हे अक्षर तसे आपण फारसे वापरात आणित नाही. परंतु या अक्षराचा उपयोग हा पड्‌जिभेतील अमृताशी संलग्न आहे. या पड्‌जिभेला ङाङेय म्हणिजेच गांगेय असे संबोधन आहे. ङ-गं, म्हणजे ज्ञानाचे अधिष्ठान. ङे-ए, म्हणजे ज्ञानाचा प्रवाह-ज्ञानाचा ओघ-निर्देश-आदेश. नी य म्हणिजे ज्ञानप्रवाह प्राप्ती. असे हे सारे अमृत आपल्या म्हणिजेच जीवाच्या पड्‌जिभेत आहे. या साऱ्या अमृताची उत्पत्ती जेथून, तिच पड्‌जीभ होय. हा ङा ङे य-गांगेय ओघ म्हणिजेच ओघवती अशी ती अमृतगंगा आहे.

श्रीब्रह्मरंध्र व श्रीकुंडलिनीशी संलग्न जोडलेली शक्ती म्हणिजेच पड्‌जीभ होय. यासच तंतू अथवा कंकर असे संबोधन आहे. हा तंतू ब्रह्मरंध्रापासून पड्‌जीभेमधून, पाठीच्या मणक्यांमधून कुंडलिनीस भेदून धरणीशी संतत अशा संपर्कात असतो. फक्त जीव या गोष्टींबाबत अनभिज्ञ असल्याकारणाने त्यास हा संपर्क-ही संलग्नता-ही सोबत, जाणता येत नाही. हेच त्याचे जीवपण. हेच त्याचे जंतूपण. तंतू असूनही आपण किड-किडा-जंतू म्हणूनच संबोधले जातो. म्हणूनच ङ या अक्षराचा उच्चार करुन बघावा. तो पड्‌जीभेशी घंटानादासारखा होतो. याचे स्पंदनस्वरुप फार सूक्ष्म असते.

आता न हे अक्षर पाहूया. हे अक्षर स्मरणाशी म्हणिजेच स्मृतिग्रंथींशी जोडलेले आहे. लहानमुलास अक्षरओळख होण्यापूर्वी-उच्चारापूर्वी, संकेतचिन्हांची ओळख-जाण आलेली असते. ही संकेतचिन्हे म्हणिजेच स्मृति होय. स्मरण होय. ज्यांस आपण उपजतच असे म्हणतो ते. म्हणून लहान मूल सर्वप्रथम मान धरावयास लागले की ते नाही..नाही या प्रकारात आपले मस्तक-आपले डोके हलविते. तेही ते दक्षिणोत्तर असे हलविते. कारण त्यास याच स्मृतिंना चाळवावयाचे असते. चाचपडून पहावयाचे असते. आपण त्यास तो नाही नाही असा संकेत समजतो. परंतु तसे ते

नाही. श्रीमहादेवांचा डमरु देखील प्रथमनाद हा दक्षिणोत्तर असाच करतो. हे अक्षर ॅ या पद्धतीने लिहीले तर अपूर्ण वाटते. न असे लिहीले तर अर्थबोध होऊन उच्चार होउ शकतो. १ हाच आकडा, आडवा केला की न होतो. हाच १ म्हणिजेच न, म्हणिजेच जीव होय. न म्हणिजे जीव. हा जीव नाभीतून नाळरुप जन्मास आल्यानंतरच्या-आपल्या पूर्वीच्या स्मृतिवनात चाळणा-तपासणी-चाचपणी करुन पाहत असतो. म्हणून लहानमुल आपली मान दक्षिणोत्तर हलवित असते. लहानपणी मूल एखाद्या वस्तूकडे झेपावते. हे त्याचे झेपावणे पुढील आयुष्यातील खूप महत्वाचे अंग आहे. परंतु पुढे मोठे झाले की त्यास हे झेपावणे सोडून चालावे लागते. तेव्हा मोठेपणी त्यास हा जोश-आवेश उरत नाही. म्हणून लहानपणीच असे ध्येय समोर ठेवावे की मुल पुढे आयुष्यभर झेपावतच राहील. त्या झेप घेण्याचा कारक असे हे, न हे अक्षर आहे. नी हाच न म्हणिजेच ॰ अनुस्वर-अनुस्वार होय. असा हा न या ग्रं च्या अनुस्वारात गुप्त समाविष्ट आहे. यावरुनच हे जाणून घ्यावे की लहान मुलाचे नाही नाही या पद्धतीने मान हलविणे हे स्मृतिचाळणा करणे होय. आता श्रीसमर्थांनी ग्रं या अक्षरात र या अक्षराचा सरळसरळ वापर-उपयोग न करता र या अक्षराचा हा संकेतच उपयोजिला-वापरला आहे. बघा ्र या अशा संकेतावरुन काहीच अर्थबोध व्हावयाचा नाही. परंतु म्र-क्र-व्र-भ्र-स्र, आता कळेल की र म्हणिजेच ्र हे अक्षर कसे कार्य करते ते. कुठे कसे लागते ते. नी अक्षरसंदर्भ पूर्ण करते ते. तसेच बघा, र्त-म्र-वृ-ॅ ,अशा कीतीतरी बाबतीत र हे स्वतंत्राक्षर गुप्त व सांकेतिक असे आहे. जसे, दोन संकेत म्हणजे एक आज्ञा होय. एक आदेश होय. एक आदेश म्हणिजेच एकादश-एकादशी-११ असे. बघा, दोन संकेत-सूर्य नी चंद्र. यांस एक आज्ञा दिन नी रात्र. तसेच इथे ग्रं या अक्षरात ं ्र ही दोन संकेतचिन्हे म्हणिजेच, ॰ अनुस्वार म्हणिजे न, हे आता आपणांस माहित झाले आहेच. नी ्र म्हणिजे र हे ही आता आपणांस उमजलेच आहे. आता या दोन संकेतचिन्हांचा जर आपण उच्चार जाणून घ्यावयाचे ठरविले तर बघा, ं न नी ्र र, काय झाला या संकेतचिन्हांचा उच्चार? तर 'नर' असा. आता बघा श्रीसमर्थांचा हा अक्षरसेतू नराचा

नारायण करावयाला निघाला आहे की नाही? खूप गूढ-खूप रम्य नी ज्ञानाने परिपूर्ण असे हे श्रीदासबोध रसायन आहे. जीवाने या साऱ्याचा नीट जाणिवपूर्वक-लक्ष-चित्त-मन-तन-आत्मा-परमात्मा-बोधकर्ण-अंतःकर्ण लावून अभ्यास करावयास हवा. **श्रीश्रीसमर्थांचे हे स्वतःसिद्ध असे अलौकीक-अमोलिक सारे ज्ञानभांडार आहे. हे आपणांसही त्याच अवस्थेप्रत नेणारे ज्ञान आहे. नी मग पूर्णज्ञानास कुठल्याच दिशा-कक्षा-मर्यादा नसतात. तेव्हाच ते अनंत-असिम-अमर्याद-विशाल-व्यापक-भव्य-दिव्य-परमदिव्य-श्रीसदाशिव असते. नी तेच ते पूर्णज्ञान श्रीसमर्थांना आपणांस द्यावयाचे आहे. तर आपणं पूर्णांशांने आता ते ज्ञान घेण्याकरीता सावचित्त-सावधान-पूर्णजिज्ञासू नी अभ्यासी असे झालेच पाहिजे. तरच आपणांस हे सारे प्राप्त होणार आहे.**

आपल्या प्राकृत भाषेत म्हणिजेच मराठी भाषेतच आपणांस सर्वार्थांनी समृद्ध करण्याचे सारे तंत्र गूढरित्या भरलेले आहे. नी हे सर्वशक्तीमान असे शास्त्र आपणच आपला अभ्यास केल्याने प्राप्त होणार आहे. यासाठीच आपले लक्ष श्रीसमर्थ याकडे ज्ञानपूर्वक वळविणार आहेत. श्रीसमर्थांची प्रत्येक अक्षर योजना किती समृद्ध नी ज्ञानप्रवाही आहे हे आपण जाणून घ्यावयाचे आहे. त्यासाठीच आपण श्रीसमर्थांनी ज्या ग्रं या अक्षराची योजना आपल्या श्रीदासबोध ग्रंथाच्या प्रारंभी केली, ती तशी करण्यामागे त्यांचा काय हेतू आहे?त्यात जीवाचे कल्याण कसे दडलेले आहे? तो ग्रंथ आपण कसा वाचावा? तो वाचता वाचताच आपलाही ग्रंथ कसा उलगडून घ्यावा? आपणांस आपल्याही जीवनग्रंथाचा प्रारंभ यामधून कसा करता येईल, हेच सांगण्याचा श्रीसमर्थांचा हेतू आहे.

ङ या अक्षराचा उच्चार पड्जीभेपासून होतो. पड्जीभ हा शरीराचा एक तटस्थबिंदु आहे. खोकला झालाच तर ही पड्जीभ जरा खाली येउन घशास टेकते. तेव्हा तिस हळद लावून, अंगठ्याने दाबावी लागते नी खोकला थांबतो. जर पड्जीभेस चुकून जरी इतर वेळेस स्पर्श झाला तरी डोळ्यात पाणी येणे, खोकला, ठसका, उलटी इत्यादी त्रास संभवतो. नव्हे होतोच. म्हणूनच तिस ब्रह्मरंध्राची म्हणिजेच मस्तकाची नाभी, असे संबोधन

आहे. तसेच ग म्हणिजे सत्यशुंड होय. सत्यदर्शी-स्पर्शी-लक्षी अशी सत्याची जिव्हा. कडक-तपस्वी-घोरसत्यवादी-विवेकी-परिपूर्णज्ञानकक्षा अशी ही शुंड होय. नी हा ा काना म्हणिजे सिंचन होय. पाउस पडताना तो ः अशा थेंब, सिंचन स्वरुपातच पडतो. तसेच हा ा काना म्हणिजे अक्षराचे सिंचनच होय. असा इतका विचार या अक्षरांबाबत खरेच असू शकतो का? असू शकेल का?असा जर विचार आपण केला तर ही सारी अक्षरे, काना-मात्रा-वेलांटीसह जर आपणांस तयार करुन घ्यावी लागली असती नां, तर आपणांस ही सूत्ररचना- यातील गांभीर्य-यातील अवघड गोष्टी-ही अक्षरे तयार करण्यामागचे कष्ट, हे सारे नीट तपशीलवार उमगले असते. आपणांस शब्द-अक्षरे ही तयार लाभली नां. म्हणून त्यांचे गांभीर्य उरले नाही. शब्द हे भाव व अर्थ यांचे प्रवाही असतात. भाव व अर्थ यांचे वहन या अक्षरांमधून होत असते. जसे येथे समजण्याकरीता-कळण्याचे दृष्टीने आपण असे म्हणू शकतो, की तांब्याच्या तारेमधून वीजेचा प्रवाह जातो. परंतु तिस एका रबराच्या आवरणात-वेष्टनात गुंडाळलेले असते. नी मग ती आपल्या उपयोगात येते. तसेच भाव-ज्ञान ही सारी रचना या अक्षरांमधून गुप्त असतात. प्रवाहीत असतात. नी शब्द हे त्यावरील कवचरुपाने असतात. प्रत्येक अक्षर हा एक परिपूर्ण असा अर्थाक्षर समूहच असतो. भाव नी अर्थ एकत्र आल्याशिवाय ज्ञानप्राप्ती होत नाही. हे काहीच न पाहता न जाणून घेता जे घडते, ते केवळ वाचन होते. ज्यात मग मन लागत नाही. नी कंटाळा-आळस-झोप-नावड या विवरांकडे मग मन धाव घेते. नी आपण म्हणतो, आमचे लक्षच लागत नाही. त्याचेच मूळ आपण समजून घेतीले पाहिजे. म्हणून श्रीं चे सांगणे की उमजून उकलून शब्द फोडून वाचा. शब्द हे कवच समजा नी त्यातील अर्थ-भावाचा मगज काढून घ्या. पुन्हा हे सारे शब्द, अर्थ-भाव प्रवाही असले तरी त्यात बीज हे आहेच. म्हणजे जो जाणून वाचेल त्याचे अंतरंगात या साऱ्याची बीजोत्पत्ती ही होणारच आहे. जसे ज्ञानातून ज्ञान-ज्योतितून ज्योत लागणे. तसेच हे अक्षरातून-अर्थातून भाव-भावातून ज्ञान पोहोचणे होय.

लिहिणे-वाचणे यावर श्रीं चा अतिशय कटाक्ष आहे. जीवाच्या

एकुणच सर्वांगांस यातून वळण पडणार आहे, असे श्रीसमर्थ सांगतात. केस वळवून वळत नाहीत. त्यांना तेल-पाणी हे लावावे लागतेच. त्यांना बांधून ठेवावे लागते. या केसांचे पलिकडे मन आहे. त्यास कुठले तेल-पाणी? तर हेच भाव-अर्थ. या तेल-पाण्यानेच मन ओलावयाचे. ज्ञानाने ते बांधून ठेवावयाचे. जाणिव-विवेक-प्रेम या त्रिपेडीने ते गुंफायचे. नी समर्पणाची कुसुमे त्या पेडांमध्ये गुंफून मग मनास हवा तो आकार आपण देऊ शकतो. श्री सांगतात, एकदा मनास आवरुन तर बघा. त्यातून स्वतःविषयी जो शोध लागेल नां, तो शोधच सारी धडपड-तडफड-तगमग-तळमळ शांतविणारा असेल. पण एवढा वेळ, एवढी जाण, एवढी समज सध्याचे काळात कुठे लुप्त झाली आहे? तिस शोधिलेच पाहिजे. जे दिसेल ते घ्यावे असे वाटणे, हा मोह नव्हे. तर ती वस्तू आपली वाटणे, ती विषयी स्वामित्व वाटणे, हा मोह होय. हे माझे आहे हा मोह. यास मोह का म्हटले? याचा विचार खरेतर झाला पाहिजे. मोहनिवृत्ती करीताचे अठराअध्याय श्रीगीतेतून आले. नी तो मोहही कुठे-कधी नी कुणास झाला हे ही अभ्यासिणे महत्वाचेच आहे. नुसती गीता पाठ करुन किंवा ती म्हणत राहून मोह नावाच्या शत्रूचे दमन होणार नाही. तर ती जाणिली-बाणिली-अभ्यासिली पाहिजे. या साऱ्या श्रीनर-नारायणांच्या लिला आहेत. यामध्ये म्हणिजेच श्रीमहाभारत युद्धाचे प्रसंगी श्रीअर्जुन हतवीर्य झाले, असे आपण कदापिही समजता कामा नये. हे सारे घडविणारा वेगळाचि, हे ध्यानी ठेवावे. ते तसे घडणे-घडविणे श्रीपार्थ जाणित होते. नी जाणूनही ते अजाण बनले-राहिले. म्हणून गीतेसारखे तत्वज्ञान समरांगणास जीतणारे ठरले. जिंकणारे ठरले. यास म्हणावयाचे लिहिलेले वाचणे. हे असे वाचन श्रीसमर्थांना अपेक्षित आहे. नी एवढा अर्थप्रवाह-अर्थगर्भज्ञान श्री च्या एकैकाक्षरात नी संकेतचिन्हांमधे ओतप्रोत आहे.

श्रीं नी या ग्रंथराजाचे सारे लेखन हे शिवस्तरघळी-स्थली परिपूर्ण केले. काय आहे ही शिवस्तरघळी? शिवस्तरघळी ही एक ध्यानाची अगम्य सूत्रस्थली आहे. तसेच अत्यंत सुंदर असे निसर्गरम्य ठिकाणच केवळ नव्हे तर श्रीरामरायांची, श्रीसौमित्रीसह पदे, ज्या मूषकनिवासी-मूषकनिवास

म्हणिजेच घळ-बिळ-विवर असे, लागली. ते हे शिवस्तर होय. ज्यास आपण शिवथरघळ असे संबोधितो. देवबंदी सोडविले..रावण पाडीले रणांगणी..हे जेथून, ज्या उंचीवरुन श्रीरामांनी अवलोकीले, ती ही स्थली होय. अशा कल्याणकारी स्तराची म्हणिजेच उंचीची जेथून सुरवात झाली, तो हा स्तर होय. ती ही उंची होय. जी भूमी जानकीजीवन श्रीरामरायांनी आपुल्या पदस्पर्शाने रेखांकित-चिन्हांकीत केली. अशी ती शिवस्तरघळ. जेथ श्रीसमर्थ आपुले शिष्य श्रीकल्याणांसह बैसोन श्रीग्रंथराजाचे सुलेखन करीत, ती घळ. ती त्यावेळी जैसी होती तैसीचे तैसी आजही आपण पाहू शकतो. नी तो इतिहास सस्पर्श-सोद्भावे जगू शकतो-अनुभवू शकतो. त्यातील ज्ञान-आनंद-शांतता-जाण आपण आजही घेउ शकतो. ही आपुली अनंतकोटी जन्मांची पुण्याईच होय.

इतिहासापासून आपण काहीच शिकत नाही. इतिहास हा विद्यालयांमधे जरी अभ्यासाचा विषय असला तरी देखील त्यात घडलेल्या घटनांचा तपशिल इसवीसनांसह दिलेला असतो. पण असे का घडले? ते घडू न देणारा एकही श्रीकृष्ण ते समयी का नव्हता?तो आपल्यापैकी कोणी होउ शकेल का?असेल का?जमेल का? याचा विचार करणे म्हणिजे इतिहास उमगणे होय. मी पंतप्रधान झालो तर? असल्या निबंधांपेक्षा, मी श्रीअर्जुन असतो तर? असा विचार मांडायला..पुढे यायला..चर्चा करायला..खुलेपणानी यावर मतप्रदर्शन घडायला काय हरकत आहे? विद्यार्थ्यांची मने ज्यातून समजतात असा विषय म्हणिजे खरेतर निबंध होय. परंतु प्रत्यक्षात मात्र हे निबंध हा, विद्यार्थ्यांचा शालेय जीवनातील केवळ एक कल्पनाविलास ठरतो. परिक्षेतील २० गुणांचा हा प्रश्न. विद्यार्थ्यास किमान १२ ते १५ किंवा कमीत कमी ७ ते ९ एवढे गुण देऊन जाणारा. बुद्धीचे वैभव-सत्यार्थप्रकाशाचे दिशेने वळविणे नी हा केवळ कल्पनाविलास नसून हे घडविण्याचे सामर्थ्य, बुद्धीच्या कुठल्या कक्षात, नी कसे दडले आहे, हे वास्तविक दाखविता येउ शकते. परंतु तेवढी आवड-निवड-सवड-ओढ सर्वत्रांस मात्र हवी. तरच हे शक्य आहे. नी असे जर घडले तर इतिहास काही वेगळाच आकारास येईल. विषयाच्या एका तासात, म्हणिजेच

४७ क्षणकालात एखादे युद्ध-त्याची तयारी-प्रत्यक्ष घटना नी त्याचा परिणाम एवढेच केवळ वाचले जाते. नी धडा संपतो. धडा, घेतला मात्र जात नाही. ज्यासाठी इतिहास शिकायचा तो विषयच बाजूला राहतो. मूळ उद्देशच-प्राणच काढून घेतल्यावर प्राप्त काय? ग्रंथ असा नसावा. असा न वाचावा. असे श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. याचा खूप सूक्ष्मपणे विचार व्हावयास हवा. याकडे लक्ष वळावयास..वळवावयास हवेच हवे.

तेच भूगोल या विषयाचे. केवळ भौगोलिक परिस्थितीतून जर आपण पृथ्वीचे शिक्षण घेउ-अभ्यास करु तर तो अभ्यास कदापिही आपल्या अंतस्थ उपयोगात येणार नाही. अंतस्थ म्हणिजे आत्मशांति-आत्मकल्याण-स्वजाणिव-स्वशोध-स्वओळख-तात-मात-आप्त-इष्ट-गाव-देश-समाज-ब्रह्मांड-कुंडली-ग्रह-नक्षत्रे-त्यांचे भ्रमण-त्यांचा भ्रमणकाल-संधी-या साऱ्याचा त्या त्या जन्माक्षरावर होणारा परिणाम-चांगली-वाईट फलिते-प्रत्येकाचा भाग्यकाल-संचित-प्रारब्ध-क्रियमाण-अध्यात्मिक-अधिभौतिक-अधिदैविक-सत्व-रज-तम-जन्म-जरा-मृत्यू आदी सर्व गोष्टींचा तपशील हा प्रत्येक जीवाच्या भाग्यानुसार-कर्मानुसार या पृथ्वीवरच फिरत असतो. नी भाग्यकर्माची फलित होण्याची वेळ आली की ज्याचा त्यास प्राप्त होत असतो. आपण ज्यास अक्षांश रेखांश म्हणतो त्यास श्रीसमर्थ 'तंतू' असे संबोधितात. असे तंतू, ज्यातून जीवाचे भ्रमण-त्याचे त्यास स्मरण देणारी जाणिव-स्मरणाशी जुळणाऱ्या गोष्टी-ओळखी-तुटणारी-तोडावी लागणारी नाती-नात्यातील नवीन घडण-अचानक-अकस्मात घडणाऱ्या-समोर येणाऱ्या-सामोरे जावे लागणाऱ्या घटना, आदी साऱ्या घटनांचा विचार-तपशील-शोध-बोध-अभ्यास होणे म्हणिजेच हे लिहिलेले वाचणे होय. श्रीसमर्थांना हे असे लिहिणे-वाचणे इतके आतपर्यंत, गर्भमूळापर्यंत अपेक्षित आहे. ते जीवास शक्यही आहे. नी त्या अभ्यासातच प्रत्येकास गोडी-ओढ-आवड-जाण या ग्रं मुळे होणार आहे. हा असा सारा ब्रह्मांडगोळ जाणणे म्हणिजे भूगोल. एवढा पूर्ण अभ्यास विद्यार्थ्यांचा जर एकदाच नीट नी परिपूर्ण झाला. तर त्यास त्याच्या कार्याविषयीचे-कार्यवेळेचे-पाउल उचलतानाचे-पूर्ण यशस्वीतेचे, कालमापन स्वतःचे स्वतःच

करता येउ शकेल. आज जसे आपण पत्र लिहितांना दिनांक-वार इत्यादी तपशील घालण्याची पद्धती आहे. तर त्यावेळी म्हणिजेच पूर्वीचेकाळी पत्र पूर्ण करतेवेळी, पत्राचे शेवटी म्हणिजेच पत्राचेपायी, दिनमान-तिथी-वासर-पक्ष-संवत्सर-मनु-कल्प-योग-काल-संधी-विशेषभाग्य-दिव्य-गोपद्म आदींचा समावेश केलेला असावयाचा. किती ज्ञानी नी जाणते होते आपले पूर्वज. त्यांस या भूगोलाचे ज्ञान होते. ते त्यांनी अभ्यासाने परिश्रम पूर्वक करुन घेतिले होते. खगोल भूगोल हे सारे संशोधन त्यांचे. तो ठेवा आपण जतन करावयाचा. म्हणिजे केवळ ती छापील पुस्तके सांभाळणे-जपणे एवढेच नाही. तर स्वतः अभ्यासून त्यात निरनिराळया स्वतःच्या सत्यप्रमाणांची-अभ्यासाची-संशोधनाची भर घालून विश्व अधिक समृद्ध नी वैभवशाली करणे म्हणिजे जतन-जपणूक-सांभाळणे-संवर्धन होय. परंतु हा नी इतका सखोल विचारही अंतस्थ जाणवत नाही. या पद्धतीचा विचार एक दोघांकडूनच काहींकडुनच झालेला आढळतो. मुळापासून या सर्वच बाबतीत जी ओढ, जी गोडी हवी तशी ती दिसून येत नाही. नी कुणी तशी ती वाढवितही नाही. इतिहास-भूगोल शोधण्यापेक्षा तो नाकारण्याकडेच बुद्धीचा अधिक कल दिसून येतो. आपला इतिहास, आपली पुराणे, आपले वाङमय हे अनंत स्वाऱ्या-लढाया-प्रलये-वादळे यांच्या चपेट्यात नष्ट झाली. लुटली गेली. प्रवासी म्हणून आलेल्यांनी हा अमोलिक ठेवा आपापल्या प्रांती नेला. इतिहासामधून असाही एक उल्लेख आढळतो की स्नानगृहातील आग पेटविण्याकरीता एकाने आपली हीच दिव्य-भव्य अशी लाखोपानांची ग्रंथसंपदा जाळली. किती बहुमूल्य असा हा आपला ठेवा नष्ट झाला. आपण आता हे सारे ज्ञान पुनश्च गोळा करावयास नको का? त्याची काहीतरी आठवण आपणांस आहे का?एका आकाशाखाली अनंतविचारांची-अनंतमनांची-शरीरप्रकृतिची-विद्यावैभवाची-आधि-व्याधिंची, माणसे कशी राहतात?याचा अभ्यास याचे संशोधन जर झाले नाही, तर सारी 'कशीतरीच' राहतात एवढाच उल्लेख होईल. असे कसेबसे राहणे म्हणिजे गतिहिन अवस्था होय. ढकलणे-ओढणे या सदरात ते मोडते. नी आपण सारे, या श्रीपृथामातेसह, गतिशील-गतिमान असे आहोत. हे जाणिले मात्र पाहिजे.

असेच श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. त्यांना हे असे वाचन, ज्यातून आपल्या स्मरणातून सुटलेले सारे संदर्भ परत एकत्र येतील. ग्रहणकर्त्याजवळ ते सारे समुदाय गोळा होतील, असे वाचन, असा स्वग्रंथ, नी असा स्वग्रंथाचा प्रारंभ-आरंभ श्रीसमर्थांना अपेक्षित आहे.

अजूनही पूर्णतया ग्रं या अक्षराची फोड पूर्ण झाली असे म्हणता येत नाही. या ग्रं मधून श्रीसमर्थांना आपल्यातील ती ग्रहणशक्ती वाढवावयाची आहे. ज्या ग्रहणशक्तीने आजपर्यंतचे सारेच, सारेचसारे ग्रहण केलेले आहे. ग्रं हे अक्षर ग्रहणशक्तीच्या नेमक्या कुठल्या कक्षेत कधी-कसे येते, त्याचा जर विचार-शोध-अभ्यास करावयास घेतला तर बघा, ग्रहण म्हणिजे सूर्य-चंद्र-पृथ्वी या तिघांमधून या त्रैंमधून कोणी एकाने कोणा एकाचा ग्रास केला की आपण म्हणतो ग्रहण लागले. ते आपण बऱ्याच बाबतीत अशुभही मानतो. अशुभ म्हणजे भिती. भिती का, तर अज्ञान. जे माहित नाही, का-कसे नी काय परिणाम, याबाबतचे ज्ञान नसल्यामुळे यास अशुभ समजले जाते. यास अशुभ मानले जाते. परंतु ज्ञानाच्या म्हणिजेच पूर्णज्ञानाच्या कक्षेत काहीच शुभ-अशुभ-जर-तर-शंका-तर्क-वाद-संघर्ष उरत नसतात. उरत नाहीत. परंतु या पूर्ण ज्ञानापर्यंत कोणी पोहोचतच नाही. सारी अर्धी कच्ची अवस्था. अशाच अवस्थेत स्वतःस पूर्ण समजावयाला लागतात. नी परिणामी फलित शून्य. दुःख-व्यथा-काळजी-जे हवे होते ते लाभले नाही या विचारातच इतिश्री. जीवाला जर जीवाच्या अनुभवावर सोडावयाचे ठरविले तर धक्का, एवढ्या एकाच भागातून त्याचा अनुभवप्रदेश जातांना दिसतो. मग तो धक्का, व्याधि-अपघात-वृद्धपण-आप्त-इष्टांनी त्यांच्या वागणुकीतून दिलेला-पैसा-मान-प्रतिष्ठा-स्थावर-जंगम-न्यायालये-आपत्ती-अपंगत्व-सार्वत्रिकआपत्ती-विरह-वियोग-विवाह-इत्यादीं मधून बसलेला धक्का, नी त्यातून आलेला अनुभव. असा हा अनुभव म्हणजे ज्ञान नव्हे. यास जर ज्ञान म्हणावयाचे नी ज्ञान झाले म्हणून संबोधायचे, तर ते अनुभव आल्यावर होण्याऐवजी तत्पूर्वीच व्हावयास हवे नां? कारण तो अनुभव घेणारा हा त्या दोन्हीवेळेस प्रत्यक्ष हजर आहे. पण तसे ज्ञान होताना म्हणिजे प्रसंगापूर्वी ज्ञान होताना दिसत नाही.

कारण जेव्हा हा अनुभवाचा प्रवास उलगडत अनुभव घेणाऱ्यापर्यंत येत असतो, तोपर्यंत तो अनुभव घेणारा हा निद्रावस्थेतच असतो. झोप नी निद्रा यात फरक आहे. निद्रा म्हणिजे, जागृति न उमजलेली अवस्था होय. झोपेतून उठविता येते. तर निद्रेतून जागवावे लागते. ही निद्रा म्हणिजे अंधाराच्याही पैलची-पलिकडील अवस्था होय. जसे डोळ्यात बोट घातले तरी दिसणार नाही अशीही एक अंधारावस्था असते, बिलकुल तशीच अवस्था या अनुभव प्रवासादरम्यान जीवाची असते. म्हणून त्यास निद्रा म्हटले जाते. बरे या निद्रेतून आपले आपण जागे होऊ, असे ज्या महाभागांना वाटते त्यांनी हा तपशील, अनुभव घेण्यापूर्वीच-धक्का बसण्यापूर्वीच विचारात घ्यावयास हवा. नी तसा तो घेऊन धक्का बसण्यापासून स्वतःच स्वतःस वाचवावयास हवे. परंतु तसेही होणे नाही. होताना आढळत नाही. पश्चात्ताप ही कदाचित जीवाची पाचवीच असावी. म्हणजे जसे आपण म्हणतो, हे माझ्या पाचवीलाच पुजले आहे असे. अशी ही पाचवी अवस्था असू शकते. नी या पश्चात्तापाचेही परिवर्तन या पश्चात्तापाचेही सोने करणे केवळ श्रीसद्गुरु शक्तीसच शक्य असते. शक्य आहे. कारण आपल्या या ग्रं चा, आपल्या ग्रंथाचा आरंभ कसा-कुठून-का-कधी-कधीपर्यंत-कुणासाठी-कुणाकरीता-कुणापर्यंत झाला. येथपासून किती पानांचा आपला ग्रंथ येथपर्यंतचा, या साऱ्याचा तपशील त्यांचेपाशी असतो. तयांचे अधिकारात असतो. असाध्य ते साध्य करीता सायास कारण अभ्यास..असे श्रीतुकाराममहाराज म्हणतात. हाच तो श्रीसंतांचा अधिकार. जो अभ्यासाने त्यांस प्राप्त आहे. त्यांनी तो प्राप्त करवून घेतिला आहे. नी आपणांस तेच सारे ते कथनही करीत आहेत.

कसा तो अभ्यास करावयाचा तर, या सृष्टीच्या-या पृथामातेच्या चरणांशी बसून, श्रीस्वामी जाणून-दास्यभावानी केलेला हा अभ्यास आहे. श्रीस्वामींस काय हवे? त्याप्रमाणे-त्या आरंभाप्रमाणे ग्रं आरंभिणे, म्हणिजेच आपला ग्रंथारंभ करणे, हा अधिकार होय. असे हे सारे जाणून केलेले लेखन श्रीसमर्थांना अपेक्षित आहे. हा बोध-सुबोध श्रीगुरुच देऊ शकतात-करवू शकतात. ग्रहण-इति साठविणे-समजणे-उमजणे-उकलून घेणे-

या पूर्ण शक्तीनिशी जेव्हा जीव परिपूर्ण होईल, तेव्हाच त्यास स्वामीदर्शन होईल. हे अन्यथा नव्हे, तर पूर्ण सत्य आहे. ग्रहण म्हणिजे एकाला एक ओलांडून पुढे जाणे होय. एकाने दुसऱ्यास संपविणे नव्हे. यासच संक्रमण असेही म्हणतात. ही संक्रमणावस्था जेव्हा आपण एखादा ग्रंथ वाचत असतो, म्हणिजे आतापर्यंत सांगितले त्यापद्धतीने जर वाचत असू, तर बद्धाला ओलांडून मुमुक्षू. नी मुमुक्षु ला ओलांडून भक्त असेही संक्रमण हे वाचता वाचताच घडू शकते. अज्ञानाला ओलांडून ज्ञान. नी ज्ञानाला ओलांडून जाणिव असेही संक्रमण अंतस्थ सुरु होते. तर्काला न्याय मिळून सुनिश्चित अवस्थेपर्यंतही संक्रमण असू शकते. नी शंका संपून विश्वासाच्या प्रदेशात जीव सुखरुपपणे उतरु शकतो. विचार-अविचार-संकल्प-विकल्प-जर-तर-आणि-किंवा-व-परंतु या साऱ्या संभ्रम साखळीमधूनही ही संक्रमणावस्था-ही ग्रहणावस्था फिरुन, एक घट्ट-दृढ श्रद्धेचा पाया उभा राहू शकतो. असे सारे सूक्ष्म सूक्ष्मातिसूक्ष्म ज्ञान ग्रहण करणे-समजून घेणे हे पृथ्वीच्या पोटातही चालू असते. ती हालचाल जीवास ज्ञात नसल्याकारणाने आत होणारी, पृथ्वीच्या उदरात-वातावरणात तसेच अवकाशात होणारी ही सारी नित्य चालणारी संक्रमणे ग्रहण करण्याची-जाणण्याची शक्ती नसल्याकारणाने जीवास ही ग्रहणे कठीण वाटतात. नी त्याचे अनिष्ट असे परिणामही त्यास जाणवतात. परंतु जर अनिष्ट जाणवतात तर इष्ट असतीलच नां? याच विश्वासवर्धक गोष्टींपर्यंत तो पाहोचतांना दिसत नाही. वाईट चटकन स्विकारले जाते. विश्वासिले जाते. पण चांगल्या गोष्टींसाठी-त्या समजून सांगण्यासाठी कष्ट घ्यावे लागतात. मनाची समजूत घालावी लागते. त्या चटकन पटत नाहीत. हे असे का? हे खरेतर अनिष्ट नी भयंकर होय. ग्रहणकालात या ग्रहणाची गर्भावरही संक्रमणे शरीर-बुद्धीवर झालेली-चाललेली स्पष्टपणेच दिसतात. जसे गर्भवतीने जर या ग्रहणकाळात काही चिरले-पिळले-शिवले-विणले-कापले-तोडले-फोडले-जाळले-भाजले-ओतले-घेतले-पुसले-फाडले-उसवले-खाल्ले-ओकले तर त्याचा परिणाम गर्भावर दूरदूरपर्यंत होतो. जीवाचा एखादा अवयव चिरलेला-पिळलेला-शिवणाचा डाग-सळईने डाग

द्यावा असा चट्टा-बुद्धीमांद्य-स्मरणशक्तीची कमतरता-चक्कर-मळमळ-पचन-बर्हिदिशेचा कायम त्रास-तीव्रलघुशंका-समज कमी-क्रोध-दुबळेपणा-मानसिक अस्वस्थता-मानसिकदुबळेपणा-हातांना घाम येणे-हात सतत चिकट जाणवणे. इत्यादी प्रकारचा त्रास संभवतो. हा एक स्वतंत्र अभ्यास विषय आहे. अतितीव्र संवेदन आहे हे. जे संक्रमण बालजीव गर्भातही धारण करु शकते. गर्भातही समजू शकते. पण पृथ्वीवरील चालत्या बोलत्या मानवांस ते कळतही नाही. हेच अज्ञान. हाच अंधार. हीच भीती. परंतु हे आहे. अभ्यासानेच यातील सत्यता जीवास उमगेल. अतिसूक्ष्म स्पंदने म्हणिजे पृथेच्या उदरातील श्वासोच्छ्वासाची सुरवात जेव्हा झाली. किंबहूना त्याही पूर्वीची-अतिपूर्वीची अवस्था होय. आपल्या पर्यंत जो धान्य साठा येतो. तो पृथेच्या या स्पंदनाचाच एक भाग आहे. अशी ही ती स्पंदने ज्यांमधून जातात किंवा जेथे साठविली जातात अशी धान्ये या संक्रमणकाळी वाटण्याचा आपला परिपाठ-परंपरा-कुळधर्म आहे. दरवर्षीच्या संक्रमणकाळीही म्हणिजेच संक्रात या दिवशीही आपण हे धान्य वाटीत असतो. जसे तिळ-गुळ, दाणे-गुळ, गहू-गुळ, वस्त्र-पात्र-जल असे. दिवसा दिसणाऱ्या नी रात्री भासणाऱ्या वस्तू जरी त्याच असल्या तरी भावनांचा प्रवाह रात्री थोडा भितीकडे झुकतो. कारण रात्री बहुतांश भाग हा अंधारव्याप्त प्रदेश असतो. तो उजेडात आला की भिती जाते. जसे दिवसा झाडांची सळसळ-वाऱ्याचे वहन आल्हादकारी वाटेल पण रात्र समयी..? रात्रसमयी मात्र हीच सळसळ जीवाची भिती जागवेल. पुन्हा मन भितीकक्षेत एकदा का शिरले की पुन्हा बाहेर येताना त्याच्या शक्तीचा अर्धा-पाउण भाग नष्ट झालेला असतो. केवढा हा व्यय आहे बघा. नी तो व्यय कशाने भरुन निघणार नी कोण तो भरुन काढणार? मुळात हा झालेला व्ययही जीवास कळतच नाही. नी हा व्यय होत आहे हे तरी सांगणारा कोण?याचाही शोध नाही. म्हणून तो व्यय भरुन काढण्याकरीता तिळ-गुळ ही मुळापर्यंत पोहोचणारी म्हणिजेच जीवाची भिती घालविणारी ही धान्ये-तैल-स्नेहवर्धक-बलवर्धक-शक्तीखाद्ये आपण वाटतो. वाटून खातो. तशाही अर्थाने म्हणजे पाट्यावर वाटून, या अर्थानेही

वाटून खातो. अज्ञानाच्या या भितीपोटी आपण आपले अजून किती नुकसान करुन घेणार आहोत? आता ज्ञानाच्या संक्रमणासाठी बाहेर पडायलाच हवे नां. साऱ्यांनी एकत्र येऊन या अनंत, अंत न लागणाऱ्या भूगोलावर आपण एकटे नाही, एकत्र आहोत, एकरुप आहोत, या गोड शोधाशी एकजुट करायला हवीच हवी. साऱ्यांनी–साऱ्या समुदायांनी या गोडीशी एकत्र यायला हवे. साऱ्यांनाच असे एकत्र येता येईल असे हे संक्रमणाचे योग असतात. तना–मनापासून ते थेट अनंतजन्मांपर्यंत हे संक्रमण घडू शकते. असा हा मोठा बलाढ्य असा ग्रहण–संक्रमण योग आहे. हे सारे योग–पर्वकाळ जीवास त्या मुळारंभाच्या ग्रहणशक्तीजवळ आणण्यासाठीच आहेत. ते जीवास सांगत आहेत..की तू या पृथेचा अभ्यास करीत बसावयाचे नाहीसच. तू हे सारे ग्रहण करुनच या पृथेवर आला आहेस. हे ज्ञान घेतिले म्हणूनच तर तू या पृथेवर जन्मास आला आहेस नां. जीवास अज्ञात अशा–माहीतच नाही अशा कुठल्याही प्रदेशात तो श्रीपरमईश्वर धाडणारच नाही. हा विश्वास जीवास हवा. हा विश्वास कमाविणे म्हणिजेच अभ्यास. हा विश्वास शिकविणे–अभ्यासिणे–कमाविणे याकरीता कोणता बरे विषय शिकविला जातो? तर त्याचे उत्तर, कोणताच नाही, असेच द्यावयास हवे. कारण सारे विषय शिकूनही विश्वास–पूर्णयश–शांतता–समाधान यांची प्राप्ती होत नाही. हा तर अनुभवच सर्वत्रांचा. मग काय शिकावयाचे? काय शिकलो? शिकलो काय तर हेच..उत्तरांचे प्रश्न करावयाचे, नी ते सोडवून सुटलो–पास झालो म्हणावयाचे. धड्यातिलच प्रश्न, तरी उत्तरे सापडत नाहीत. पुस्तक वर्षभर म्हणजे तब्बल ३६५ दिवस जवळच असते. तरीही अभ्यास होत नाही. समजत नाही. जाणताच येत नाही. आवडत नाही. बघा, नट–नट्या हे थोडेच आपल्या जवळ असतात. ते तर फारच दूर असतात. तरी ते आवडतात. त्यांचा आदर्श घेतला जातो. त्याप्रमाणे वागले जाते. पण पुस्तके–अभ्यास, तो करण्याची बुद्धी याबाबत मात्र नावड. याचे कारण, याचे मूळ, कोणी शोधावयाचे? कित्येक घरांमधे तर मुलांच्या या अभ्यासावरुनच तात–मातांचे रणांगण घडतांना दिसते. फार ज्वलंत परंतु तितकाच तशाअर्थाने दुर्लक्षित असा हा विषय आहे.

धाक दाखवून, आमिषे दाखवून का कुठे अभ्यास घडतो. बघा वर्षाचे ३६५ दिवस, गुणिले दिवसाचे २४ तास=८७६० तास. एवढा वेळ पुस्तके जवळ असूनही त्यांविषयी प्रेम होत नाही. त्यांचा अभ्यास होत नाही. ती समजतही नाहीत. ऐन परीक्षेच्या वेळी आजारी पडायला होते. भिती दाटून येते. यास सशक्त कैसे म्हणावे. अंधार शोधायाला अजून कुठे कशाला जायाला हवे. तो आपल्यातच तर केवढा भरलेला आहे, जाणा. पुढील वर्गात गेले असे म्हणावयाचे फक्त. नक्की काय होते? काही वाढ-घट झाली की नाही आत-बुद्धीत, हा ज्याचा त्याचा अनुभव. बरे ज्ञानाने-विद्येने जो विनय येतो तो? याबाबतीत श्रीगुरुजनांनाच विचारलेले बरे. श्रीगुरुजनांच्या आदराविषयीचा विषय तर लांबच गेलेला दिसतो. कशा-कशापासून कुठून कुठून आपणांस ढवळून काढावयाचे आहे बघा स्वतःला. उगा इतरत्र ढवळाढवळ करण्यापेक्षा सृष्टीतील या साऱ्याच संक्रमणांचा अभ्यास करणे गरजेचे. नी जीवाच्या हिताचेही आहे. असा ग्रंथारंभ श्रीसमर्थांना अपेक्षित आहे.

शास्त्र-विज्ञान या विषयांचे तरी पूर्ण ज्ञान व्हावे नां? तर शोध लागल्यानंतर कळते की हा शोध पूर्ण नाही म्हणून. सततचे बदल म्हणिजे का ज्ञान? ज्ञान हे आहेच. अढळ-अचल-अर्थव असे ते सत्य आहे. ज्यात कधीच बदल होत नाही. जे आहेच आहेच आहेच. ओतप्रोत भरलेले आहे. रिता ठावच नाही. त्यातील एखादा थेंब, एखादा थेंबुटा सापडला म्हणजे जग मुठीत आले, असे जर वाटत असेल तर ते खरे नाही. भास म्हणजे सत्य नाही. मनासी टाकीले मागे..गतिसी तुळणा नसे. कुठपर्यंत सत्य पोहोचलेले आहे बघा. नी इकडे मात्र आपणांस कुठे जायाचे-पोहोचावयाचे झाले तर वाहन, नी त्यावरील खर्च हा आलाच. मुळात बिनखर्चाची कामेच नाहीत आपली. गुडघ्याच्या वाटीपासून तोंडातील दातापर्यंत सारीकडे खर्चच खर्च. साधे हाड हलले तरी चार आकडी खर्च. प्रसंगी पाच आकडीसुद्धा. एवढा खर्च करुनही जीव मुळात होता तसा हाती लागत नाही. तो बिघाड ते अधूपण सांभाळतच-जपतच त्यास अर्धेमुर्धे असे उभे राहावे लागते. काय हे शोध... उपयोग होतो, व्यर्थच

असेही नाही, पण पूर्णत्व असेही होत नाही. कारण वस्तू घेतांनाच ती टिकेल की नाही याबाबत शंका असते. दुकानदारही तिच्याबाबत कुठल्याच प्रकारची खात्री देताना दिसत नाही. वापरा नी फेका, ही का सुधारणा म्हणावयाची? एक झाले, निरनिराळ्या प्रकारच्या यंत्रसामुग्रीने आपले बुद्धीसामर्थ्य मात्र हलके केले. चित्रपटांमधून मिळणारे पूर्वीचे प्रबोधन-ध्येयदर्शन-माहितीपटे हे जाऊन थिल्लरबाजी वाढली. गर्दी जिकडे ते दाखविण्याकडे कल वाढला. संस्कृति-संस्कार-परंपरा-इतिहास-भूगोल-ज्ञान-विज्ञान-सामाजिक घडण या कुठल्याही बाबींचा विचार न करता, पोरापोरांचे जवळ येणे, त्यावर तीन तास वाया घालविणे म्हणजे सिनेमा असे झाले. आता तर टि.व्ही.मुळे संपुर्ण आयुष्यच वाया घालविणाऱ्या या साऱ्या कुंभकर्णीय निद्रेमधून जागविणारा खरच हवा. घोर निद्रा. मृत्यू-महामृत्यूची घंटा होऊनही निद्रा भंग न झालेले. काय करावे? शस्त्रसाठ्यांनी सज्ज झालेली राष्ट्रे- नित्य नवे अस्त्र-शस्त्र-क्षेपणास्त्र तयार करणारी राष्ट्रे, ही स्वयंपूर्ण- प्रगतीशीलतेची लक्षणे कशी समजावयाची? जे खळांची व्यकटी सांडो..तया सत्कर्मी रति वाढो..भूतां परस्परे जडो मैत्र जीवांचे.. हे काय शस्त्र आहे का? शस्त्रापलिकडले हे संवाद. हे दो हृदयांमधले संवाद. हे असे संवाद आपण सारे पृथावासी कधी करावयास शिकणार? का वृथावासी असा शिक्का घेणार?जाणिलेच पाहिजे. तुटे वाद संवाद..तो हितकारी, श्रींचे एकदम रोखठोक सांगणे. नसे राम ते धाम सोडोनी द्यावे..सुखालागी आरण्य सेवित जावे. बघा, राम नाही मग सोडून द्या ते स्थान. नी इथे तर आपणांतच राम नाही. आता स्वतःसच सोडावयाचे तर मोठीच पंचाईत. ही पंचाईत कोणी दूर करावयाची? स्वतःची स्वतःला तर ती दूर करणे अवघडच आहे. अशक्यच आहे. दुसरा कोणी बघावा, तर हा जाणता आहे, हे तरी जाणता आले पाहिजे नां? ज्ञान नक्की कोणापाशी आहे, याचा शोध घेण्याइतपत तरी ज्ञान हवे नां? नाही तर प्रवाह कुठेही-कसाही-कुणीही-कुठेही नेत असते. जाणारा भाबडा जात असतो. बरेच दूरवर गेल्यावर हाती काहीच लागले नाही, हे उमजते नी निराश होऊन मग अशा जीवाचा त्या श्रीपरमात्म्यावरचा एकुणच अध्यात्म-परमार्थ यावरचा

विश्वासच उडून जातो. जो अजून नीट-पुरेसा घट्ट-दृढ बसलेलाच नसतो, तोही ढळतो. परिणामी पडझडच सारी. इमारत उभारणी नाहीच अशाने. कळस उभारावयाचा तर पायाभरणी नको का? नी ती 'भरणी' आहे. कशाने भरावी? कशाने भरली जाईल? काय टाकावे म्हणजे भरेल? याचा अभ्यासही हवाच नां? नाहीतर सारा समुद्र रिकामाच. म्हणिजे काय तर..आपण काय नी कशाने भर घालावी याच प्रश्नात सारे आयुष्य घालवतो तसे. रिकामा समुद्र मीठाच्या कणांनी भरावयाला घेण्यासारखे आहे हे सारे. इतक्या संथगतीने. कधी भरेल अशाने आपला घट? म्हणूनच ग्रं या अक्षरातील **अ ग र ङ न** या पंचसूत्रीचा उपयोग श्रीसमर्थांनी आपल्या या आजतागायत न वाचलेल्या-न उलगडलेल्या, म्हणिजे कोंडे न उलगडणे नी पानेही न उलगडणे या दोन्ही स्वरुपातही न उघडलेला ग्रंथ, उघडण्यासाठी उपयोग केलेला आहे. त्याचा यथार्थ लाभ आपण म्हणिजेच जीवाने करुन घेतिला तर, सर्वात जास्त आनंद-संतोष श्रीसमर्थांना होणार आहे. कारण जीव हे त्यांचे बाळ आहे. बाळाची काळजी आईसच. ती अन्य कुणास असणार? हे जाणिले की मूलपण जागले. मूलपण जागले की वात्सल्य उभे राहिलेच. वात्सल्य नी बाल्य एकत्र आले की मातृत्व उभे ठाकलेच. मातृत्व गवसले की या ब्रह्मांड्यात्रेत त्या वात्सल्याचे हातात बोट द्यावे नी निःशंक-निश्चिंत-निर्भय फिरावे. रामदास गुरु माझे आई..मजला ठाव द्यावा पायी. तू माझी माऊली मी वो तुझा तान्हा..पाजी प्रेम पान्हा पांडुरंगे. अशी माय माऊलीची आस-कांस धरणारे, त्याची महती गाणारे-गाजविणारे-समजवून सांगणारे श्रीसंतांचे हे गोड तत्वज्ञान. हे हृदयज्ञान त्यांनी आपणांस दिले.

ग हे अक्षर पृथाकारक म्हणिजेच पृथ्वीचे रुप आहेच. ती ही ज्ञानगंगा. हेच ते ग पद्म-गोपद्म. याच पद्मचिन्हांनी युक्त असा हा ग्रं होय. तो आपला आपण जाणिला-शोधिला पाहिजे. न धरी शस्त्र करी गोष्टी सांगेन युक्तीच्या चार. या श्रीश्रीकृष्णांच्या बोलांमधून जे शास्त्र जे विज्ञान बाहेर पडते आहे, त्याचा जर पूर्ण अभ्यास झाला, तर सारी युद्धसामुग्री ही केवळ भंगार वाढविले आपण, असे सांगणाऱ्याच ज्ञानाची कक्षा उघडविणारा

ठरेल. पृथ्वीवरील सर्वात मोठा रणसंग्राम-महाभारत हे युद्ध म्हणून केवळ न घेता, तो आपला इतिहास आहे. त्याचा त्याच दृष्टीने अभ्यास व्हावयास हवा. जसे, आजही पांडव पाचच का? बरे ते पाच तरी आहेत नां? का त्यांना शंकेने-मोहाने ग्रासलेले आहे? एवढ्या मोठ्या युद्धात प्रत्यक्ष सहभाग न घेता, फक्त मी सारथ्य करीन या श्रीश्रीकृष्णांच्या भूमिकेचा अभ्यास अंर्तबाह्यरित्या एकुणच युद्धासंदर्भात सर्वांनीच केला पाहिजे. व्हायला पाहिजे. बरे श्रीबलराम?ज्यांना श्रीशेष असे संबोधन आहे. साऱ्या पृथेस ज्यांनी आपल्या मस्तकावर-फणीवर धरीले आहे. तयांच्या आधारावर आपण आहोत. ते? ते देखील या प्रचंड युद्धात आपले श्रीहल-श्रीनांगर-श्रीफाळ घेऊन भ्रमणास निघून गेले होते. असे का? याचाही अभ्यास व्हावयास हवाच. साऱ्या पृथेस ज्यांनी आधार दिला तेही प्रत्यक्ष युद्धप्रसंगी उपस्थित नाहीत. ज्यांनी यच्चयावत् बह्मांडास प्राणचेतना दिली असे श्रीमहाबली श्रीहनुमंतही तेथ नाहीत. म्हणिजे श्रीकपिवर फक्त ध्वजांकीत होते. नी श्रीकृष्णांनी तर सारथ्य, एवढीच भूमिका स्वीकारलेली. मग या युद्धात कितपत जीव राहिला?जर युद्धप्रसंग या त्रयींसही नको आहे. तर मग युद्ध या गोष्टीकडे आपण सर्वांनी कसे बघावयास हवे? नी मग तर या पृथ्वीवरील जीवाने ही युद्धे करण्यात तरी काय हशील?त्यातून काय प्राप्ती? नी या साऱ्यात आपले म्हणिजेच एकुण साऱ्यांचेच स्वबळ असे ते किती? या साऱ्याचा अभ्यास नको का व्हावयाला?युद्ध-संघर्ष-भांडणे-वाद या गोष्टी जर त्या श्रीपरमशक्तीसच नको आहेत. नी आपण नेमके त्याच मार्गाने प्रश्न सुटतील, अशा विचारांचे आहोत. तर हा विचार बरोबर आहे का? योग्य आहे का? हे तपासून नको का बघायला? याचा अर्थ आपण त्या श्रीपरमेश्वरीय शक्तीच्याच विरोधात जात आहोत नां? नी यात नुकसान कोणाचे आहे? नी, यतो धर्म ततो जयः असे जर आहे तर-शोधा आता धर्माचे वर्म. कुठे आहे या साऱ्यात तो? एवढ्या मोठ्या युद्धेतिहासात सारथ्य, ही नोंद त्या जगन्नियंत्यास आवडली. काय म्हणावयाचे? ग्रं-फार वेगळा आहे हो हा. आपणांस खूप अभ्यासावा लागणार आहे हा ग्रं. ग्रंथी उकलल्या पाहिजेत. उकलविता आल्या पाहिजेत. ग्रंथी सोडविता

आल्या पाहिजेत. तसेच ग्रंथींपासून सुटकाही करुन-करवून घेता आली पाहिजे. अहो कुठेही गाठी पडतात. एकदम या ग्रंथी अचानकपणे कुठलाही विचार समोर करतात. आपण कुठे आहोत, कसे आहोत याचा काहीही विचार न करता एकदम त्या सर्व समुदायातून आपणांस उठवून नेतात. चिंतेनी व्याप्त ठेवितात. कशात चित्त म्हणून लागू देत नाहीत. कुणाच्याही कुणाशीही या गाठी पडतात. जिथे आपल्याला पाहिजे तिथे मात्र या गाठी पडत नाहीत. जुळत नाहीत. पुढे आयुष्यभर त्या जागा रिकाम्याच राहतात. जाणवतच राहतात. हृदयाचा एक कप्पा त्यांना द्यावाच लागतो. पुढे आयुष्याच्या वाटचालीमधे जाणवतात त्या चुकामुकीच्या वेदना. वियोगाच्या यातना. नी हवेपणाचे थैमान, हे का जगणे..? नाही..नाही..नाहीच. श्रीसमर्थांना अपेक्षित ते हे जगणे नाही.

**..ग्रं चे पहिले पान..**

रामदूत वायुसूत भीमगर्भ जुत्पत्ती..
जो नरात वानरात भक्ती-प्रेम व्युत्पत्ती..

बघा-बघा..ग्रं चे पहिले पान. ग्रंथ कोणास अर्पण आहे..तर रामदूतांना. कोणी अर्पण केला आहे..तर वायुसूतांनी. कसे आहेत ते वायुसूत तर..भीमगर्भ-मल्ल-शक्तीने-युक्तीने परीपूर्ण तेजाळलेले. व्याप्त. महाविंशाल. व्यापक असे. लालन-पालन-संगोपन-मातेची कूस-पाळणा-खेळणा-अंक-म्हणिजे मांडी-स्तन्य-जोजविणे-ही सारी जु जु टाळून, हे सारे जोजवणे टाळून, ज्यांनी स्वतःस उत्पन्न केले. जुत्पत्ती-बीजपद्धती टाळून-त्यागून-जाणून व्युत्पत्ती. अशा त्या सुवर्णकटी कांसोटी अशा भीमगर्भाने लिहिलेला हा ग्रं आहे. लेचापेचा-दुबळा-अशक्त-औषध-गोळ्या-नको त्या पदार्थांची लालसा-वास्तू-वस्तू अशा दुबळ्या गोष्टींवर उभा असलेला नाही हा ग्रंथ. नी कुणाचा तसा तो नाहीही. नाहीच नाही. **कधीही विझेल अशा कमकुवत दिव्याकडून सूर्याची आरती होणारच नाही.** इथे तर सूर्यासच गिळणाऱ्यांची आरती आपणांस करावयाची आहे. आरतीचे ताट हातात धरतांनाही संधिवात उद्भवणारे, रक्तदाब वाढणारे, थरथर सुटणारे, नी खुर्ची आधार शोधणारे मूल शक्तीमान म्हणावयाचे का? पृथेचा आधार

तुटण्याचीच ही सारी लक्षणे. हे ही न जाणणारे असे जीव, किती किती किती दूर गेलो आहोत त्या मूळ ग्रं पासून. आरंभापासून. मुळापासून. मुळापासूनच जर तोड झाली तर मग वाढच खुंटली नां? नाही नाही असे होता कामा नये. ग्रंथ कळलाच पाहिजे. वाचता-लिहिता आलाच पाहिजे. यत्न तो देव जाणावा. बघा, हा तो भीमगर्भ. किती आत आत आत उतरले पाहिजे आपण या साऱ्याच्या अभ्यासासाठी. नी ऐकटे नाही नां आपण, श्रीसमर्थ आहेत नां. तळमळ तळमळ होतचि आहे..हे जन हाती धरी दयाळा..कल्याण करी रामराया..किती आतून..किती आतून..हे स्वर, हा भाव-अर्थ घेउन आलेत. श्रीसमर्थांच्या ह्रदयस्थ अंतःकरणातून आलेत. याचा अर्थ आपण तिथे, आत आहोत. त्या त्या अंतःकरणात. एवढ्याजवळ. याचा विचार हवाच हवा. किती आत आहोत, किती जवळ आहोत, तरीही जाणले नाहीच. नाही नाही..आता हे पांघरुण टाकले-फेकले-उडविलेच पाहिजे. निद्रा भंगलीच पाहिजे. अरे, आम्ही झोपेलेले पाहून काहीही सुरु झाले?आमचे आचार-विचार-आमच्या कुळपरंपरा-कुळाचा मान-संस्कार-संस्कृति-अक्षरमूल्ये-दिशा-मार्ग-राहणीमान-विचारसरणी-शैक्षणिक बाबी साऱ्या साऱ्यावरच कब्जा? प्रत्यक्ष युद्ध होऊन जाते. परंतु नंतर जी सामाजिक-वैचारिक इत्यादी बाबतची गुलामगिरी येते नां, ती प्रत्यक्ष युद्धाच्या परिणामांपेक्षाही घातक नी भयानक असते. नी अशा अनंत युद्धानंतरच्या गुलामगिरीची आपणां सर्वांना एवढी सवय झाली आहे नां की त्यात आपण हे 'रामदूत वायुसूत' सारे सारे विसरुन गेलो आहोत. ते सांगणाऱ्यास ते जाणवून देउ इच्छीणाऱ्यास नाकारण्याइतपत आपण बुद्धिहीन झालो. आपलेच खरे असे स्व केंद्रीत विचारही आपण करावयाला लागलो. समोरचे हिताचे आहे. आपल्याच हिताचे आहे हे कळत असूनही या गुलामगिरीने अहंकाराचा खोट्या प्रतिष्ठेचा रोग-आजार वाढविला. नी आपली सारी कोवळीकता-शुद्धता-धवलता खाऊन टाकली. आपण आपणांस तर जाऊच द्या. पण इतरही कोणास नी कशासही ओळखावयास तयार नाही. ओळखच संपली. **एकत्र राह्याचे पण एक असावयाचे नाही, असे संसार आज या पृथेच्या पाठीवर कितीतरी चालू आहेत.** नी

तसेच ते स्वतःस ओढीतही आहेत. पुन्हा खेद-खंत-विचार-मनन-अभ्यास, शून्य. प्रत्येकालाच स्वमर्जीने जसे हवे तसे जगावयाचे आहे. त्याकरीता तो काय वाट्टेल ते करावयाला तयार आहे. वैध-अवैध-विधी-निषेध नाही. यास का प्रगती म्हणावयाची? कुठे चाललो आहोत आपण. तर खचितच आपण आपल्यापासूनच दूर दूर चालो आहोत. पुन्हा आपण आपल्या जवळ येण्यासाठी आपली आपणांशी गाठ पडण्यांसाठी ती ग्रंथी-ती गाठ उकलण्यासाठी श्रीसमर्थांनी ग्रं या शब्दापासून, यास शब्दच म्हणावयास हवे. कारण हा पंचसूत्रीचा अर्थगर्भ प्रवाह आहे. हे आपण पाहतच आहोत. वास्तविक दृश्यामधे ते एकच ग्रं असे अक्षर दिसते. पण आत लपलेले शोधणे. दडलेले गवसणे. हाच तर खेळ आहे. हीच तर लिला आहे. हेच तर ते विश्वनाट्य आहे. नी आपण बाहुली नव्हे तर आपणच ते सूत्र नी सूत्रधारही आहोत. वेगळे नाही. अन्य नाही. या सर्वाचा उद्भव-उद्बीज म्हणून, नेहमीप्रमाणे श्रीगणेश वंदना न करता श्रीसमर्थांनी आधी ही ग्रं वंदना-ही ग्रंथवंदना आपल्या श्रीग्रंथराज दासबोधात योजिली. कारण या आतील ग्रंथी उकलल्याशिवाय का ज्ञान होणार. त्या सुखकर्त्या दुःखहर्त्याचे रुप समजून येण्याकरीताच आपणांस हे ग्रं सूत्र, ही योजना अभ्यासावयाची आहे.

## ..ग्रं सूत्ररचना उकल..

आता हे ग्रं सूत्र कुठे कसे चालते याचाही विचार होणे गरजेचे आहे. कुठलीही गोष्ट जर समोरासमोर धरली. म्हणजे दोन माणसे जर समोरासमोर उभी राहिली. तर एकाचा उजवा नी त्याच दिशेचा दुसऱ्याचा डावा हात समोरासमोर येईल. नी मग ही संधी होउ शकत नाही. संधी साठी सारे सम लागते. सारी परिस्थिती-वातावरण-अभ्यास-विवेक सारे सम हवे. संधी म्हणिजे एकसारखे असे समोरासमोर. जसे स्वस्तिक चिन्हाची द्वितीयावस्था म्हणिजे अधिक. आपल्या दृष्टीने अधिकाचे चिन्ह + हे असे. या अधिक चिन्हाची एक गंमत आहे. कशी हे जर बघावयाचे झाले तर, अगोदर वहीवर अधिक चिन्ह काढावे. आपण वही वर या अधिक चिन्हाकरीता प्रथम जी रेघ आखतो ती अगोदर उभी काढतो की आडवी यावर ही सारी गंमत

अवलंबून आहे. जर उभी अगोदर काढली तर आपण चैतन्याचे प्रार्थी आहोत असे समजावे. नी जर आडवी अगोदर काढली तर आपणांस अजून चैतन्याची ओढ लागलेली नाही असे समजावे. अशी या स्वस्तिक चिन्हाची द्वितीयावस्था म्हणिजे एका सारखा दुसरा म्हणिजे समच. म्हणून एक डावा-एक उजवा अशी ही संधी होउ शकणार नाही. फुगडी पद्धतीने जर हात धरले तर मग उजवा उजव्याशी व डावा डाव्याशी निश्चितपणे सम येईल. सव्य नी वाम या शक्तींना एकत्र आणणारी-एकत्र करणारी ही पहिली गांठ-पहिली संधी-पहिली भेट-पहिली ग्रंथी.

ग्रंथी म्हणिजे काय, तर गाठ. हिची उकल जरा बघू या..ही गाठ जर अंगावर म्हणिजेच शरीरावर आली तर यास व्याधि असे संबोधन आहे. ही गाठ मनावर आली तर तेढ बसते. म्हणिजे आपल्याला लागेल असे कोणी बोलले, तर ही गाठ बसते. नी ती सुटता म्हणून मग कधीच सुटत नाही. कुणी कितीही प्रयत्न केले तरी. ही गाठ चित्तावर आली तर समज येते. शत्रुंमधे आली तर ठो ठो होते. मित्रांमधे आली तर खो खो होते-हसणे या अर्थाने. मैत्रिणींमधे आली तर गट्टी जमते. प्रारब्धावर गेली तर उजळते. कर्मावर गेली तर विचार सुरु होतो. यत्नावर गेली तर यशप्राप्ती. पंचमहाभूतांसी पडली तर मैत्र होते. वीरता-प्रताप-शौर्य यांसी पडली तर शक्ती प्राप्ती. वृक्षासी पडली तर वृद्धी. फुलासी पडली तर उमल. फळासी पडली तर रसभान. मीठासी पडली तर रुची. पाण्यासी पडली तर निर्मळ. आकाशासी पडली तर व्यापक. सरिता-नदीसी पडली तर वहन. समुद्रासी पडली तर गाज. लाटांसी पडली तर उचल. थेंबासी पडली तर उस्फुर्त. श्रीसमर्थांनी श्रीग्रंथराजात तर या दरी-धुकुंटासही मानाचे स्थान दिले आहे. या अणु-रेणु तुषारांनी श्रीसमर्थांना मयूर नर्तनातील आनंद दिलेला आहे. काठासी जर ही गाठ पडली तर विचार. घाटासी पडली तर पर्वणी. नौकेसी पडली तर मध्य. पूर्वेसी पडली तर उत्तर. दक्षिणेसी पडली तर पश्चिम. **म्हणिजे पूर्व बुद्धीने उत्तर गवसेल. नी पश्चात्तापाने दक्षिण चुकेल.** अध म्हणिजे पृथेसी पडली तर बीज सापडेल-मुळ गवसेल. उर्ध्वसी पडली तर स्तर लाभेल. बीजासी पडली तर ज्ञान होईल. ज्ञानासी

पडली तर जाणिव. जाणिवेसी पडली तर विवेक जागेल. विवेकासी पडली तर भान येईल. हेच भान स्मृतिसी गेले की जागृति. हिच जागृति अवस्था. आपणांस जन्मोजन्मीचे भान-जाण देणारी असते. कशा या गाठी कुणाच्या कुणाशी कशा पडल्या म्हणिजे काय प्राप्ती आहे बघा. कशी आहे या श्रींच्या ग्रं ची योजना.

आपण पूर्व-पश्चिम-दक्षिण-उत्तर या दिशांबाबत थोडा तपशील पाहिला. बाकी उपदिशांना श्रीसमर्थ साद असे म्हणतात. नी आपण प्रतिसाद स्वरुपात स्वतःस संबोधायचे. या दिशांना आपण म्हणिजे जीव हा प्रतिसाद स्वरुप होय. अग्नेय-नैऋत्य-वायव्य-इशान्य हे आपले संशोधन. परंतु श्रीसमर्थ यांस **अ उ म स** असे संबोधितात. कारण अ म्हणिजे आधार. अ म्हणिजे नकार-नाही या अर्थी. या अ कार दिशेने जर जीव ज्ञान घेत गेला, म्हणिजे प्राण गेला या अर्थाने नव्हे, तर जीव या मार्गाने ज्ञान मिळवित चालिला, तर त्यास या अ काराचे इंगित कळते. याची फोड करावयाची, तर श्रीवेदोनारायण ज्या मार्गाने जीवापर्यंत आले. तो मार्ग म्हणजेच प्रेरणामार्ग होय. याच प्रेरणामार्गाने जर जीव चालला तर त्यास जो पंथ लाभतो तो म्हणिजे अकार होय. जसे हेच जर आपल्या बुद्धीपातळीवर समजून घ्यावयाचे झाले तर बघा-एखाद्या नात्यातील फोलपण आपणांस समजले, त्या नात्याचा काही अनुभव आपणांस हवा तसा आला नाही, की जो येतो, तो अनुभव. तेच आपल्या बाबतीत त्या नात्याचे ज्ञान. नी मग आपण म्हणतो की, कोणी कोणाचे नाही. कोणी कोणाचे नसते. याचा अर्थ, आपण ते नाते नाकारतो. प्रथम स्वीकारुन नी नंतर अनुभवाने नाकारुन असे. हाच तो अ कार मार्ग. म्हणिजेच हा अ होय. हा अ कार म्हणिजेच नकार. याचा अर्थ आपण जे समजतो, ते तसे नाही. असे एकएक नाकारीतच जीवास पुढे जावे लागते. या नकार म्हणिजेच अकार पंथातूनच तो हुशार होत जातो. पुन्हा आपल्या बुद्धीपातळीवरुन जर सांगावयाचे तर, दिसते तसे नसते म्हणून जग फसते. हा आपला अ कार मार्ग. थोडक्यात नेति नेति चे ज्ञान, म्हणिजेच सांगता येत नाही. श्रीपरमेश्वराचे वर्णन करण्यास वाचा नाही. शब्द न सुचणे-न सापडणे-न गवसणे-वर्णनातीत-

अवर्णनीय-वाचा मुग्ध-न वर्णवे तेथिची शोभा-तेथील प्रमाण नेणवे वेदांसी..ते जीवजंतूसी केवी कळे. या अवस्था होणे म्हणिजेच नेति नेति..अनुर्वाच्य. असे जे ज्ञान आहे ते सारे ज्ञान या अ मार्गाने म्हणिजेच कोनमार्गाने जीवास झालेले आहे. परंतु अज्ञानवश जीवास त्याचे स्मरण नाही. जसे आपले कोणी नाही-कोणी जाणित नाही-कोणाला जाणिव नाही-काही खरे नाही-काही भरवसा नाही, हे असे सारे प्रकार हे अ मार्गाचे धावे आहेत. यासच आपण म्हणतो की शेवटी काय? तर काही खरे नाही. कोणी कोणाचे नाही. म्हणिजेच न कारातून शिक्षण घेणे. हेच अ कार शिक्षण होय.

आता दुसरी दिशा-उ म्हणिजे शक्ती. म्हणिजे श्रीउमा. स्वतःस स्वतःची उमज पडून आलेली-झालेली-जाणिलेली-ओळखिलेली-समजलेली सर्व शक्तीमान अशी अवस्था. तपःश्चर्येने प्राप्त करवून घेता येणारे हे स्थान. हे कठीण-खडतर-अवघड-दुष्प्राप्य-दुर्लभ परंतु तरीही ते साध्य होणारे असेच आहे. यास निर्धार मात्र हवा. कडक धोरण असते आईसाहेबांचे. श्रीभवानी-श्रीकाली-श्रीचामुंडा-श्रीडाकीनी-श्रीउटंबिनी-श्रीभेदिनी-श्रीकंकरी-श्रीउत्फाट-श्री-हुं-श्रीधृधृ-श्रीफट्. बघा ही स्थाने कोणाच्या कुलदेवता असतील? तर कोणाच्याच नाहीत. असे हे उ स्थान आपल्या शरीरावर, म्हणिजेच अंकावर म्हणिजे मांडी घालतो तेथे आहे. गुडघा म्हणिजे जानु-पोटरी-अंक या कोन संधीशी हे स्थान आहे. म्हणून तपश्चर्येतही ही मांडी घालण्याची मुद्रा महत्वाची असते. किंबहूना हिच मूळ बैठक समजली जाते. नी पत्नीस्थान शक्तीस्थान हे ही या संधीशीच दाखविले जाते. प्रकृतिस्थानी म्हणिजेच वामांगी हे स्थान निर्देशित केले आहे.

आता तिसरी दिशा-म. हे स्थान-श्रीमहेशांचे. हे हृदयग्रंथींशी निगडीत असे क्षेत्र आहे. याचे तशा अर्थाने क्षेत्रफळ म्हणिजे लांबी-रुंदी या अर्थाने नव्हे, तर कर्माचे फळ या अर्थाने क्षेत्रफळ विशाल आहे. हे आपले श्रीकुलस्वामीस्थान आहे. श्रीसमर्थ सांगतात-

माझा कुलस्वामी कैलासिचा राजा..भक्ताचिया काजा पावतसे..

जाळू शके सृष्टी उघडीता दृष्टी..तेथे कोण गोष्टी आणिकांची..
आणिकांची महती शंकरा खालती..वाचविली क्षिति दास म्हणे..
अशा प्रचंड शक्ती-युक्ती-विवेकाचे हे उरारंभ स्थान आहे. कारण ग्रहण करणे ही शक्ती आहे. ही ग्रहणशक्ती तीव्र असण्याकरीता तेवढेच तीव्र नी बलवान सूत्रकुळ हवे नां. ग्रं ही ग्रंथी हृदयाशी निगडीत आहे. ही संधी बुद्धीपेक्षा हृदयाशी जास्त जवळीकेत आहे. याचाही अभ्यास अर्थात आहेच. की बुद्धीपेक्षा हृदयाचे स्थान मग सर्वार्थाने उंचीचे म्हणावे लागणारच. असे हे स्थान जेवढे कोमल तेवढेच धूर्त. धूर्त म्हणिजे आपला प्रचलित अर्थ येथे घेउ नये. तर धवलता, ज्याचे जवळी आर्त होउन-तृर्षात होऊन पायी लागते, अशी शुचिता. परमशुचिता. धवलारीस्थान. असा तो धूर्त. सर्व प्रकारे पारदर्शक असा. पारा-स्फटीक-हिम-दुग्ध, हे यांमुळेच या म स्थानी या महेशस्थानी दर्शविले जातात. श्रीमहेशांस हे प्रिय, असे आपण म्हणतो-समजतो. नी इतके शुद्ध-इतके धवल-इतके पारदर्शक-इतके सात्विक-इतके आर्त-इतके निर्मळ-इतके शांत असे हे महेशस्थान म्हणूनचं जिंकण्यास म्हणिजेच प्रसन्न करुन घेण्यास अत्यंत कठीण असे आहे.

आता चौथी दिशा-स. म्हणिजे यत्न. श्रीसिताकांत. यत्न तो देव जाणावा. ही यत्नाने सारे प्राप्त करुन घेण्याची शक्ती ज्यांपासून जीवास प्राप्त होते ते हे श्रीसिताकांत स्थान होय. शांत-निवांत-स्वबळावर-स्वयत्नावर-स्वतंत्र-स्वप्रज्ञा-स्वमेधा-स्वजाण-स्वअभ्यास याच गोष्टीने जीवास झेपावणे सोपे जाते. या अशा सर्व गुणांचा समुच्चय केवळ श्रीरामरायांचे चरणी. श्रीरामरायांचे अधीन आहे. प्रयत्ने वाळूचे कण रगडीता तेलही गळे. केवढा हा यत्नाचा-प्रयत्नांचा अधिकार मोठा आहे. म्हणून नशिब-प्रारब्ध हे देखील पुसून लिहिता येण्याएवढी शक्ती जीवाच्या या यत्नभागात दडलेली-लपलेली-गुप्त आहे. नी त्याची त्यास जाण मात्र नाही. स हे स्थान अशा खडतर शक्तीचे आहे. म्हणून बऱ्याचशा बाबतीत स अक्षर हे जन्माक्षर असणाऱ्यांना थोडे कष्टप्रद आयुष्यास सामोरे जावे लागते. परंतु वास्तवात तसे हे खडतर नाही. 'सर्वात वरचा स'. हा वेगळा स बरे का..हा ज्ञानमार्गातील स. बघा-प्रतिभेस-जाणिवेस-ज्ञानास-पत्नीस-

पतिस-ऐश्वर्यास-जीवनास-फलास, सौभ्याग-सह-सोबत-स्वतंत्र-संगीत, बघा स लागल्याशिवाय ज्यास ते प्राप्त नाही. आपण बोलतानाही म्हणतो मग अ स झालं नी मग त स झालं. हे काय आहे 'अस तस'? हे काय सूत्र आहे? अस म्हणिजे, अ ला स लागला की अ चे वर्णन. नी तस म्हणिजे त ला स लागला की त चे वर्णन. गूढ आहे हे. नी तेच श्रीसमर्थ आपणांस सांगणार आहेत. सांगत आहेत. मन लावून-चित्त देउन ऐकावयाचे आहे. अवलोकावयाचे आहे. विश्वासावयाचे आहे. कारण ज्ञान झाले की या सान्या फसव्या-खोट्या-भ्रामक-हलक्या समजुती फोल ठरतात-निघून जातात. नी उरते, ते शुद्धज्ञान. धवल नी धूर्त असे. युक्तीची खोली. प्रत्यक्ष शस्त्र न धरीता जिंकण्याचे ज्ञान. प्रत्यक्ष युद्ध न करीता स्वतःस जाणून जिंकलेल्या फौजा. स्वर्गीची लोटली जेथे..रामगंगा महानदी..तीर्थासी तुळणा नाही..आनंदवनभुवनी.., हे जे श्रीसमर्थांनी पाहिलेले आनंदवनभुवन आहे नां, ते या चारही स्थानांना अ उ म स यांस संबोधूनच सांगितलेले आहे. हे कोन आहेत. कोन म्हणिजे आधाराने एकमेकांसमोर असून फुगडी पद्धतीने एकत्र आल्यावर प्राप्त होणारी-मिळणारी-लाभणारी संधी. संधीने-कोनाने प्राप्त होणारे ज्ञान या चारही बाजूंनी चारही दिशांनी प्रवाहित होत असते. मग आपणांस वाटेल की पूर्व-पश्चिम यांचे काय? तर त्या पृथेकरीता दिलेल्या दिशा आहेत. तेजाचे वहन नी कर्माचे वहन, प्रकाश-अंधार-तम-ज्योति-मृत-अमृत या गोष्टींकरीता दिलेल्या त्या जागा होत. दिवस-रात्र, पाठ-पोट, आसक्ती-विरक्ती, द्वैत-अद्वैत, भाग-विभाग यांकरीता दिलेल्या जागा. नी या, ज्या आपण पाहत आहोत त्या कोन दिशा. मुक्तीच्या दिशा. ज्ञानाच्या कक्षा होत. या अ उ म मधूनच आपल्या पूर्वीच्या ऋषि-मुनींनी ॐ कार स्वरुप शोधिले. ते याच अ उ म स मार्गाने. श्रीसूर्याची सव्य-वाम नी जीवाची सव्य-वाम असे फुगडी पद्धतीने, अशी ही समसंधी. तसे रोजच आपण या श्रीसूर्यासमोर असतो. या संधीचा लाभ करुन घेणे म्हणिजे ज्ञान होय. म्हणिजे जसे कळावयाकरीता बघू की, श्रीअंगराजकर्ण रोज श्रीसूर्यांना अर्घ्य देत असत. श्रीसूर्यांचे आगमनपूर्व जलात उभे राहून नामस्मरण करणे. नी त्यांच्या आगमनानंतर ते माथी

येईपर्यंत हा जलाभिषेक करीत राहणे. श्रीसमर्थांनी देखील श्रीक्षेत्रनाशिक येथे श्रीनंदीनी-श्रीगोदामाता यांचे संगमपात्री असाच श्रीसूर्यांस जलाभिषेक केला. थोडा थोडका नव्हे तर तब्बल १२ वर्षे. श्रीसमर्थांच्या जन्मकाली याच श्रीसूर्यांनी श्रीसमर्थांच्या पिताश्रींना दर्शन देऊन, पोटी पुत्र येणार असल्याची शुभवार्ता दिधली होती. म्हणूनच त्या श्रीसूर्यांच्या उर्जास्त्रोतात आपलाही वन्ही चेतविण्याचे ज्ञान जीवास या संधीने होऊ शकते. जसे आपण फुगडी खेळताना फूफू..फूफू असा उच्चार करतो. तेथे टूटू..भूभू असा काहीही इतर उच्चार करीत नाही. तर फूफू..फूफूच का? तर फू या अक्षर उच्चाराने ज्या अग्नीचे वहन आतून होते ते अग्नीचे शांतरुप होय. तो शांतवन्ही होय. थोडक्यात निरांजनातील वात. म्हणूनच ही फुगडी पद्धत म्हणिजे हे अरणीचे माध्यमातून अग्नी-वन्ही चेतविणेच नव्हे काय? नव्हे नव्हे तेच ते. अरणी म्हणिजे यज्ञाचे वेळी या प्रकारातून अग्निस उत्पन्न केले जाते. ही अरणी-हे काष्ठ फुगडी पद्धतीने घेउनच त्याप्रसंगी घासावे लागते. नी अग्नीस उत्पन्न करावे लागते. अशा या अग्नीचे एकुण सात प्रकार आहेत. त्यातील यज्ञ हे चौथे प्रगटस्थान होय.




**अग्नी प्रगटीकरणाचे प्रथमस्थान. पहिले अंशस्थान, म्हणिजेच श्रीसमर्थांचे लाडके स्थान तो श्रीवन्ही.** बघा-श्रीफळाचा एक उंचच उंच गेलेला वृक्ष नी जमिनीलगत येणारी लव्हाळी. एक अति उंच नी एक जमिनीलगत. असे दृश्य डोळ्यांसमोर आणा नी आता पहा..श्रीसद्‌गुरुचरणे नी श्रीभक्तमस्तक यांचे संयोगस्थान. येथे हे या श्रीवन्हींचे-श्रीअग्निदेवतांचे प्रथम प्रगटस्थान आहे. **द्वितीयस्थान**-श्रीसेवा नी श्रीसौभाग्य. **तृतियस्थान**-श्रीस्मृति नी श्रीग्रंथी. **चतुर्थस्थान**-श्रीयज्ञवेलास्थान वर दिलेच आहे. **पंचमस्थान**-प्राण नी पंचमहाभूते. **षष्ठमस्थान**-ग्रहण नी स्मरण. **सप्तमस्थान**-जीवाचे गंतव्यावेळचा अग्नी. म्हणिजेच स्मशान. येथेच श्रीसमर्थ

म्हणतात वन्ही तो चेतवावारे चेतविताचि चेततो. अग्निची पूर्ण ओळख श्रीसमर्थ आपणास सांगत आहेत. करुन देत आहेत. याच अग्निची ओळख श्रीश्रीगजानन महाराजांनी म्हणिजेच श्रीसमर्थरुपाचे तृतिय प्रगटीकरण. कसे ते बघा-प्रथम प्रगटीकरण चिरंजीव स्वरुप श्रीश्रीकपिवरमहाबली अंजनीकुमर..श्रीश्रीहनुमंतस्वामिमहाराज. तद्नंतर आवेश-प्रवेश-त्वेष धारणा श्रीश्रीसमर्थ रामदासस्वामिमहाराज नी तद्नंतर प्रगट-सूक्ष्म-गुप्त-गूढ-मौन्य-पूर्णभानु म्हणिजेच श्रीश्रीगजाननमहाराज.

हर्नुमंतों महामुने..महासिद्धाय अद्भुते..
रामदासाय वरिष्ठाय..गजाननाय नमोस्तुते..

**हिच ती श्रीहनुमंतवेला...गगनावेरी गेलेली. ब्रह्मांडा भोवते वेढे..स्वपुच्छे घालवू शके. काय शक्तीचे अफाट असे वर्णन आहे हे. कोणाचे असे कधी नाही..नसेल..नसणारही. श्रीस्वामी चिरंजीव नी श्रीसेवकही चिरंजीव. असे हे श्रीगुरु-श्रीशिष्य समोरासमोरी संवादास बैसिले. नी प्रथामाक्षर उच्चारिते जाहले तेच हे मग्रंफहोय. स्वतः अवलोकीलेले-जाणिलेले-अभ्यासिलेले नव्हे तर निर्मिलेलेच. आपणांस सांगत आहेत.** काय कारण या एवढ्या प्रेमाचे ? हे एवढे गौप्यगुज सांगण्याचे ? याचा तरी किमान शोध-समज- यावरुन तरी काही बोध आपण घ्यावयास हवा नां? पण अशा थोर तळमळीच्या आपल्याच वरिष्ठांना-श्रेष्ठांना-मुख्यदेवांना-विश्वात्मकदेवांना नाकारण्याचा,स्वीकारतानाही शंकेचा-स्वीकारुनही संभ्रमाचा नी पुन्हा कुणी वेगळ्याच शंका उपस्थित केल्या तर त्यावर तोडीचे काहीच ज्ञान स्वतःजवळ नसल्याने त्या अप्रस्तुत विषयासच सत्य मानून अर्ध्या अर्धवट अवस्थेतच चांगले हाताशी आलेले मूळसुत्र, ग्रं सूत्र, आरंभसूत्र, आरंभावस्था, आरंभाख्यान अशा या साऱ्याचा काहीही विचार न करताच ते सोडून देणारे आपण. पाचवी पूर्वीची चतुर्थी सोडून, पुन्हा शून्य 0 अवस्थाच नाही का ही. काहीचनाही या अवस्थेपासून पुन्हा शून्य या अवस्थेप्रत म्हणिजे मृत्यूच. तद्नंतर जर त्वरितच नरजन्म मिळाला तर पुढील प्राप्ती. नाहीतर अनंतयोनी प्रवाहांच्या याच खाचखळग्यांमधून वाहत राहण्याचा-वाहत जाण्याचा-प्रवाह पतित होण्याचा

गुन्हा आपणां कडून घडत राहील. बऱ्याचवेळा हा गुन्हा आपण करतो-करतो आहोत-करुही. परंतु असे इतःपर व्हावयास नको. आपल्या हातून, आपणच बसलेली फांदी आपणच तोडली तर? श्रीकल्याणांना वाचविणारे श्रीसमर्थ आहेत. आपणांस तर ती जवळीक-ते शिष्यत्वही राखिता आलेले नाही. तसे शिष्य अजूनी होता आले नाही. संधी असूनही ही उ म स नाही. अ उ म स याचाच अर्थ कुठल्याही गोष्टींची काहीही जाणिव नसणे. अ उमस-जाणिव नाही.

श्रींनी श्रीकल्याणांना कल्याण हे नाव या फांदी-शाखा लिलेवरुनच दिले नां? बघा-एकदा श्रीरामोच्छ्वासाठी श्रीरामध्वजा घेउन फौजा जात असतांना एका श्रीवृक्षराजाची एक शाखा-फांदी मधे आली, आता श्रीरामध्वजा तर खाली घ्यावयाची नाही. नी आडवी आलेली फांदी तर तोडावयाची. मग कोण तोडेल ती फांदी?अशाप्रसंगी श्रीसमर्थांनी श्रीकल्याणांना, ती मधे येणारी फांदी तोडण्याचे आदेश दिले. पण कसे? तर कल्याणा, तू फांदीवर बैस नी ती फांदी मुळापासून तोड, असे सांगते जाहले. परिणामी काय? तर श्रीकल्याण ती फांदी तुटून तिजबरोबरच विहिरीत पडले. जयघोष करीत-विजयघोष करीत फौजा श्रीरामोच्छ्वासाठी पुढे सरसाविल्या. नी श्रीकल्याण? त्यांचे काय? पण श्रीसमर्थांचे ते शिष्य. श्रींनी ज्यांचा अंगिकार केला ते तुटणारे नाहीतच. ते पडणारे नाहीतच. न कधी मागे पडतील. न अडखळतील. न कर्म गाठोड्यात अडकतील. सदामुक्त. कधीच कशानेच न तुटणारे असे अतुट. ते तर जोडणारे. हृदये जोडणारे. संवाद जोडणारे अक्षांश-रेखांश. हेच ते श्रीसमर्थांचे तंतू. वैश्विक धर्मप्रसारासाठी अवघ्या पृथ्विभर-ब्रह्मांडाहीपर पसरलेले. नी एकमेकांपासून विलग-अलग-दूर नसलेले. फांदीवर बसणारा अंबाजी. श्रीसमर्थांनी त्यांचे पूर्ण कल्याण केले. श्रीरामरायांचे दर्शन घडविले. फांदीवरुन पडला. मुळापासून सुटला. नी मुळारंभाशी जोडला. ही ऐक्यजोड-हा मुळारंभ श्रीसमर्थ सर्वत्रांस देऊ इच्छितात. येथे फांदी-कोणाच्या मधे येत होती?**याचा थोडा आत जाउन अभ्यास करावयाचा, तर आपण नी आपले भाग्य, यामधे येणारी फांदी, आपण कशी तोडावी याचेच ज्ञान श्रीसमर्थ आपणांस देत**

**आहेत नां.** तर आपणा जवळही ते घेण्याचे-घेऊ इच्छिण्याचे इच्छासूत्र हवे नां? त्या वेळच्या त्या लिला. असे म्हणून सोडून देण्यात अर्थ नाही. किंवा असे घडले असेल का? अशाही तर्काकडे आपण वळायाला नकोच. आपण मुळ विषयापासून-मूळशक्तीपासून एवढ्या लांब अंतरावर गेलो आहोत की साऱ्याविषयीच आता आपणांस शंका यायला लागली आहे. नी हे फारच घातक आहे. ही उमसही आपणांस उरलेली नाही हेच खरे. काय करावयाचे? एखादी गोष्ट खूप लांबून पाहिली तर ती एकतर दिसत तरी नाही. किंवा ती अंधुक-अस्पष्ट-धूसर अशी दिसते. नी मग त्या गोष्टीविषयी अंदाज करावा लागतो. बरे अंदाज करावयासाठी त्या नेमक्या गोष्टीविषयी काही माहिती असावयास लागते. ती तशी माहिती नसेल तर कसला अंदाज? नी कुठली ओळख? तसेच आपण त्या मूळ वस्तूपासून-सत्यापासून-यत्नसाध्य गोष्टींपासून फार..फार लांब गेलो आहोत. जवळ आणणारा-जवळ नेणारा नी जवळ जाणारा यांची गाठ-ग्रंथी-संधी-ग्रं एकत्र यायला हवेत. तेच श्रीसमर्थ एकत्र करीत आहेत. एकत्र आणित आहेत. अशी ही गाठ-ग्रंथी स्मृतिंशी पडली तर जिंकले म्हणावयाचे. सारे सारे आठवले. मग आटोपलेच-संपलेच कर्मगाठोडे. आपणच परब्रह्म.

श्रीसमर्थांनी याच ग्रंथीची गाठ आपल्या श्रीकुबडीने-ज्यास श्रीसमर्थ श्रीरामवेला संबोधित असत. त्या श्रीरामवेलीने एका मोळी विकण्याचा व्यवसाय करणाऱ्याची ही ग्रंथी कशी उकलली हे थोडके पाहू या-श्रीग्रंथराज दासबोधाचे वाचन एक भक्त श्रीक्षेत्रवाराणसीसी श्रीगंगेच्या काठी बैसोन करीत होता. तेथील ब्रह्मवृंदांनी हे पाहिले. नी हा प्राकृतातील ग्रंथ कोणाचा? काय आहे त्यात? इत्यादी बाबत, त्या ग्रंथाचे वाचकाकडे पृच्छा केली. वाचकाने सविनय सांगितले की हा ग्रंथ श्रीसमर्थांचा-श्रीरामदासांचा. श्रीवृंद वदले, कोण हे समर्थ? संस्कृतचे प्राकृत करणारे. काय अधिकार यांचा जरा बघू या. त्यांसी आम्हास हे सारे पुशिले पाहिजे. म्हणून श्रींना त्या स्थली पाचारण करण्यात आले. नी यातील चर्तुदश भुवने-ब्रह्मोद्भव आदी गोष्टींबाबत उलगडा करावा, असे सांगितले. नी उलगडा जर करता नाही आला, तर सदरहू ग्रंथ बंद करा ऐसेही बोलिले. श्री वदले, वाद तर

आमुचा प्रांत नव्हे. संवाद आम्हासी प्रिय. परंतु आपुले म्हणणेही आम्ही विचारात घेतो आहोत. असे वदून श्रींनी श्रीकल्याणांना आज्ञापविले, की तो समोरुन जो मोळी विकणारा जात आहे. त्यास बोलावून आणावे. श्रीकल्याणांनी तैसे केले. त्यावेळी श्रींनी त्या मोळी विकणाऱ्यास त्याचे नाव विचारुन, तू काय करीतोस इत्यादी तपशील विचारला. तेव्हा त्याने तो मोळी विकण्याचा व्यवसाय करीत असल्याचे श्रींना सांगितले. श्रींनी श्रीकल्याणास आपल्या कुबडीने एक रेघ आखावयास सांगून त्या मोळी विकणाऱ्यास त्या रेघेपुढे बोलाविले. नी विचारीते जाहले, आता सांग तू कोण आहेस? तेव्हा तो वदला की मी एक अजाण आहे. काहीही ठावकी नसलेला जीव. पोट भरण्याचीही भ्रांत. म्हणून मी काही विचित्र गोष्टींचा संग्रह केला नी त्यामुळे पुढे कठीण काळ भोगणे आले. पुन्हा श्रींनी श्रीकल्याणास आपल्या कुबडीने एक रेघ आखावयास सांगून त्या मोळी विकणाऱ्यास त्या रेघेपुढे बोलाविले. नी विचारीते जाहले, आता सांग तू कोण आहेस? तेव्हा तो वदला की मी एक असा जीव आहे, की पैसा हेच सर्वस्व मानणारा. नी त्यायोगे मी माझे बहुत नुकसान करुन घेतिले. नी खऱ्या सुखास आंचावलो. पुन्हा श्रींनी श्रीकल्याणास आपल्या कुबडीने एक रेघ आखावयास सांगून त्या मोळी विकणाऱ्यास त्या रेघेपुढे बोलाविले. नी विचारीते जाहले, आता सांग तू कोण आहेस? तेव्हा तो वदला की मी एक असा नर आहे की ज्याने धर्म-अधर्म काहीही विचारात न घेता, जो खाउ घालील त्याचेकडे राहण्याचे पाप केले आहे. नी स्वतःची सुटका करुन घेण्याऐवजी अधिकच गुंतण्याची शिक्षा भोगीत बैसिलो. पुन्हा श्रींनी श्रीकल्याणास आपल्या कुबडीने एक रेघ आखावयास सांगून त्या मोळी विकणाऱ्यास त्या रेघेपुढे बोलाविले. नी विचारीते जाहले, आता सांग तू कोण आहेस? तेव्हा तो वदला की आता मी एक असे सूत्र आहे की ज्याने खरे सूत्रच जाणिले नाही. उलट त्या सत्य सूत्राचीच मी अवहेलना केल्याने पतन पावलो. पुन्हा श्रींनी श्रीकल्याणास आपल्या कुबडीने एक रेघ आखावयास सांगून त्या मोळी विकणाऱ्यास त्या रेघेपुढे बोलाविले. नी विचारीते जाहले, आता सांग तू कोण आहेस? तेव्हा तो वदला की आता

मी स्वयंब्रह्म आहे. आतापर्यंत हे सारे थक्क होउन पाहणाऱ्या श्रीब्रह्मवृंदाकडे वळून पाहत श्रीसमर्थ वदले, हे ब्रह्मवृंदांनो-हे भूदेवांनो आता या ब्रह्मरुप अशा श्रीब्रह्मदेवांशी आपण संवादावे. नी आपुले सृष्टीरचनेविषयी जे शंकीत मन होत आहे, त्याचे निर्शन करुन घ्यावे. काय बोलणार ते ब्रह्मवृंद?अवघी वैखरी जेथे मुग्ध. अवघी वैखरी तयांपुढे मौन्य धारण करती जाहली. प्रत्यक्ष ज्ञानाचे हे प्रगटीकरण कुणास शक्य आहे?वाचलेले बोलणे वेगळे नी त्याचा प्रत्यय घेउन ते प्रत्ययास आणून देणे? हे आपल्या बुद्धीपलीकडील सूत्र आहे. हे तो श्रीकपिवरांचे देणे. एका मोळी विकणाऱ्यास श्रीरामवेलीने-श्रीकुबडीने एकएक रेघ रेखाटत पुढे पुढे बोलावित श्रीसमर्थांनी कीती पुढे नेले? थेट श्रीब्रह्माजवळच. प्रत्यक्ष तोच तो, ते ब्रह्मस्मरणचि दिधले नां त्यास. आपण जे ब्राह्मण-क्षत्रिय इत्यादी प्रकारीचे समजतो तसे हे स्मरण नव्हे. तर सुरवातीस ब्रह्मपालनाने पावन असा जीव क्षणकाल संभ्रमात गेला. नी कसे पतन होउन, काय दुःख भोगिता झाला. हे सत्यचित्र तेथ दाखविले. पतनानंतर पुन्हा मूळमार्गावर येण्यासाठी केलेल्या खटपटीत-संघर्षात-स्वतःच सत्ता-स्पर्धारुप जिंकण्याच्या नादात मुळच विसरल्यामुळे-मुळारंभच ठावकी नसल्यामुळे त्या श्रीपरमपित्याचेच विस्मरण जाहले. नी सारे दुःख-भोग त्या विस्मरणामुळे पाठी लागले. त्यामुळेच जया ऐवजी पराजय. पराजयातून नैराश्य. नैराश्येतून हे पतन. पतनाने क्रोध. क्रोधातून अहंकार-सूड-गर्व सारे सारे एकत्र येउन एका जीवास कोसळविते झाले. अशा पतित जीवास श्रीसमर्थांनी पुन्हा स्वजाण देउन सर्वांसाक्ष दिव्यधाम दिले. श्रीश्रीगजाननमहाराजांनी देखील श्रीभास्कर पाटलांना असेच 'हरहर' या चतुर्थाक्षरात श्रीवैकुंठास पोहोचविले. श्रीहरीचा पाहुणा केले. इसवीसन १६ वे की १९ वे असे शतक मोजीत न बसता सत्य जे तेव्हा होते..आहे, तेच आत्ताही अनुस्युत आहे. ते जसेच्या तसेच आजही आहे. आपणच विसरलो. तेच स्मरले पाहिजे. एवढेच यातून उमगावयाचे आहे. अशी ही गाठ आपली आपल्याच स्मरणग्रंथीशी पडली पाहिजे. ती बांधलेली आहेच. पडलेली आहेच. फक्त आठवत नाही. कुंठे-कुणाशी-कधी-कशी-किती काळपर्यंत-नी का पडली, तेवढेच फक्त आठवत नाही.

त्यामुळे जगण्यात रामच नाही. ते श्रीरामसूत्रच सापडले नाही. नी रामसूत्रच जर सापडले नाही, तर आनंद कुठला? कारण सच्चिदानंदसूत्र तर श्रीरामरायांच्या आश्रयाला. नी आपण? केवळ धडपड करणारे. नी धडपड करुन झाल्यावर उमगणारे, की काही तथ्य नाही, असे. पदराला- धोतराला गाठ मारुन जिन्नस आणावयांसच विसरलेले आपण. आपणच ठरवून आपणच विसरणे, ही बुद्धीतील फार मोठी दुर्बलता आहे. तिस सशक्त करण्यासाठीच हा ग्रंथारंभ. ग्रं ने आरंभ. अशी ही गाठ जेव्हा कुमार-कुमारीची पडते नी ते पूर्वस्मरणाने स्वाभाविकच एकमेकांकडे ओढले जाउन विवाहबद्ध होतात. परंतु, पुढे ती गाठ-ती ग्रंथी उकलत नाही. नी परिणामी ते विवाहबंधन ते शुभमंगलही एक जाचक बंधन-कर्तव्य पार पाडण्याची जागा होउन उरते. असे का? याचा वेगळा अभ्यास या साऱ्या प्रवासा दरम्यान येणारच आहे. पण अशी ही ग्रंथी-ही संधी-ही गाठ जर श्रीसद्‌गुरुंसी पडते, तर मग सहस्त्रदलकमलिनी पुर्णचंद्रासी पाहून विकसिनी झाल्याचा साक्षात अनुभव जीवास येतो. यासच साक्षात्कार असे म्हणतात. कुठलीच पाकळी गुप्त नाही. साऱ्याचीच उकल झालेली. पूर्ण उमस आलेली. सुगंध-पराग-रंग-रस-स्पर्श-देठ-बीज-माती-सिंचन-कोंब-काटे- कळी-उमल-पाणी-सूर्यप्रकाश-चंद्र-वाढ-मधु-मकरंद, सारं सारं. अशा या गाठी जीवाच्या शिवाशी. मृत्यूच्या अमरत्वाशी. बाल्याच्या तारुण्याशी. रात्रीच्या उषःकालाशी. आत्म्याच्या परमात्म्याशी. मंगलाच्या शुभाशी. अष्टाच्या नवाशी. दशमीच्या एकादशीशी. एकादशीच्या प्रदोषाशी पडायला हव्यात. मधे काहीही न येता, सरळसरळ-समोरासमोर. मधे काहीच आणले नाही पाहिजे. येऊ दिले नाही पाहिजे. कारण ग्रास-ग्रहण हे मधे काही आल्यानेच तर होते नां. म्हणून ग्रंथींची उकल करावयास हवी.

**ग्रं ने प्राप्त संधी**

त्याकरीता ग्रं ही पहिली संधी. एकुण किती ग्रंथी नी त्या जीवाच्याच शरीरवस्त्राशी कशा अनुस्यूत आहेत ते आपण पाहू या-यातील ९ ग्रंथी तर जीवास गर्भातच सूत्रबद्ध करीतात. बघा-**पहिली ग्रंथी** ही-डाव्या-उजव्या हाताशी आहे. हाताशी म्हणजेच फुगडीपद्धतीने किंवा नमस्कार पद्धतीने

जी मुद्रा होते तेथे. लहान  मुलाचे हेच हात गर्भावस्थेत त्याचे छातिशी असतात. **दुसरी ग्रंथी** ही-अंक म्हणिजे मांडी घालण्याशी. **तिसरी ग्रंथी** ही-हृदयाशी वर दर्शविल्याप्रमाणे ल या आकारपद्धतीत असते. हा आकार येथे दिला आहेच या आकाराविषयी थोडे जाणून घ्यावयाचे तर बघा-हा आकार ॐ कार स्वरुप असा असून येथे बरोबर ही ॐ मात्रा उलटी केलेली आहे. हिच यातील शक्ती होय. हेच आपले जीवाचे लालन-पालन-संगोपन होय. हा आकार आपणांस ३ या संख्येचाही निर्देश करीत आहे. या आकाराने ही चतुर्थी पूर्वीची तृतिया समजावी. म्हणून ३ हा आकडा आडवा केल्यास आपणांस ल हे अक्षर प्राप्त होते. नी ही तीन ही संख्या काय निर्देश करीते बघा-त्रि-तिनही-त्रय-त्रै-तृतिय-तीन-त्रु-तिन्ही या अशा स्वरुपात. या प्रत्येक अक्षराचा समुह भाव वेगवेगळा आहे. ते नंतर बघू. **चौथी ग्रंथी** ही-कानाच्या पाळीजवळ. **पाचवी ग्रंथी** ही-ग्रीवेजवळ म्हणिजेच मानेजवळ. **सहावी ग्रंथी** ही-कंठ म्हणिजेच पड्जीभेजवळ. **सातवी ग्रंथी** ही-नाभी. येथूनच जीवास काय म्हणावयाचे आहे, ते मातेस गर्भावस्थेत कळते. त्यास डोहळा असे संबोधन आहे. **आठवी ग्रंथी** ही-स्मरणाशी निगडीत आहे. जैसे फुफु वन्ही चेतविण्यासी. घागर फुंकण्यासी. अरणी मंथनासी. चैतन्यासी. आठवा आठवा. आठवा-आठवा. अवतार यासी. **नववी ग्रंथी** ही-जन्म-पृथ्वीशी निगडीत आहे. **दहावी ग्रंथी** ही-मनाशी. जीवाची या मनाशी गाठ, जन्मल्यानंतर पडते. तोपर्यंत जीवाचे स्मरणसूत्र अबाधित असते. त्यात व्यत्यय नसतो. ते अत्यंत सुसूत्र असे असते. **अकरावी ग्रंथी** ही-श्रीसदाशिवांसी. **बारावी ग्रंथी** ही-श्रीचंद्रांशी. **तेरावी ग्रंथी** ही-धर्म-श्रीयम-नेम-नियम-शासन म्हणजेच श्रीशनैश्वरांसी. अशा या १३ मुख्यग्रंथी श्रीसमर्थांना ग्रंथारंभीच आपणांस आठवून द्यावयाच्या आहेत. आपणांसही त्या आठवतील एवढ्या जवळ जावयाचे आहे. स्मरणाच्याही नी श्रीसमर्थांच्याही.

श्रीसमर्थांच्या १३ अक्षरी मंत्रातही ही ग्रं उकलच दडलेली आहे. श्रीश्री कपिवरांनी यातील तीनच अक्षरांचा उलगडा केला. दास्यत्व केले.

ती अक्षरे म्हणजेच..श्रीराम. श्रीमहादेवांनी दोनच बीजाक्षरांचा उच्चार केला ती अक्षरे म्हणजे..राम. श्रीउमांनी म्हणिजेच आईसाहेबांनी त्याअक्षरातील शक्तीचा संचार केला. स या एकाक्षराने. **श्रीश्रीगजाननमहाराजांनी ९ च अक्षरे घेतिली. ती अक्षरे-ङ ङ ङ्त्र व्र ते. यासच आपण गण गण गणात बोते, असे समजतो. पङ्जीभ आठविली की स्मरेल हा ङ उच्चार काय आहे ते.** याविषयी आपण नंतर बघणारच आहोत. ग्रंथी उकलण्याकरीता काय-काय केले आहे बघा. बरे हे सारे स्वतः पाहून. स्वतः तयार करवून. सांगोवांगी-ऐकीव असे हे नाही हो. श्रींचे श्रेष्ठत्व वर्णायाला श्रीशारदामातांना देखील अशक्यच आहे. असा..सर्व देवांचा वरिष्ठ..वारी दासांचे अरिष्ट..रामदास एकनिष्ठ..मारुति हा नेमाचा. ग्रंथ कुठल्या नेमाचा? नेम म्हणिजे लक्ष-वेध-अग्र-प्रधान-प्रथम-आद्य-आदी-पुराणं-जुनाट-आरंभ-आरंभीचे-मुख्य-पहिले-खल्वादि. खलु म्हणजे-शून्य. नी खं म्हणिजे ब्रह्म-आकाश. असे ते खल्वादि. याहिपूर्वीचे-आदिचे-अगोदरचे मूळसूत्र-मुळारंभाचे-आदिबीजीपूर्वीचे-विराट-हिरण्याचेही पहिले-सर्वात प्रथमचे. अशा नेमाचा ग्रं. अशा या नेमाशी एकनिष्ठ, ते श्रीसमर्थ-श्रीसमर्थरामदासस्वामी श्रेष्ठ. असे हे श्रेष्ठत्व, कोणाचे अरिष्टापासून संरक्षण करणार आहे? तर जो दास आहे त्याचे. दासास सर्व अरिष्ट-अनिष्ट यांपासून दूर ठेवणारी ही शक्ती आहे. दास्य कळण्याकरीता-करण्याकरीता स्वामी कळला पाहिजे. आधी स्वामी. आदी श्रीस्वामी. श्रीसमर्थांचे हे आदितत्व मोठे विलक्षण नी खूपच रम्य-हृदयंगम आहे.

**महेश पार्वती प्रती..विशेष गुज सांगती..**
**सलाभ होतसे दुणा..श्रीराम राम हे म्हणा..**
**देह धरून वानरी..अखंड दास्य मी करी..**
**विमुक्त राज्य रावणा..श्रीराम राम हे म्हणा..**

काय सूत्राची सुंदर उकल श्रीसमर्थ करीत आहेत. समर्थाचिया सेवका वक्र पाहे..असा सर्व भूमंडळी कोण आहे..जयाचि लिला वर्णिती लोक तिन्ही..नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. श्रीराम-प्रभुराम कुणास उपेक्षिणार नाहीत? तर दासास. दासास उपेक्षिणार नाहीत. त्याअर्थी आपण दास व्हावयास हवे.

दास होणे कळायालाच हवे. उमगायालाच हवे. या दासभावात खूप काही दडलेले आहे. म्हणून **हा ग्रंथ-हा ग्रं कुणाचा-हा ग्रं कशाचा-तर हा ग्रं दासाचा. हा ग्रंथ दासाचा आहे. हा ग्रं दासाच्या आरंभाचा-आरंभापूर्वीचा-मुळारंभापूर्वीचा ग्रं आहे. श्रीस्वामींनी घडविलेल्या दासाचा हा ग्रंथ आहे.** आता हा ग्रं जर आपण या १३ ग्रंथींच्या जागी धरला-कल्पिला-पाहिला-जाणिला तर काय काय उकलणार आहे-उलगडणार आहे, ते पाहूया-यात **पथ्य एकच की आत्मा नी परमात्मा यामधे आपण म्हणिजेच मी ने यावयाचे नाही.** त्यांचे त्यांचे चालू देणे संवादसूत्र. कारण हा सारा श्रीगुरु-श्रीशिष्य संवाद आहे. नी हा कुठल्या स्तरावरुन लिहीलेला आहे? तर शिवस्तराहून. मग तो स्तर जर आपण गाठलेला असेल, तर नी तरच संवादीता येईल. निश्चितच संवाद होईल. नी नसेल गाठला तर वाद. नी श्रीसमर्थांना तर तुटे वाद संवाद तो हितकारी..असा संवाद हवा आहे. त्यामुळे आपण स्वतःकडे अजाणपण घेउन, या सुंदर-आत्मगर्भ संवादाचेच चाकरपण-दासपण मिरवू या..घेउ या. विद्यार्थी म्हणून जर आपली अवस्था धरली तर आपण इतिहास-खगोल-भूगोल-शास्त्र यांचा अभ्यास कसा आहे तो पाहिलाच आहे. तो कसा करावयास हवा, व्हावयास हवा हेही पाहिलेच आहे.

आता त्यातीलच अंकगणित पद्धतीने जरा थोडा शिक्षणाबाबत विचार करु. बघा २ गुणिले २ = ४. उत्तर तयारच आहे. १ + १ = २. उत्तर तयारच आहे. पण २ गुणिले २ = ४ म्हणजे काय. असे का? असा प्रश्न पडला, तरच खरा अभ्यास सुरु होणार आहे. अधिक-वजा-गुणे-भागणे, इत्यादी म्हणजे काय, याचा मुळातून अभ्यास करावयास हवा. ९ तून ८, ८ तून ७ असे करीत करीत सारे एक-एक करीत वजा करता येतात. पण १ मात्र वजा होतच नाही. **हा वजा न होणारा १ कोण?** हे कोडे सुटले की पूर्ण गणित उलगडले. नी आपला शोध हा १३ पर्यंतचा. निदान तो तरी जाणायाला हवाच. प्रत्येक पाढा १० शीच का थांबतो? संपतो? शोधायाला हवे. नउ दाहे नव्वद..बे दाहे वीस..तीन दाहे तीस, असेच का? ११ पर्यंत कींवा त्याही पुढे का पाहोचले नाहीत? आपण जन्मच जर नवाशी घेत

आहोत? तर बाकी १ ते ८ या गुप्त संख्यांचे काय? एकदम १० व्याशी गाठ पडली जीवाची. ११ ही एकच संधी जगण्यासाठी. पुढे लगेच गाठी बाराव्याशी. की आलेच तेरावे मरणाशी..१३-तेरावे, तर पाहता येतच नाही आपले आपल्याला. ते दुसरेच घालतात. १४ तर मुळीची रिक्ततिथी. १५ वी पौर्णिमा. हिची प्राप्ती भाग्यानेच होते. ते ही स्वभाग्य नाहीच. म्हणिजे हे कर्मात लिहीलेले नसते. कर्मरेखेपलीकडील ही गणिते आहेत. याच टप्प्यासाठी श्रीगुरुपाठबळ-श्रीगुरुकृपा आवश्यक ठरते. किंबहूना या पौर्णिमेस पाहण्याकरीताच श्रीगुरुंचे सान्निध्य-सेवा हवी. असे सहस्त्रचंद्रदर्शन. कोणाचे असेल हे भाग्य. हे परमभाग्य. हे परम..परम..परम असे भाग्य केवळ नी केवळ श्रीकपिवरमहाबलीअंजनीकुमार यांचेच. श्रीसमर्थरामदासवरस्वामिन्चेच. श्रीश्रीगजाननमहाराजांचेच, केवळ तयांचेच. श्रीचंद्र तयांस पाहून आपुली सहस्त्रता सिद्ध करीत असतील. श्रीचंद्र तयांस पाहून व्रतस्थ होत असतील. दिनदर्शिकेवर भलेही ही पौर्णिमा पंधरवड्यात एकदा भेटत असेल. परंतु तशी जीवाची खऱ्या अर्थाने पौर्णिमा होण्याकरीता श्रीसद्गुरुशक्तीच हवी हे निश्चितच. को जागरतिः, आहे नां आठवण? कारण श्रीसमर्थ सांगतात १५ हा शक्तीसंचार आहे. पंधरवडा-पक्ष-अर्धमास या साऱ्याचा अभ्यास, या अंगाने-असा व्हावयास हवा.

जसे गणिताकडे आपण पाहिले तसेच आता थोडे भाषेबाबतही पाहूनच घेउ. म्हणिजे आपली शाळा तरी पूर्ण होईल. भाषा हे एक असे अंग आहे की जे स्वयंसमृद्ध आहे. म्हणूनच त्यास श्रीसरस्वती-शारदा-ब्रह्मात्मजा-विद्या-प्रभा-तेजोमयी-मेधा इत्यादी नामाभिधानांनी अंलकारीले आहे. नी ही भाषा म्हणजे गिर्वाण-संस्कृत. ग्रं मधून ग्रं करीता जिचा ओघ उद्भवता जाहला. पण गुप्तरुपे. चतुर्थ प्रवाहांमधून जियेचे वहन, अशी ही पंचमुखा-सप्त चिन्हांकिता-हृदया-रामलोभिनी-सगुणा-सगुणवरदायिनी-कोमलांगा आहे. परमगुप्ता-गुह्या-विश्वव्यापिनी-मुग्धा-अनामिका अशी इयेची रुपे आहेत. संस्कृत अथवा प्राकृत या दोन पाठ-पोटाच्या-एका चैतन्याच्या या कन्या. या उच्चार-अक्षरशास्त्रात जीवाचे अवघे दीर्घायुरारोग्य वैभवाचे अमृत समाविष्ट आहे. जोडाक्षरांच्या उच्चारांनी रोगकारक हवा

बाहेर फेकली जाउन रोगप्रतिबंधक ग्रंथींची वाढ मुळातून करणारी आपली श्रीमंत-ऐश्वर्यवती भाषा आहे. कुठल्याही औषधांची मुळातच आवशकता लागणार नाही, इतके निरोगीपण-शुद्धता-प्रांजळता-निर्मळता आपल्या या भाषेत आहे. मुळापासून मुळातले मुळचेच हिचे हे सौंदर्य आहे. परंतु ही देखील गोष्ट आता आपल्यापासून फारफार दूर गेली आहे. आपल्या भाषेपासून आपणांस तोडणे म्हणिजे नाळच कापणे नां. संस्कार संपले-परंपरा संपल्या. आदरस्थाने संपली. मुळातले हरवून-हरवले जाउन केवळ देखावे तेवढे उरले. उरकणे-व्यवहार इत्यादीत ते सारे गेले. आपल्या भाषेतून संवादाचे माध्यम ठेवणे कमीपणाचे वाटू लागले आहे आता. आपल्या भाषेतलेच उलट समजेनासे झाले. दुसऱ्याचे काहीही विचार न करता स्वीकारणे, त्याचा अंगीकारही करणे, त्याचा प्रसारही करणे, गोडवेही गाणे, नी आपल्या सर्व गोष्टींबाबत अनास्था, हे चित्र बदलल्याशिवाय आपल्या भाग्यात सूर्योदय होणे नाही. बरे हे चित्र बदलावयाचे म्हणिजे धाक-दपटशा-कायदा-बडगा-दंड या विपरित मार्गे कदापिही नाही. तर अंतरजागृति झाली पाहिजे. जाणून-समजून-उमजून हे बदल झाले पाहिजेत. नी जाणणे-समजणे-उमजणे म्हणिजेच ज्ञान. ते एकदा प्राप्त झाल्यानंतर-अंधार निवल्यानंतर उमजेल की अगणित करावे लागे पुण्य..तेव्हाच लाभे भारती जन्म. अर्थ न भौतिक शास्त्रात..सेवि अध्यात्म विद्येप्रत. नी ही अध-आत्म-विद्या आहे. अध म्हणिजे खाली-खाली म्हणजे आंत-शरीररुपी वस्त्रात आलेला अंशरुप परमात्मा. तशा अर्थानी अध. अशी ही अध-आत्म-विद्या ही फक्त गिर्वाणातीलच मकरंद आहे. जो प्राकृतामधे आपल्या सारख्या जडजीवांकरीता श्रीसंतांनी आणिला. आपली भाषा-आपले संस्कार यावर पोसलेला आपला पिंड हाच शिव आहे. बाकी शव होय. निरोगी शरीर-मनाला या अशा महद्‌पूर्ण भाषेपासून तोडून नाना व्याधिंनी ग्रस्त करुन ठेविले आहे. दिवस-आयुष्य संसाराने त्रस्त. सतत काही ना काही व्याप. नाहीतर टिव्हीत मस्त. आळसाने तुस्त. या साऱ्यांमुळे औषध-गोळ्या-दवाखाने यांचा ससेमिरा आहेच. पूर्वी हे होत नव्हते. एवढे एवढ्या प्रमाणावर तरी नक्कीच नव्हते. आता घरटी माणूस आजारी

आहे. काय दर्शविते हे चित्र. तर मूळ सुटले-भान सुटले हेच नां. पूर्वी हे नव्हते, हे चित्र असे नव्हते. कष्टाची मीठ-भाकरी आजच्या चैनीच्या पिझ्झा-पावभाजीपेक्षा लज्जतदार नी आरोग्यास उपयुक्त होती. मनाला त्यात विश्रांती होती. सुधारणेच्या नावाखाली स्वत्व विकले आपण. तत्व सोडले आपण. नी ही कुठली सुधारणा, ही कसली सुधारणा?नाजुक हृदयं. दुबळी मनं. कमकुवत शरीरं. खिळखिळी घरं. तुटलेली नाती. दुभंगलेले संसार. घात-आघात-युद्ध-संघर्ष-अनिश्चितता-संशय-शंका-संभ्रम-गोंधळ-भिती-असंयम-अनाचार-भ्रष्टाचार-पुरोगामी-प्रतिगामी-नानाविचार-अस्वस्थता-काय म्हणावयाचे याला?अस्मिता-देशाभिमान-स्वजागृति या गोष्टींचे महत्व-एकत्र राहण्यातील आनंद, कुठे गेलं हे सार?अंगण-ओसरीवरचे बालपण. चिऊ-काउच्या घासांचे भोजन. भातुकलीचे खेळ. एकत्र येउन दिवाळी-दसरा-गणपती. वडे-पापड-कुरड्या. विवाहसमारंभ-वनभोजन-आवळीभोजन-धुंधुरमास-पर्वणीस्नान-जत्रा-यात्रा हे व्यर्थ नव्हते हो. नाही हो. या साऱ्यात खूप अर्थ दडलेला आहे. जीवास सार्थ करणारा अर्थ. या साऱ्यामधून एक निश्चित जीवन, एक सुनियोजीत प्रवास साऱ्यांचाच होता. वृक्षांची-नद्यांची-गाई-वासरांची पूजा होत असे. आता वृक्षच शोधावे लागतात. आता वृक्षच नाहीत तर वंशवृक्ष-वंशावळ तरी कुठली. तो वंशवृक्षच खुंटवित आहोत आपण. वृक्ष आता कृत्रिम उभारावे लागतात. सारा आनंदच कृत्रिम. पैसा उधळून मिळविलेला. पैशाने विकत घेतलेला आनंद. जाग आली पाहीजे. खडबडून जाग आली पाहिजे या साऱ्यातून. म्हणूनच तसेच जागविणारा हवा. आता आपण देव-देवतांचे मुर्तिस्वरुपात पूजन करतो. ते कधी सगुण साकार होते, यावर आपला विश्वासच बसत नाही. आपण ते मान्य करु शकत नाही. का?नाकारुन तर्क-संशयाकडे वळण्याऐवजी स्वीकारुन विश्वासाकडे जाणे चांगले नां. योग्य नां. आता जसे सहस्त्रदल कमल किंवा श्रीसितामातांच्या कुंतलातील श्रीरामकुसुम आज उपलब्ध नाही. पण ते होते. ती बीजे लुप्त नाहीत झालेली. तर त्यांना प्रगट होण्यासारखी परिस्थिती आता उरलेली नाही. पुष्पवृष्टी-केशरवृष्टी होणाऱ्या आभाळातून आता केवळ पर्जन्यवृष्टी

होत आहे. तीही वेळच्या वेळी होणे अवघड झाले आहे. त्यासाठी काय प्रयत्न करावयाचे? हे ही ज्ञान जीवास नाही. कुठेही-कुठूनही फुटणारे पिंपळ-औदुंबर-वड अशी ही वृक्षराजीही आता फार कमी झाली. चिमण्या-पोपटही आता उरलेले नाहीत. भारद्वाज-आठवतो तरी का? पहाटेचा चिवचिवाट-गाई गुरांचे हंबरणे, असे वर्णन आता कोण करेल. घनःश्याम सुंदरा श्रीधरा..अरुणोदय झाला..यामधील पहाट आता कथेत सुद्धा येणार नाही. आता येईल दूधवाल्यांचे-पेपरवाल्यांचे आवाज-गाड्या-लोकल-बस-पाण्याचे आवाज-घड्याळ्यांचे गजर-उठण्याची घाई-रिक्षांचे आवाज-मुलांना पाळणाघरात नेणाऱ्या आया-मुलांचे रडणे-भांड्यांचे आवाज-वाद-घाईची चर्चा-कुलुपे शोधण्याची धावपळ. आता कुठले ते उठी श्रीरामा पहाट झाली..पूर्व दिशा उमलली..उभी घेउनी कलश दूधाचा..कौसल्यामाउली. छे..आता उभी घेउनी, तर अवघडच. आता..दूध पावडरीचे घेई मुखी..नाहीतर जाई तैसाच स्कुला. आईला वेळ नाही. वडील तर बाहेरच. मूल वाढतय ते नक्की कसं? हे त्या मुलानी एकदम काही वाढवून आणल्यावरच कळते आहे. त्याला घ्यायला-त्याजजवळ बसायला वेळ नाही. त्याला द्यायला पैसा तेवढा आहे. नी त्याला त्या वयात हवा आहे आई-वडीलांचा वेळ. नी जेव्हा आई-वडीलांना 'तो' हवा आहे तेव्हा वाढताहेत वृद्धाश्रम. भरताहेत वृद्धाश्रम. वृद्धांना ठेवायाला जागा नाही. अशी ही केविलवाणी अवस्था. मग हृदयेच उरली नाहीत आजकाल कुणाला या चर्चा. तुमचे असावे दयाभूत अंतःकरण दीनांविषयी..या वाक्याचे-या भावाचे करायाचे काय?आता तर भाव-भावनांना, भाबडेपणा-भोळेपणा-वेडेपणा म्हणतात. पण विचार करायला हवा की पूर्वी संक्रातीचे सणाला पोस्टाने एखादे भेटकार्ड आले, की त्यात एक छोटेसे अगदी चिमणी एवढे पाकीट असायाचे. त्यात तिळगुळाचे दोन दाणे असायाचे. कधी कधी तर तेही पोस्टाच्या धांदलीत पडून गेलेले असायाचे. पण तरीही कोण आनंद व्हायचा ते पाहून. की आपली कुणाला तरी आठवण आहे. खूप समृद्ध झाल्यासारखे वाटायाचे. आतून भरुन आल्यासारखे वाटायाचे. खूप आठवणींना उजाळा मिळत असे. प्रत्यक्ष तशा त्या भेटकार्डाच्या भेटीचे ते क्षण आठवून पहा.

आता केवळ संदेश-एस.एम.एस. तिळगुळ घ्या गोड बोला. प्रत्यक्ष काहीच नाही. देणं नास्ति..घेणं नास्ति. नुसता बोलाचा भात नी बोलाची कढी..याने का पोटे भरली. तिळगुळ द्यायचाच जर नाही, तर गोड बोलण्याचा प्रश्नच उरला नाही नां. नी एकाला जो संदेश तोच साऱ्यांना. सब घोडे बारा टक्के. मग त्यात मित्र-मैत्रिणी-नातेवाईक-काका-मामा-आई-वडील-सारेच आले. अधुनिक-मॉडर्न सारे. प्रेमस्वरुप आई..वात्सल्यसिंधु आई. नी आय लव्ह यू मॉम यातील कोणते अधिक भावेल? दसऱ्याला ज्येष्ठांना-श्रेष्ठांना-वरीष्ठांना सोने देउन पाया पडणे-आशिर्वाद घेणे हे एखाद्या क्लब-पार्टीपेक्षा फारफार उपयुक्त-आवश्यक नी गरजेचे आहे. आजार-रोग-व्याधि ह्या होतातच का तर, केवळ मने आजारी-अशक्त-रोगी-हव्यासी-अशांत आहेत नी मोकळी नाहीत म्हणून. वस्त्रात दोष नाही. पण थांबून-थोड शांत बसून विचार करायलाच कुणास फुरसत नाही. वेळ नाही. सीर सलामत तो पगडी पचास. येथे तर पचास पगडींचाच विचार अधिक. त्यासाठी सीर खपवतील. इतरांचेही सीर घेतील खपवायाला. साऱ्यांच्याच डोक्याला ताण. कसा? ते टि.व्ही. या माध्यमातून पाहतोच आहोत आपण. नसलेले संघर्ष निर्माण करायाचे, जाउ-नणंद-सासू-मैत्रिण-पति-पत्नी या नात्यांमधील गोडवा. या नात्यांची आवश्यकता-यामधून जीवास मिळणारी काही जीवनावश्यक नी दीर्घ दृष्टिची रसायने-योजना, याचा काहीही अभ्यास न करता-काहीही न जाणता विचित्र-विषययुक्त संघर्ष दाखवायाचे. ते काहीही करुन वाढवावयाचे. लोक तरी काय, वेळ कसा घालवावयाचा? म्हणून तास न् तास त्या टि.व्ही च्या खोकड्यासमोर बसून काढत आहेत. खाल्ले की बसायाचे. वाढता वाढता वाढले. मग शरीरे आकारात ठेवण्यासाठी पुन्हा आहेच दहा-दहा-बारा-बारा हजारांचा खुर्दा. श्रीसूर्यनमस्कार नाही आठवायाचे या वेळी. उदरभरण नोहे..जाणिजे यज्ञकर्म याची तर पार वाटच लाविली आहे. लहान लहान-छोटे छोटे घास घ्यावेत. घास तोंडातून बाहेर येउ देउ नये. खाताना पाणी पिउ नये. कोणासमोर जेउ नये. अन्नाला नजर चटकन लागते. ओठीच खावं पण डोळीच खाउ नये. हात-पाय धुउन जेवायाला बैसावे. मौन

भोजन करावे. ताटात हात धुवू नयेत. किती नी काय काय सांगावे. यातील काय उरले आहे आता? आता या असल्या गोष्टी शिकवण्याचेही वर्ग घेतले जातात. आपण काय काय धाब्यावर बसविले आहे बघा. सुधारणा–मॉडर्न पद्धती म्हणिजे विकृती, हे सांगणारेच कोणी उरले नाही. वास्तविक आपण जर आपल्या मनात, जरा क्षणभर थांबून डोकाविले तर जाणवेल की आपणांसही हा सुधारणांच्या नावाखाली चाललेला हा हैदोस–संस्कृतिवरील–शांत–समाधानी आयुष्यावरील ही आक्रमणे नको आहेत. पण दुसरा हे असे करताना पाहिले की पहिल्याचे अवसान गळते. आधीच ते उसने असते. पाठबळावरचे–स्वबळावरचे ते नसतेच. सामर्थ्य आहे चळवळीचे..परंतु तेथे भगवंताचे अधिष्ठान पाहीजे. ते तसे श्रीभगवत् अधिष्ठान आहे का नाही हे कोणी बघायाचे? बरे त्या दुसऱ्यासही असे वाटते की पहिल्यास हे सारे आवडते आहे. नी वास्तविकता अशी की दोघांनाही हे नको आहे. नी या दोघांमधे संवादसेतूच नसल्यामुळे संवादाचाच अभाव असल्यामुळे दोघेही या आक्रमणाचे शिकार. काय करावयाचे? कोठे जावे काय करावे..आरंभिली बोहरी दयाळा..कल्याण करी रामराया..जनहित विवरी. हेच श्रीआर्त. आपण या आर्ताजवळ बसावे. त्या छत्रछायेत बसावे. **सोन्याचा धूर निघणाऱ्या या ब्रह्मांडातून आता कशाचा धूर निघतो, याचा विचार–मनन करायला काहीतरी वेळ ठेवा, असे श्रीसमर्थ सांगत आहेत, याचेच करा सदा मनन..कशापासूनी जग झाले. काय अभ्यासावयाचे नी काय अभ्यासितो आहोत. सार्थ नी व्यर्थ, कधी विचार होईल.** प्राणी–पक्षी–वृक्ष–पाणी–अन्न–धान्य–फुले–बागा–तीर्थे कमी होत चालली आहेत. कधी जतन करणे–संवर्धन करणे समजेल–उमजेल. पुढे तर ५००–५०० वर्षांपूर्वीची झाडे होती, यावरही कोणी विश्वास ठेवणार नाही. एका झाडाखाली १००० माणसे आरामात राहू शकत, यावर तरी कोण आता विश्वास ठेवील? तसेच आज आपण ज्यांचे मूर्तिस्वरुपात पूजन करतो. त्या साऱ्या देव–देवता त्यावेळी प्रत्यक्षात या अवनीवरती विहरत असत. यावर तरी आता कोण विश्वास ठेवते आहे? सारी अविश्वासाची दुनिया. हास्यास्पद ठरवतील ही विधाने. पण बघा, जर

आपणांस असे सांगितले, की डायनासॉर सारखा प्राणी कधी काळी या पृथ्वीवर अस्तित्वात होता. नी या डायनासॉर बाबतचे काहीही संशोधन आपल्या पुढे आलेले नसते, तर? तर विश्वास ठेवला असता का आपण? आता त्याबाबत संशोधन झाले आहे, म्हणून आपण ते स्वीकारले. मग याही बाबतीत संशोधन व्हाने नां. कोणी रोखले आहे? पण तेच तेवढे होताना दिसत नाही. तेवढाच बरा उत्साह नाही. संशोधनास तरी कुठे जागा उरली आहे. सारी क्षेत्रे गच्च. तीर्थे भरलेली-माणसांनी फुललेली. मुळतीर्थच हरवलेली. शांतता शोधण्यासाठी जावे कुठे? हे सारे विचार करायला लावणारे आहे. विचार केला तर सत्य गवसणारही आहे. सदा चक्रवाकासी मार्तंड जैसा..उडी घालीतो संकटी स्वामी तैसा..हरिभक्तीचा शक्त गाजे निशाणी..नुपेक्षी कदा राम दासाभिमानी, ही सगुण स्वरुपाबद्धल दिलेली ग्वाहीच आहे. निर्गुण स्वरुपाबद्धल नाही म्हटलेले हे. श्रीदेवस्थाने सगुण आहेत. आपण नाही, एवढे ते आहेत. आहेतच आहेत. तो कुणासही केव्हाही न उपेक्षिणारा प्रभुरामराया ज्यांचे आराध्य आहे, ते श्रीसमर्थ-श्रीहनुमंत-श्रीगजानन महाराज ही ग्वाही देत आहेत. ही दंतकथा ना लवही या गजानाची ग्वाही. आपण श्रीरामरायांकडे हसून पाहिले तर ते ही आपणांकडे तसेच पाहतील. आपण जरा रुसून पाहिले तर तेही तसेच बघतील. हा काही दर्पण न्याय नव्हे. आरशात आपण जसे दिसतो तसेच आरसा दाखवितो. जसे 'असतो' तसे नाही दाखवित. अशा केवळ बाह्यदर्शन करविणाऱ्या आरशापेक्षाही आपण स्वतःला प्रभुरामरायांमधे पाहावे. फार वेगळे दिसू आपणच आपल्याला. ऐवढे जवळ आहेत प्रभु आपल्या. आपणच कुठे राहून गेलो, शोधले पाहिजे. कुठे अडकलो? चपळपण मनाचे मोडीता मोडवेना । सकळ स्वजन माया तोडीता तोडवेना। घडी घडी बिघडे हा निश्चयो अंतरीचा ।। या साऱ्यामुळे दुरावलो. त्या कैवल्य-सत्य-सच्चिदानंद सुखापासून लांचावलो. श्रीसमर्थ सांगतात, तिन्ही लोक जेथोनि निर्माण झाले । तया देवरायासी कोणी न बोले । जगी थोरला देव तो चोरलासे । गुरुवीण तो सर्वथाही न दिसे ।। ते सत्य जर आपणांस शोधावयाचे, तर सर्वप्रथम श्रीगुरुंविषयी तळमळ लागली पाहिजे.

त्या थोरल्यादेवाचे हृद्गतच इथे श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. नी आपल्याजवळ एवढ मनीचं-आतलं-हृदयातलं-अंतरंगातलं बोलत आहेत. त्याअर्थी आपण श्रीसमर्थांचेच आहोत. त्यांचे जीवलग-त्यांची लाडकी बाळे. आजही आई आपली काळजी घेऊन फिरते आहे. चंद्रमे जे अलांछन..मार्तंड जे तापहीन..बघा आई, नी तियेचे वात्सल्य. तियेची काळजी.

सदा सर्वदा राम सन्निध आहे । मना सज्जना सत्य शोधोनि पाहे। अखंडीत भेटी रघुराजयोगु । मना सांडी रे मी पणाचा वियोगु।। अशी ही काळजी. ऐसी कळवळ्याची जाती..करी लाभाविण प्रिती. आपणांस हे उमगले पाहीजे. आपले कोण? कोण आपले? श्रीवाल्याकोळींना याच प्रश्नाने जागे केले. परंतु श्रीरामायण कितीही वेळा वाचले-ऐकले-पाहीले तरी आपणांस काही अशी, प्रश्नांनी जाग आलेली नाही. कारण जागायला तरी निद्रेचा शेवटचा टप्पा लागतो. इथे तर ती इतकी गाढ आहे की लोक आपल्या साध्या झोपेचेही वर्णन करताना सांगतात, की आपण तर बुवा एकदा झोपलो नां की मग ढोल बडवले तरी उठत नाही. जागच येत नाही. कोणे वंशीचे म्हणायाचे हे?नी कधी यायचा यांना तो रघुराजयोगु?नी कधी हे त्या लाभातून सर्वसुख भोगावयाचे? बरे ही सारी काळजी श्रीसंताना-श्रीसमर्थांनाच. म्हणून ग्रं ची सुरवातच संवादापासून केली. कोण-कुठे-कुणाशी संवादते आहे, तर सारखा-सारख्याशी संवादीतो आहे. वाद कोणचाही कोणाशीही कशावरुनही होईल. शब्दांना उच्चरव लावला की भांडणच. पण तेच शब्द जर कोमल झाले, तर तुटे वाद संवाद तो हितकारी. असे आपल्या बाळांना चिमणचारा भरविणारे श्रीसमर्थच आपणांस जवळ घेऊन संवादित आहेत. सांगत आहेत. असा हा ग्रंथ बघा-पहा-अवलोका-ऐका. श्रीगुरु-शिष्य संवादच आहे हा. **शिष्य जिज्ञासु. जिज्ञासु म्हणूनच लाडका-जवळचा.** बाकीच्यांच्याही जिज्ञासा जागविणारा असा. सारखाच भेटे सारख्याशी..पाणीच मिळे पाण्याशी..विजातीय द्रव्याशी..समरसता होणे नसे, असे श्रीगजाननमहाराज सांगतात. म्हणूनच आपण विजातीय नाही. आपण तळमळीचे आहोत.

## ..दासभावाची तळमळ..

तळमळ कशाची तर, दास होण्याची. कोणाचे दास्य तर, श्रीस्वामीरामांचे. कोणी केले तर, श्रीकपिवरमहाबलींनी केले. तेच तर सांगत आहेत हे सारे. बघा-आता इतक्या गौप्य-गूढ-गुजगोष्टी ज्याला सांगावयाच्या तो परका का असेल?नाही, तो तर जवळचा. जवळच्यासच बोध. म्हणून दास जवळचा. **श्रीस्वामींच्या जवळ दासभावाने पोहोचता येते. त्या दासभावाच्या ग्रंथी श्रीसमर्थ उकलीत आहेत. असा हा ग्रं-प्रथमाक्षर. श्रीगुरु-शिष्य संवादातील हा ग्रं. साधे नाही हे अक्षर. दिसायला एक-अर्थाने अनेक. भावाने असंख्य. बळाने अगणित. ज्ञानाने विपुल. जाणिवेने परिपूर्ण. श्रद्धेने शिगोशिग. निष्ठेने दृढ. भक्तीने ओतप्रोत. प्रेमाने उमललेले. समर्पणाने फुललेले. दासभावाने तेजाळलेले. चरणसेवेने संतोषलेले. जाणत्याने जाणिवेने जाणतेपणाने जाणून केलेल्या सेवेने त्यास अंतरंगी धरलेले असा तो शिष्य. तो बाळ-तो दास. त्याचा हा ग्रंथारंभ आहे.** जो आरंभ आजवर आपण आपला करु शकलो नाही. जन्मास आलो नी दुसऱ्यांच्याच पुस्तकाची पाने वाचावी लागली. जो धडा घेऊन आलो तो तर सापडला नाहीच. ते पुस्तकच गायब झाले. येथे येऊन दुसराच धडा घ्यावा लागला. असा धडा, की जो वाचल्याले 'खरा घडा' भरलाच नाही. तो रिकामाच राहिला. बरे आता हा रिक्त घडा घेऊन यमुनेवर तरी जावे. श्रीकृष्ण हा फोडतील तरी. नवा घडा देतील तरी. मग 'खरा धडा' सुरु होईल. कीती सुंदर होईल मग हे सारं जीवन. भगवंत लिला वर्णन ऐकण-वाचणं, धन्य ते जीवन जे सत्संगात व्यतित होते. ग्रंथारंभ-आपला हा ग्रंथारंभ अशा 'पूर्ण घड्यानी' व्हावा. कुठेही कामाला बाहेर निघालो नी भरलेले घडे दिसले, की आपण म्हणतो शुभसंकेत झाला. नी आता बघा आपल्याकडे, आपण तर सारे रिक्त घडे. आपल्यापासून कुठल्या शुभसूचना. पण भरले पाहिजेत नां हे घडे. पूर्ण घडा. पूर्ण ग्रंथ. असा हा सारा आयुष्याचा आरंभ करणारा सुग्रंथ आपला आहे. या ग्रंथारंभातून आपण आपलाही मुळारंभ करु शकतो. संधी आहे. सोने करा. सोने कसे तयार होते, याचे ज्ञान याकरीता असावे असे

नाही. तर सोने म्हणिजे काय एवढेच कळले की पुरे होणारे आहे. नी इथे सोने म्हणिजे श्रीस्वामीपाय-श्रीस्वामीचरणे. हरीनाम नेमस्त पाषाण तारी। बहु तारीले मानवी देहधारी। सतत अडणारं आपल गाडं, आपणांस तर तो तारणारा हवाच. त्या तारणाऱ्यानीच ग्रं चा आरंभ करावा नी आरंभीच ग्रंथी-गाठ उकलावी-सोडवावी, हे केवढे भाग्य. श्रीपरमेश्वरी कुठलीही योजना ही निरर्थक नसते. त्या पाठीमागचे सारे जाणण्याएवढी ताकद आपल्यापाशी नाही. म्हणून प्रत्यक्ष प्रचिती, या क्षेत्रापासून आपण दूर आहोत. अनुभव हे क्षेत्र केवळ आपणांस मिळणाऱ्या सुखातून-संकटातून कळते. संकटातून बाहेर पडलो की त्यास अनुभव म्हणतो आपण. म्हणून आपल्या बुद्धीची कक्षा फार छोटी आहे. आपल्यापुरती सुद्धा ती नीट उकलत नाही. वयाच्या कितव्या वर्षी आपण कोण नी कसे असणार आहोत, हे ही आपले आपल्याला कळू नये, मग कशास अनुभव म्हणावयाचा? नी कशास म्हणावयाचे अनुभवाने शिकलो म्हणून? बुद्धीचा विकास जेथून होईल ती दालनेच आपण अद्यापी उघडली नाहीत. ताटी उघडा ज्ञानेश्वरा..कोण विनंती करीत आहे तर, मुक्ताबाई. **श्रीमुक्ता सांगते आहे, ज्ञानाची ताटी उघडल्याशिवाय मुक्ती नाही. ज्ञानाने परिपूर्ण अशा ग्रं चे पान अजून आपण उघडलेच नाही. प्रत्यक्ष संवाद तर तद्नंतरचा. परंतु येथे श्रीसमर्थ आपणाशी एकदम संवादच करीत आहेत. ते आपला तो स्तर उंचावूनच घेत आहेत. याचेच आपणांस खरेतर खूप कौतुक वाटावयास हवे. परंतु पैशानी काहीही विकत घेऊ शकू असा समज असणाऱ्या या दुनियेत, अक्षर-अर्थ-भाव-ज्ञानमूल्ये समजणाराच खरा श्रीमंत होय. हे सत्य उमगायचे आहे. हेच सत्य निरालस खरे आहे. असा सत्याचा सत्याने सत्याकरीता सत्य शोधून-उत्पत्तीस्थानी स्वतः बसूनच हा ग्रं जीवास दाखविला आहे.** आता या ग्रं मधील सत्य आपण शोधवयाचे- जाणावयाचे-उकलून बघावयाचे आहे. श्रीसमर्थ या साऱ्यातून जीवास बरोबर तेथेच नेऊ इच्छीत आहेत-नेत आहेत. नेणार आहेत. जिथे हा स्मरणाचा धागा-आरंभीचे सूत्र तयार झाले. तो स्मरणपथ तयार झाला. त्या थेंबापाशी-बिंदुपाशी-

केंद्रापाशी–टोकापाशी–अग्रापाशी. असा आरंभ कळला की सारे ज्ञानच झाले. काहीच अंतर नाही मग. नी काहीच दूरही नाही आपल्यापासून. काहीच अशक्य नाही आपणांस. सारे जवळच. कोण एवढी काळजी करेल?

अभ्यास झालाच पाहिजे. पुस्तक वाचता आलेच पाहिजे, हा आग्रह आहे. गुण मिळवून वरच्या वर्गात गेलेच पाहिजे, येथपासून विवाह केलाच पाहिजे, पहिला मुलगाच झाला पाहिजे, नोकरीत बढती, व्यवसायात चांदी, झालीच पाहिजे, हे सारे आग्रह आहेत. नी श्रीगुरु सांगतात, आग्रह करणे न चांगले तो विपरीत फळ देई. आपण तर ती विपरीत फळे भोगतोच आहोत. कारण आपण केवळ अक्षरे घेतो. ती जाणत मात्र नाही. अक्षर म्हणिजेच श्रीसरस्वती. त्यातून उगवणारा अर्थ म्हणिजे ज्ञान. ज्ञानातून येणारा भाव म्हणजे मोदक. मोदकातून उतरणारी गोडी म्हणजे प्रेम. प्रेमातून येणारी जाणिव म्हणिजे विवेक. नी विवेकातून फुटणारा ओलावा म्हणजे आर्त. त्या आर्ततेनी जे सांगितले जाते, त्यास तळमळ म्हणतात. श्रीसमर्थ त्याच तळमळीने आपणांस हे सारे शिकवित आहेत. सांगत आहेत. ते नुसतेच वाचून आपणांस पुढे जाता येईल का?जाववेल का?एवढ्या तळमळीतून उद्‌भवलेला हा ग्रं आहे. की तो योजतानांही केवढा हा विचार. नी त्याचा केवढा हा विस्तार. आई, मुलाशी प्रथम संवाद साधते ते केवळ, माझे मूल..बरे झाले बाबा जन्मास आला..अशा इतक्या साध्या पद्धतीने का? तर नाही. त्या इवल्या बरोबर ती ही इवली–इवली होते. नी त्याला माझं शोनुलं..माझ गोड्डुलं, असं म्हणून त्याच्याशी त्याच्या भाषेत, बोबड्या बोलानी संवाद साधते. तसे श्रीगुरु आपणांसी या ग्रं मधून ज्ञानपूर्ण वात्सल्यातून संवाद साधित आहेत. मूल श्रीसद्‌गुरुंच्या मुशीत वाढते आहे. कुशीत वाढण्यात कदाचित त्रुटी राहू शकतील, परंतु मूस?सोने मुशीत ओततात. कस लावितात. नी मग ते झळाळते–चकाकते एकदम. येथे आपणच सोने झालो की मग उरले काय?दुसरे हवे ते काय आणिक, सांगा. **सोने ही धारण करण्याची–संचय–संग्रह–ऐपत–प्रतिष्ठा–मान–श्रीमंती या कशाचीच वस्तू नाही, तर सोने ही होण्याची गोष्ट आहे.** श्रीसमर्थांचे वर्णन करताना कसे करतात बघा–**जया वाटतो कांचनु केर**

जैसा। नमस्कार माझा सद्‌गुरु रामदासा ।। काय श्रीगुरुपीठ आहे आपुले बघा. कुठल्या अंतःकरणातून ग्रं चा उच्चरव आला आहे, बघा- अभ्यासा. अभ्यास करुन उत्तर मिळेल-भाव ओतून दिशा मिळेल. अशी दिशा की त्या दिशेस श्रीसद्‌गुरु चरणे लाभतील. फक्त ती बसलेली- मारलेली गाठ उकलावी म्हणिजेच आठवावी. तडफड तीच आहे. तळमळ तेवढीच आहे. म्हणूनच अशा १३ गाठी १३ ग्रंथी आपल्या शरीरावर कशा कशा विराजमान आहेत नी त्या कशा कशा कार्य करतात ते बघू या.

**..स्मरणसूत्राच्या १३ ग्रंथी..**




**प्रथमग्रंथी**-एकाच व्यक्तीच्या हाताची फुगडी खेळताना होणारी मुद्रा-ती ही प्रथमग्रंथी होय. हात एकमेकांवर घेणे. येथे आपल्या एकावर एक ठेवलेल्या हातांमधील मनगटांवर ही पहिली ग्रंथी येते. आपणांस ज्योतिष किंवा हस्तरेषेत उतरावयाचे नाही. परंतु येथे एक संदर्भ देणे आवश्यक आहे की हातावरची धनरेषा म्हणून जीस संबोधले अथवा दाखविले जाते, ती म्हणिजेच या ग्रं मधील अनुस्वार अक्षरातून म्हणिजेच न या अक्षरातून फुटणारी आहे. नी तीस आधार असणारा हा ा काना हे पूर्णाक्षर होय. जे शब्दास आधार देवून अर्थप्रवाही करते. ते या धनरेषेचे कारक आहे. ग म्हणिजेच सव्यशुंडेचे श्रीगणेशरुप होय. नी कुठून ते धन

प्रसवते आहे तर ॅ येथून. म्हणिजेच र या मुळारंभापासून. हा सारा अभ्यास-ही योजना या केवळ एकाक्षराचे वेळी श्रीसमर्थांनी केलेली आहे. श्रीगणेशायनमः असेच प्रारंभ-आरंभ-सुरवात करताना लिहीण्याची पद्धती आहे. परंतु तसा आरंभ न करता श्रींनी ग्रं या अक्षरापासून ग्रंथारंभ केलेला आहे. कोण ग्रंथ आरंभ करतो आहे, लेखन कोण करते आहे या ग्रंथाचे. या ग्रंथास काय काय आधार आहेत. कोणत्या आधारभूत पायांवर हा ग्रंथ लिहिला गेला. याचा अभ्यास आपला म्हणिजे जीवाचा झालाच पाहिजे.




आकृतीत दाखविल्याप्रमाणे ग -उजव्या शुंडेचे श्रीगजानन. ा पूर्णाक्षर. ॅ र हा ज्ञानकारक. अ-आधारयुक्त गुप्त-ज्ञानास आधार. ङ -अमृत तत्व गुप्त. ग्रं वरील अनुस्वार म्हणिजे न गुप्त. आपल्या मनगटावर भस्मपद्धतीच्या अशा रेघा असतातच. शिवलिंगावरही हे भस्म आपण पाहतोच. याच भस्मपद्धतीच्या जागी मनगटाशी आपली शरीरप्रकृति दर्शविणारी नासिका असते. जीस आपण नाडी असे संबोधतो. ती स्पंदन करीत असते. नाडी मिळेनाशी होणे हे तर प्राणांशीच थेट निगडीत असते. नाडी जलद होणे-धिमी होणे-या साऱ्या ग्रंथीच आहेत. ग्रंथी म्हणिजे थोडक्यात आपण असेही म्हणू शकतो की नियंत्रण कक्ष आहेत.



नमस्कार पद्धतीनं हात जोडु पाहता.
ग्रं ची होणारी रचना. यातील वाम हस्तावरील ग्रं
आत म्हणजे हृदयाकडे निर्देश करतो.
तर सव्य हस्तावरील ग्रं बाह्य दिशेस निर्देश करतो.

संपूर्ण शरीर-मन या साऱ्या गोष्टींपासून ते थेट ब्रह्मरंध्र-ब्रह्मांड-परमात्म्यापर्यंत अभ्यास-शोध नी सत्याचा विकास झाला पाहिजे हे पथ्य. जिथे या ग्रं चा अनुस्वार येतो बरोबर त्याच रेषेत आपल्या हाताच्या तळव्यावरील आकृतीत दर्शविलेला गोल भाग येतो. अधिक कळावे म्हणून बघा-थोडासा खोलवर जिथे आपण तीर्थ-प्रसाद घेतो ती जागा नी त्याला लागूनच मध्यमा येते. वाम-सव्य हस्तांनी केलेल्या नमस्कारात हे ग्रं एकमेकांसमोर येतात, तेव्हा ते बरोबर एक आत एक बाहेर असे येतात. परस्परविरोधी शक्ती या अधिकच तीव्र असतात, या न्यायाने नमस्कार पद्धतीमधे बाह्यउर्जा, जी आपल्या ज्ञानास-ज्ञानवल्लीच्या सिंचनास पोषक असते ती प्राप्त होते. नी भावोत्पत्ती होते. हेच हात फुगडी पद्धतीने घेतले तर विवेक वन्ही-यशोवन्ही चेतविला जातो. नी जीवास आनंद प्राप्ती होते. तो वन्ही तसाही चेतलेलाच असतो. परंतु त्यात जी जाण पाहिजे-जाग पाहिजे-पश्चात बुद्धीपेक्षाही पूर्वबुद्धी होण्याचे दृष्टीने अधिक जी जाण-जाग, ती या मुद्रेतून येते. आपण लहानपणी हे सारे खेळ, खेळ म्हणून खेळत होतो. परंतु त्यात केवढा अर्थ दडला आहे बघा. आपण ग्रं ही एक शक्ती आहे, असे जेव्हा समजावयास लागू तेव्हा आपणांस हे सारे समजेल. हाताच्या या अशा अवस्थेमधे श्रीलक्ष्मीमातांचा वास असतो. चित्रात दर्शविल्याप्रमाणे आपल्या हाताच्या या भागाचा आकार आपण नीट अभ्यासिला तर आपट्याच्या पानांसारखा असतो हे आपणांस कळून येईल. श्रीमहालक्ष्मींच्या याच स्थानावरुन धन प्रसव होत असतो. मनगटाच्या वरील हाताचा भाग म्हणिजे श्रीमहालक्ष्मीमाता. पुढे तळवा म्हणिजे श्रीमहाविष्णू-श्रीनारायण. हे सारे धन श्रीनारायणांना स्पर्शून आपल्या हाती येते. पुढे पंचमहाभूते-म्हणिजे बोटे. अनुक्रमे अशी, करांगुली म्हणिजे करंगळी-पृथ्वीतत्व. अनामिका-म्हणिजे पाणी-आपतत्व. मध्यमा-म्हणिजे अग्नि-अग्नितत्व. तर्जनी-वायुतत्व. अंगुष्ठ-आकाशतत्व. अशी ही पंचभूते, या साऱ्या धनाचा कसा विनियोग करतात त्यावर सारी या ग्रं ची जडण-घडण-चढण-मढण-पंठण-कढण-तळण-चळण-अळण-खळण-वळण-मळण-गळण-पळण, अवलंबून आहे. म्हणिजे बघा अनुक्रमे मनगट-



..श्रीप्रियुचिप्राणेश्वरी महत्‌भाग्या विशेषा अयंबा जगदंबा भवानी..



आपट्याच्या पानांसारखा हाताचा भाग-तळवा-बोटे, हे सारे एकमेकांत इतके संलग्न आहेत की या अंतस्थ प्रक्रिया जीवास कळत नाहीत. हे सारे जीवाच्या नकळत घडते असे नाही म्हणता येत. पण जीव सावध नसतो, सूक्ष्म नसतो. त्याचे या कशाकडेच लक्ष नसते, म्हणून त्यास हे संक्रमण कळत नाही एवढेच. नी हाच तर अभ्यास करावयाचा आहे. आता कुठले तत्व कसे या धनाच्या जवळ आहे ते पाहू या. पृथ्वीतत्व करांगुली-ही ा या अक्षरातील काना आकाराच्या म्हणिजेच आधाराच्या अत्यंत जवळ आहे. तीस पैशाचा आधार मिळतो, पण घेता येत नाही. पैसा राहत नाही. टिकत नाही. हा अनुभव तर सर्वांना आहेच. पैसा न टीकणे. या कारणाचा अभ्यास वेगळा आहे. तो नंतर बघू. अनामिका आपतत्व-या तत्वावरुन पैसा जाताना तो जर निर्मळ असेल तर पाण्यासारखा पैसा मिळेल-धो धो. पण अनुभव काय तर, पाण्यासारखा पैसा खर्च केला. तरी काही उपयोग नाही, असा. पाण्यासारखा पैसा खर्च होतो बघा, पण आहे का कुणाला त्याचे काही, असा. बघा कर्मात कसे अडथळे आहेत ते. कसा आपला ग्रं ग्रंथ खर्चिक आहे बघा. नी तो कसा असावा हेच तर श्री समर्थांना सांगावयाचे आहे. आता मध्यमा पूर्ण अग्नितत्व-काही ठिकाणी असे म्हंटले जाते पैशाचा धूर निघतो त्यांच्याकडे, जाळला तरी उरेल एवढा पैसा आहे त्यांच्याजवळ, पण समाधान नाही. सतत कोणी न कोणी आजारी तरी-कुरबुरी तरी-मूलं तरी वाया-नाहीतर भांडण तरी. चालूच काहीना काही. काहीच सुख नाही. काय करायचा एवढा पैसा घेऊन. असे सूर असतात. नाहीतर इतर आपदा. म्हणिजे मिळालेल्या पैशाचा कसा विनियोग केला म्हणजे समाधान-शांतता लाभून तो वर्धिष्णु होईल, याचा विचार आपल्या बुद्धीजवळ नाही. तर तो विचार आपणांस सात्विक संगतीतूनच सुचणार आहे, हे नक्की यावरुन समजावे. इथे म्हणिजे हा ग्रं शरीरावर कसा कार्य करतो हे सांगण्याकरीता केवळ पैसा हा एकच भाग प्रमाण आहे असे नाही, तर या एका भागाशिवाय आपणांस कुठलेच प्रमाण चालत नाही म्हणून केवळ पैसा हा घटक घेतला आहे. साऱ्यागोष्टीत आपले लक्ष केवळ पैसा कुठून-कसा-किती मिळेल यावरच असते नां, म्हणून इथेही तोच संदर्भ

आपण घेतला आहे. नाहीतर हा ग्रं, वीररस-शौर्यरस-कर्तृत्व-धाडस-हुशारी-चातुर्य-ब्रह्मपालन-विधी-नेम-सेवा-जनसेवा-विवेक-साहित्य-कला-व्यवसाय-स्वतंत्र-यंत्र-संशोधन-चित्रकारीता-कला-विद्या-व्यासंग अशा सर्वांगा संदर्भात कसे कार्य करीतो, तेही आपणांस पाहता येईल. त्यावरही आपणास प्रकाश टाकता येईल. या ग्रं ने कसे आपले चित्र पालटेल. नी त्यात हवे तसे रंग कसे भरता येतील. चित्र अधिक बोलके कसे करता येईल, तेही आपणांस पाहता येईल. परंतु सध्या पैसा या एकाच गोष्टीत सारे मिळविले-मिळाले असा मन-भावनांचा कल झाल्यामुळे इथे आपणांस तोच विषय घ्यावा लागत आहे. तसा तो जिव्हाळ्याचा नी काळजीचाही आहे नां म्हणून.

आता वायुतत्व तर्जनी-श्रीलक्ष्मी चंचल आहेत हे याच तत्वाने म्हंटले जाते. **कारण श्रीकपिवरहनुमंत- श्रीसमर्थरामदासस्वामिमहाराज श्रीश्रीगजाननमहाराज या अधिष्ठात्री देवता ज्यांच्या आहेत अशा त्या श्रीलक्ष्मी जर टिकवायाच्या तर या श्रीत्रयिंच्या पथ्यात-नियमात-शिस्तित बसले पाहिजे.** अवघड काही नाही हो यात, फक्त जनी जाणता भक्त होवोनी राहे..असे, एवढे-इतके सहज. पण ती जाणिवच फुटणे अवघड आहे. कारण त्या भावना ज्यातून फुटतील नी जाणिवेजवळ नेतील अशा आपल्याच गोष्टी आपण सोडून दिल्या नी नको त्या भावनाशून्य गोष्टी घेतिल्या. यात सर्वात दुःखदायक-क्लेशकारक असे की आपल्या गोष्टी न जाणून घेताच दुसऱ्या स्वीकारल्याही. त्यात नुकसान आहे हे कळते तरीही वळत नाही. निरनिराळ्या भ्रामक समजुती-स्वतःविषयी काही वेगळे समज-दुर्गुणांना गुणांचा दर्जा द्यावा असा आग्रह-कष्टाला दुय्यम दर्जा-शेतीवाडीचे महत्व न जाणणे-स्वधर्माविषयी अनास्था-कुळपरंपरा मोडीत-आळस-कशाचाही विधीनिषेध नसणे-अभ्यास नाही-स्वच्छता नाही-सारे यंत्रसामुग्रीवरचे परावलंबी जगणे-त्यामुळे पैसा हा असा खर्च होत जातो-वाहनेदुरुस्ती-औषधे-थाटमाट-चैन-क्लब-पार्ट्या-सिगरेट-तंबाखू-व्यसने-वेगळे घर-त्याचा खर्च-खुळ्या प्रतिष्ठांवर खर्च-खाण्यापिण्या-लेण्या-उठण्या-बसण्या-येण्या-जाण्यापासून, ते थेट जाणेही

यंत्रावरच आता. नी इकडे? यांच्या कक्षेत-कष्ट-यत्न-श्रम-घर्म-धर्म-वर्म-मर्म-ज्ञान-जाणिव-प्रेम-मैत्र-अभ्यास-स्वजाणिव या साऱ्यांवर भर. स्वकुटुंब-स्वपरिवार सुखीसमाधानी ठेवावा. रुचकर स्वयंपाक स्वहस्ते करावा. कुठल्याही यंत्राची मदत न घेता. का?तर या साऱ्या करण्यामागे फार मोठा अर्थ आहे. वाढावं-आवराव-घरे कशी स्वच्छ ठेवावीत. एखादा तरी कोपरा शेणाने सारविता येईल असा असावा. दिवा लावणे-श्लोक म्हणणे इत्यादी संस्कारांनी जे घडू शकेल ते अगणित पैशानीही शक्य होणार नाही. कळते पण वळत नाही असे झाले. परंतु आज याचे मूल्य उरले नाही. ते किती उशिरा जाणवेल? तसा उशीर होउ नये हिच सर्व श्रीसंतांना काळजी. परंतु असे सांगणेही जाच वाटू लागतो. 'त्यांच्या' भाषेत म्हणिजे आधुनिक म्हणविणाऱ्यांच्या भाषेत, आऊटडेटेड आहे हे सारे. सारखे रडू नका. जस्ट रिलॅक्स. अहो पण त्यांच्याच भाषेत सांगावयाचे तर युज अँड थ्रो ही बाब आता माणसांपर्यंतही आली ना? जोपर्यंत उपयोग होतो आहे तोपर्यंत कसबसे सांभाळायचे, नाहीतर..? असे घडते तरी गप्प बसायाचे? चालू द्यायाचे? नाही नाही, **ज्याला काळीज आहे त्याला हे असे नाही करता यायचे. तो हे असे करूच शकणार नाही. अहो साधा कांदा चिरतानांही रडतो. तर एखाद्याचे हृदय चिरतांना..?**उपजत काही भाव-भावना-विचार उरलेत की नाही? नी नाही, तर का नाही उरले? उरले का नाही? उरत का नाही? उच्चार प्रश्नार्थकच पण वेगळ्या वेगळ्या भावनेने करावा म्हणिजे कळेल. विचार-शोध व्हावयास हवा. विचित्र-पंरपरेला न साजेशी एखादी गोष्ट चटकन करतील पण चांगल्या गोष्टीसाठी हट्ट धरावा लागतो असे का? व्यसन चटकन लागते. पण सुटत मात्र चटकन नाही. घरे-दारे त्यापायी सुटतात. धुळधाण होते. स्वतःही मातीमोल होतात. हे सारे कळते पण वळत नाही, अशा अवस्थेत या पृथ्वीवर राहतात नी जातातही तसेच. ही अशी अनंत उदाहरणे डोळ्यांनी पाहूनही न बदलणारी माणसे असतात. काय म्हणावे? म्हणून बालपणी मनगटी, ही मनगुटी बाळास पाजावी लागते. या सर्व ग्रं संवधर्नासच बाळकडू असे म्हंटले गेले आहे. सारे संस्कार जर ओल्या

मातीतच रुजवायाचे तर मग अध्यात्मासच बाजूस का ठेवायाचे? इतर सारे आधार हे टेकू आहेत. तात्पुरते दिलेले. आरंभ ते अंत येथपर्यंत फक्त श्रीभगवंत. घडीने घडी काळ आयुष्य नेतो..देहांती तुला कोण सोडवू पाहतो? हे टेकू, जे स्वतःच टेकीस आलेले आहेत, टेकीस लागलेले आहेत, ते काय नी कीती आधार देणार? नी सर्वात महत्वाचे ते हे की आधार म्हणिजे ज्ञान. ज्ञानच आधार होउ शकते-होते-होत आहे. अज्ञान बुडविते, किती एक ते जन्मले नी मेले. म्हणून ग म्हणिजे ज्ञान. ते मनगटावर असण्याने कुठे नी कसा प्रवाह वाहतो याचाच अभ्यास व्हावयास हवा. आपण ज्यांस चंचल समजतो अशा श्रीलक्ष्मीस जर बांधायाचे तर ते मानवांस शक्य नाही. श्रीश्रीगजानन महाराजांनी आपल्या एका भक्तास सांगितले, महालक्ष्मी जी लोकमाता.. महाविष्णूची होय कांता..तिलाही त्वां कोंडीले..जिची असे अगाध सत्ता.. तेथें माझा पाड कोण? म्हणून गेलो पळोन..जगदंबेचे पाहून हाल..माझे चित्त भ्याले, काय बोध घेणार आपण यातून? कसाबसा धडपडून, सतत मालकाला बोल लावून, ओढग्रस्तीचा प्रपंच करुन, मिळेल त्यात समाधानी न राहून, जे कमावितो त्यास आपण पैसा म्हणतो. नी जो घरात आल्यानंतर घरातील शांतता, अंतरंगातील समाधान नी पैसा आला तरी दीनांविषयी तळमळ-दयाभूत अंतःकरण-सेवाभावीवृत्ती हे सारे जीथे असेल-स्वच्छता-अंर्तबाह्य शुचिता-कष्टाचे महत्व ज्या सदनात असेल तेथे जे असते, त्यास श्रीलक्ष्मी असे म्हणतात. आपल्या थोर परंपरांमध्ये केरसुणीस हे श्रीलक्ष्मी असे संबोधन आहे. पालीसही श्रीलक्ष्मी असे संबोधन आहे. तसेच काळ्या मुंग्यांसही श्रीलक्ष्मी असे संबोधन आहे. तेच उंबऱ्यासही-कलशासही-गोपद्मासही तेच. कुठे नी कशात श्रीलक्ष्मी आहेत बघा. शेतात-घामात-घासातला घास देण्यात-एकमेकींना बांगड्या भरण्यात-कुंकुं लावण्यात-ओटी भरण्यात देखील. या अशा सर्वत्र असणाऱ्या श्रीलक्ष्मीस न जाणता नुसतेच धावपळ करीत राहण्याने काय साधणार? दोन घास शांतपणे जेवायालाही वेळ नाही. सतत मोबाईलवर बोलणे नाहीतर टि.व्ही.-गप्पा. जे अन्न आपल्या तृप्ततेसाठी पक्व होऊन समोर ठाकले आहे. त्याचा काही मान-सन्मान-

आदर-कृतज्ञता-पूज्यभाव? श्रीमहाराज सांगतात, जे आवडे जयाला ते द्यावे तयाला..असे साऱ्यांशीच खरेतर संवाद आपण साधू शकतो. म्हणूनच श्रीसमर्थांनी श्रीमद् ग्रंथराज दासबोध हा श्रीगुरु-शिष्य संवादरुप ठेवला. का? तर आपण कुणापर्यंत-कुठपर्यंत-किती वरपर्यंत संवादु शकतो? तर प्रत्यक्ष परमतत्व अशा श्रीगुरुशी-श्रीगुरुंपर्यंत. नी मग आपण जर या एवढ्या उच्च पातळीपर्यंत थेट संवाद करु शकतो. तर त्याच तत्वापासून उत्पन्न झालेल्या या साऱ्या गोष्टींशी आपण निश्चितच संवाद साधू शकतो नां? इतके हे सहज आहे. पण आपण विचारही करीत नाही याचा. इथे आपणांस आपल्याच माणसाशी संवाद साधण्यास वेळ नाही. तेवढी जवळीक नाही. अनंत पूर्वग्रह-द्वेष-मत्सर-कपट-चढाओढ-स्पर्धा-प्रतिष्ठा-उच-नीचता-पैसा-श्रीमंती या साऱ्या गोष्टींमुळे आपण शांत राहू शकत नाही. सतत चिंता काळजी-व्याप-हुरहुर-औदासिन्य-नैराश्य-आलस्य काय आहेत या गोष्टी?दुबळे-अशक्त-आजारी-कमकुवत-शारिरिक-मानसिक-व्याधिग्रस्त, अशा ठिकाणी श्रीमहालक्ष्मी राहतील का? न मागे तयाची रमा होय दासी. श्रीशंकराचार्यांनी श्रीकनकलक्ष्मी स्तोत्र लिहून एका अठराविश्वे दारिद्र्य असणाऱ्यांच्या अंगणात सोन्याच्या बोरांचा पाऊस पाडला. नी तो ज्यांकरीता पाडला त्यांनी त्यातील एकाही बोरास साधा स्पर्शही केला नाही. त्यांना ते विष वाटले. नी त्यांनी त्यास स्पर्श करणेही नाकारले. अशी त्यांची वृत्ती. आपल्या बुद्धीकक्षेपलिकडील आहे हे सारे. पण सत्य आहे हे. शिकायाचे काय तर हेच. हे असे सारे शिकण्याकरीताही शिकावे लागेल आपल्याला. म्हणून तर्जनी ही धनरेषा असली-वायुतत्वाची असली, तरी श्रीलक्ष्मीतत्व काय किंवा वायुतत्व काय चंचल नाही. आपला त्याबाबतचा अभ्यास चुकीचा आहे. जिकडे शोधायाचे त्याच दिशेबाबत संभ्रम निर्माण करुन ठेविलेला आहे. नी झालेल्या नी होणाऱ्या गोंधळातून अल्पबुद्धीने नी चुकीच्या ग्रहणमार्गामुळे अधिकच गोंधळ माजला आहे. **म्हणून जर शिकायाचे तर स्वतःएवढे दुसरे अवघड पुस्तकच नाही.** धनाविषयी खूप समज-गैरसमज आहेत. परंतु बघा, श्रीमाऊलींना तर सर्वसुखाचे आगर 'बापरखुमादेवीवर' यांमधे सापडले. आपल्या बाबतीत

या आगराच्या संकल्पना कधीच श्रीपांडुरंगांपर्यंत पोहोचू शकत नाहीत. पोहोचू शकणार नाहीत. असे व्हावयास नकोच नको. अंगुष्ठ तत्व-व्यापक-विशाल-कुबेराचे भांडार पण हे कधीच लाभत नाही. ते आहे ते फक्त श्रीहनुमतांजवळ. सुवर्णकटीकांसोटी घंटा किंकिणी नागरा.असे श्रीस्थान. एकच श्रीकपिध्वज, कारण याकरीता मन पाहिजे शुद्ध अति हे पथ्य. बलाढ्य तरीही कोमल. शूर तरीही मित्र. सर्व प्रकारीचे बल तरीही दास्य. दासच. या अत्यंत कठीण गुणांनी परिपूर्ण असे रामदूत वायुसूत भीमगर्भ जुत्पत्ती । जो नरात वानरात भक्ती प्रेम व्युत्पत्ती । दासदक्ष स्वामिपक्ष निजकाज सारथी । वीरजोर शिरजोर धक्कधिंग मारुती।। काय म्हणावे या वर्णनास..? सुवर्णांनी त्यांचा आश्रय केला. त्यांनी नाही मागितले. असे हे सर्व देवांचा वरिष्ठ असे स्थान. थोरलादेव-मुख्यदेव-विश्वात्मकदेव-देवाधिदेव श्रीमहादेव. नी त्यांनी दिलेला हा ग्रं शब्द परिपूर्ण अर्थाने सर्वार्थाने आपणांस लाभी आहे.

त्याचे वहन कसे होते? शक्ती कशी प्राप्त होते?ग्रं हा मुळारंभाचाही आरंभ कसा आहे बघा-पावसाच्या पाण्यातून मोती होतात. वैदुर्य-गोमेद-हिरे-गारा या पावसाच्या पाण्याबरोबरच येतात. मनगटावर जीथे ✓ असे चिन्ह टेकते, यासंबधीची आकृती मागे दिलीच आहे, तेथून एक बाणसदृश जागा, बरोबर नस दिसते तिथे, म्हणिजेच मधोमध येते. मनगटाची नाडी पाहतात तो भाग. त्यास आपण सुलटा हात म्हणू. तो हात, तो भाग, वाम मनगटात ही शक्ती बल दर्शविते. नी सव्य मनगटात ही शक्ती तेज दर्शविते. परंतु या दोन्ही शक्ती प्रत्येक जीवात गुप्त असतात. त्या प्रगट करण्यासाठी श्रीगुरुआदेश लागतात. सहजी वाचून करता येईल असे ते व्यायाम नव्हेत. मुंगी मनगटाच्या त्या भागावर चावत नाही. प्राणी-पक्षी यांना जे ज्ञान असते, ते खरेतर माणसांत अधिक्याने सापडले पाहीजे. परंतु तसे होताना दिसत नाही. बल म्हणजे ताकद नव्हे, तर बल म्हणिजे शोध. शक्तीचा शोध. आपणांस स्वतःचा शोध घ्यावयाचा आहे. जे जे ब्रह्मांडी ते ते पिंडी. आपण काहीतरी विसरलो आहोत. नी आता ते आठवत नाही-स्मरत नाही. अनंत शरीरवस्त्रे धारण केली, अनंत योनिमार्ग धुंडाळीले-पार केले,

नी आता नरयोनीत ते सारे सारे आठवावयाचे तर तेवढेच आठवत नाही. काही शिकायाचेच नाही आपणांस खरेतर. ज्या आत्म्यानी ही सारी वस्त्रे धारण केली-टाकीली-घेतिली तो नित्य आहे. जीवाजवळची आहे. या नित्याजवळ जाण्याकरीताच अध्यात्म आहे. त्या नित्याच्या पानाचाच हा पहिला शब्द आहे ग्रं. त्या नित्याशीच संवादायाचे आहे. नी तेवढेच तेवढे होत नाही. सारं सारं आठवणं म्हणिजे बल. सारच्या सारं स्मरण होणं म्हणिजे बल. म्हणूनच श्रीसाधु-संत ध्यानमुद्रेत हेच हात उपडे ठेवून लक्ष लावून बसतात, की स्मरेल स्मरेल. पण इथेच कृपा लागते. लग्नात या मनगटासच हळदीत भिजविलेला दोरा अथवा हळकुंड यांस हरकुंड..हरीद्रा म्हणतात. त्याचे आपण अपभ्रंशाने हळद केले. ते हळकुंड मनगटास बांधण्याची प्रथा आहे. लहानपणी काळे-पिवळे मणि जे मनगटात बांधतात त्यांसच मनगुटी असे म्हणतात. तेही एक स्मरणसुत्रच आहे. एक काळा-एक पिवळा असे ९ मण्यांचे सुत्र. काळ्याजवळ आरंभी नी अंतीचं सूत्र येणं महत्वाचं. ते तसे आले की येथील शक्ती अल्पशी-अस्पष्टशी बाल जीवास जागविते. नी मुल कुशीवर वळणे-पलटणे-पालथे पडणे-रांगणे-उभे राहणे-पायांची दुमड करणे, ज्यास आपण मूल सायकल करते असे म्हणतो ते, शिकते. पुढे मुल उभे रहायाला लागले की डुगडुगते-पडते तेव्हा हे सुत्र,




पुर्वी या मनगट्या हळद व कुंकू यांच्या गोळ्या करून बांधल्या जात. यामधे [illegible] हे मुल [illegible] मनगटाची रचना असते. म्हणजे काळ्यामण्याशी संधी होते




ही ९ ची सुत्री आहे. मुल चालायला लागल्यावर ही शक्ती गुप्त होते.

आरंभी-अंतीचे पुन्हा काळ्याऐवजी पिवळ्या मण्याजवळ आणावे. आरंभी-अंतीचे सुत्र पिवळ्याशी जोडले की मुल चालायाला शिकते. शरीराने त्यास उभे केले की, ही शक्ती लुप्त होते. नी मुल पुढे बुद्धीशोध करण्यासाठी शालेय शिक्षण घेते. इथेच श्रीगुरुसान्निध्य त्यास लाभायाला हवे. येथेच पूर्णत्वप्राप्ती आहे. हिच ओली माती नी शुद्ध मति. मनगटामध्ये वीर-जोश-चैतन्य-ज्ञान प्रस्फुटत असते यावेळी. फक्त मन शांत-शुद्ध-सेवाभावी-जाणते-श्रीगुर्वदिश पालनकर्ते झाल्याशिवाय या गोष्टींची प्राप्ती होणे नाही.

आता **दुसरी ग्रंथी** आपण बघूया, अंक म्हणिजे मांडी. या भागात एक अशी शक्ती आहे, ज्या शक्तीचे वर्णन होणे नाही. वामांग हे शक्तीस्थान. तर सव्यांग हे युक्तीस्थान आहे. मानवाचे हात अर्धांकापर्यंतच पाहोचू शकतात. परंतु अवलियांचे हात अंक ओलांडून जानु म्हणिजे गुडघ्याच्याही पुढे असतात. अजानुबाहु असे. उभे राहिल्यावर मानवाचे मनगट अंकाच्या ज्या भागी लागते, तेथेच लहान मुलाचे मस्तक असते. म्हणिजे मुल मांडीवर घेतल्यावर तो सव्य वा वाम अंकी निजला की मस्तक-मान-पोटरी नी टाच असे या अंकावर-अंकाशीच येते. एखादी गोष्ट आपण कोणत्या स्तरावर घेतो, यावरही आपली बुद्धी नी आपले ज्ञान अवलंबून आहे. आपले ज्ञान म्हणिजे आपल्यास होणारा बोध-आपणांस होणारे ज्ञान. जर सामान्य संदर्भावर हे ज्ञान घेतिले तर सामान्यज्ञान. तर्क-संशयाने घेतिले तर मग तसे ज्ञान. त्यातून मग फाटेचफाटे फुटत जातात. कुठल्या फांदीवर फुल येईल हे जसे बीजास ठावकी असते. तसे कुठल्या टोकाशी-पर्णाशी, ही ज्ञानशिखा भेटेल..नी जीवन मोहरुन जाईल याचे ज्ञान, या अंकी-या अंकावर जीवास होते. मुलास मांडीवर घेतले की झोप लागते.. का? याचा अभ्यास करण्याची तशी आवश्यकता कोणासच वाटत नाही. कारण आपण सारे ती एक स्वाभाविक प्रक्रिया समजतो. परंतु तसे ते नाही. बघा, जन्माला येण्यापुर्वीच जो म्हणिजे जीव स्वतःचे घर-तात-मात स्थाने, डावी-उजवी घरे, म्हणजेच चुलते-मामे, देश-प्रदेश-आडनांव-कुळ-गोत्र-आंसन-झुला-खेळणा-पाळणा-लोळणा-वाढणा-चोखणा ठरवितो. ही सारी स्वाभाविक प्रक्रीया नाही. नव्हेच. त्या

श्रीपरमशक्तीची ती एक विशिष्ट योजनाबद्ध पद्धती आहे. फक्त आपणा साऱ्यांचे दुर्दैव असे की, आपण स्मरणशक्तीने दुर्बल आहोत. आपलेच आपणांस सारसर्वस्व आठविण्याकरीता स्मरण्याकरीता ग्रं ची उपपत्ती- योजना-योजनाबद्धता आहे. उगच वाटलं म्हणून, सहज म्हणून, काहीतरी करायाचे म्हणून, असे म्हणून हा ग्रं सर्वप्रथम श्रीसमर्थांनी घेतिला आहे असे नव्हे. आपण वाचितच नाही खऱ्या अर्थाने हे ग्रंथ. श्रीसमर्थ सांगतात माझे स्वरुप स्वतःसिद्ध तो हा ग्रंथ दासबोध. मग..?श्रींचे दर्शन व्हावयास पाहीजे नां आपणांस त्यातून. संवादसूत्र आहे नां हा श्रीग्रंथराज? मग बोलता आले पाहिजे श्रींशी. संवादिता आले पाहिजे नां तयांसी. नी मग कैसे वाचावे श्रीग्रंथराजासी? कसे वाचावयास हवे..ग्रंथी उकलावी कुठे नी कशाशी गाठ मारली-पडली-बांधली-जोडली-सोडली, किती गाठी अशा? या साऱ्यांचा उलगडा या ग्रंथारंभातच जीवास व्हावा हीच श्रीसमर्थांची तळमळ. हे जीवास स्मरले की, अभ्यास करणे-माहिती गोळा करणे- शिकणे-चाचपडणे-संभ्रम-शंका हा काहीकाही गोंधळच राहणार नाही. हे सारे काहीच स्मरत-आठवत नसल्याकारणाने पुन्हा पुन्हा नाईलाजाने सारे शिकावे लागते. नी अर्धे-पाऊण आयुष्य ही सारी माहिती गोळा करण्यात नी तदनुषंगे अनुभव घेण्यातच खर्ची पडते. म्हणूनच श्रीसमर्थ आपणांस आपल्या ग्रं चा आरंभच करुन देत आहेत. बघ तू आठव, तू समजून घे, मी सोबत आहे, श्रीराम पाठबळ आहे. समर्थ सोबत? एवढ्या पाठबळावर ग्रंथ उकलायला, नी कुठे काय ठेवले आहे आपण.. ते समजावयाला अवघड जाणार नाही. नी जायलाही नकोच. परंतु जर एवढी उच्चसोबत, एवढे अतुलनीय पाठबळ, एवढे बलदंड आश्वासन, एवढी भीमरुप उकल, एवढे महारुद्र अधिष्ठान प्राप्त होऊनही जर आपण केवळ हे ग्रंथारंभ लक्षण आहे.. पुढे काय? या वाचनाने काय?एवढेच सामान्य संदर्भ जर घेत राहिले नी त्या शिवस्तरापर्यंत त्या सर्वंकषकल्याण उंचीवर पोहोचलोच नाही तर व्यर्थ नाही का? श्रीगर्भातच ज्यांनी आपल्या मातुश्रींना जाणिव दिली की पोटी कोण येत आहे. महाबली-वीरप्रतापि- बहुधारिष्ट्याच्या गोष्टी ऐसी पुत्रप्राप्ती. वयाच्या ७ व्या, इतक्या बाल-

इतक्या सानुल्या वयातच ज्यांची जाणिव वैश्विक स्तरावर पाहोचून विश्वाची चिंतावाहक ठरली. नी वयाच्या पाचव्या वर्षीच पुढे काय करावयाचे हे जे निश्चित करु शकतात, तद्नुसार स्वतःस घडवू शकतात, या काय नुसत्या सांगावयाच्या कथा आहेत का? असतील का? नाही हो, शक्यच नाही. तर वय-वर्ष शुन्य म्हणिजे श्रीगर्भावस्था..ते वय-वर्ष पाच, जीव कुठल्या स्तरावर, किती उंचीपर्यंत पोहोचु शकतो हे श्रीसमर्थांनी आपणांस यातून दाखवून दिले आहे. यासच लीला म्हणतात. काय आपले श्रीसद्‌गुरु आहेत हो. उठा..शोधा समर्थांना. बघा ती पाऊले कुठे दिसतात का-भेटतात का आपल्याला. कुठे भिक्षा मागत, कुठे राम वाटीत. कुठे राम लुटीत. घळीत-विवरात आपली चिंता वाहत, श्रीरामासोबत विश्व पाहत असतील ती पाउले. शोधा..शोधा. गवसतिल. शोधा. यत्न करुन शोधिले नी गवसले नाही इतके हे विश्व कठोर नाही. जाणा. शरीरवस्त्र अनंतवेळा-अनंत प्रकाराने-अनंतप्रकारीचे बदलून जीव या पृथेस आला. पण पार्थिवपण टाकून चैतन्य दिशेकडे वळून, 'अजिर्ण' होणारे चैतन्यवस्त्र तो नेसलाच नाही अजूनी. त्याची तर त्याने घडीही मोडलेली नाही. ते कसे नेसावयाचे? परिधान करावयाचे? हे ही ज्यास अद्यापी ठावकी नाही. त्याने त्या ठिकाणाहून, नी या अशा स्तरावरुन श्रीग्रंथराजदासबोधास पाहीले, तर तो सामान्यातिसामान्य ठरणार नाही का? होणार नाही का? बरे आपला स्तर हाच उच्चीचा असे अहंकारयुक्त भाषण, त्यास साऱ्या अमोल-अतुलनीय संवादांपासून दूर ठेवेल त्याचे काय? नी परमार्थात दूर-अंतर या अशा शब्दांस तर जागाच नाही. येथे सारे निकट-जवळच-जवळचे-आपल्यातच. ते तसे आपणांसही पटत असतेच. परंतु स्विकारायला अहंकार आड येतो. नी अहंकार त्या 'अजीर्णा' पर्यंत पोहोचु न देता, वस्त्र जीर्ण करावयास लागतोही. बरे त्या अहंकाराशी संघर्ष करायचा किंवा तो टाकून सोडून द्यायचा तर कसा? कुठे? कधी? केव्हां? हे सारे तर्क-प्रश्न उभेच. एखादी गोष्ट आपण कुठे सोडून दिली म्हणिजे, टाकून दिली असे होईल? म्हणजे परत ती येणार नाही जवळी? एवढे तरी किमान ज्ञान-शोध-बुद्धी-अभ्यास जीवाचा हवाच. नाहीतर तात-मात स्थाने तरी तेवढी

सक्षम हवीत. अभ्यासी-हुशार-चतुर हवीत. की ज्यांनी जीवाचे, आपल्या मुलांचे हे प्रश्न सोडवावेत. त्यांस प्रश्नांपासून वाचवावे. परंतु येथे तर तात-मात ही स्थानेच चिंता-प्रश्नांनी ग्रस्त दिसतात. आपले अजून प्रश्न संपले नाहीत, तर आपण दुसऱ्याचे का निर्माण करावेत? नी त्यास दुसरा तरी कसा म्हणायचे हो..तो तर आपलाच. आपलाच जीव-पिंड-मुलं-बाळ. त्यास दुसरा कसे म्हणावयाचे? पण हा कसलाच, या कशाचाच विचार न करता प्रश्नात प्रश्न निर्माण करुन सर्वांनीच आयुष्यात, ते प्रश्न सोडवत नी भोगत बसायाचे? सांगा हा चैतन्यस्पर्श म्हणवेल का? म्हणावयाचा का? पार्थिवच नाही का हे? स्वतंत्रता कशास म्हणावयाची? नी या स्तरावर राहून जर आपण एखादा ग्रंथ अभ्यासत किंवा वाचित असू..तर काय नी कसे काही प्राप्ती होईल? याचा काही विचार होणार आहे की नाही? करावासा वाटतो की नाही? करावासा वाटावा. म्हणूनच श्रीसमर्थ सांगतात आधी ग्रंथ पहा. उगीचच आसक्ती-दुराभिमानाने ग्रंथास नावे ठेवू नका. आधी जाणा-जाणून घ्या. तद्नंतर होणारे ज्ञान कधीच दुःख-नैराश्य-संकटे यांकडे नेणार नाही. नेत नाही. म्हणून अहंकार-गर्व कुठे टाकावयाचा? याचा किमान अभ्यास हवा. आपल्या बुद्धीने याचा विचार करावयाचा, तर पाण्यात टाकलेल्या गोष्टी पुन्हा येत नाहीत-उद्भवत नाहीत. पाण्यात सोडून द्यावे? पाण्यात सोडून द्यावा..पण कसा? तर येथे पुन्हा जर आपण शब्दशः पाणी घेत बसलो. तर पुन्हा एकदा आपल्या सामान्यातिसामान्य बुद्धीने आपला घात केला असेच म्हणावे लागेल. येथे पाणी म्हणिजे निर्मळता, श्रीसद्गुरुंचे चरण. अशा निर्मल चरणांशी सारी तीर्थे एकवटलेली असतात. आपल्यापेक्षाही निर्मलाचे दर्शन घडून हे पाणी-हे श्रीआपोनारायणतत्व, अशा निर्मलांचे पद प्रक्षाळीत असते. नी नित्य शुद्ध, नित्य तीर्थयुक्त राहत असते. अशा निर्मलचरणांसी आपण आपला अहंकार त्यजावा. नी अशा निर्मळ चरणांजवळ आपण स्वतःस शांतवून अहंकाराचा काटा स्वहस्तेच काढावा. म्हणे दास सायास त्याचे करावे । जगी जाणता पाय त्याचे धरावे । गुरु अंजनेवीण तो आकळेना । जुने ठेवणे मीपणे ते चुकेना..।। असे सारे लाभून आपली पुन्हा

भणंग अवस्था होण्यास कोणी दुसरा का कारणीभूत होतो?असतो?असेल? तर नाही-नाहीच. पाणी आहे याचा अर्थ तहान आहे. आभाळ आहे याचा अर्थ व्याप्ती आहे. मन आहे याचा अर्थ गती आहे. परंतु शरीर आहे याचा अर्थ चैतन्य आहे असा केला तर?तसे आढळत नाही. पार्थिवास तगविण्याची-जगविण्याची-टिकविण्याची-सांभाळण्याची-जपण्याची धडपड म्हणजे चैतन्य किंवा जगणे का? नाही कदापि नाही. वस्त्र ज्याकरीता प्राप्त झाले त्यांशी निगडीत राहणे एवढे जरी जमले तरी सुरुवात झाली. परंतु त्यासही दुर्लक्षून जर आपण वागत राहिलो-बेपर्वा-बेफिकीर राहिलो तरी 'ते'चुकणार नाही. होणारे होणारच. नी गाडी उताराला लागल्यावर कुठे गतिरोधनाच्या सुविधा आहेत का? म्हणिजेच तिकडील भाषेत ब्रेक आहेत का, हे शिकणे हास्यास्पद नव्हे का? म्हणून ग्रंथारंभ करा. उठा..तेव्हा नाही तर आता संधी आहे. यात सारे सारे सांगितले आहे. कोण ग्रंथ-कोणाचा ग्रंथ, ते आपण पुढे पाहणारच आहोत. आधी ग्रं ही सुरुवातच आपली भरभक्कम नी दृढ झाली पाहिजे. पाया भक्कम तर इमारत घट्ट, टिकाऊ नी आदर्श. ज्ञानदेवे रचिला पाया..येथे फक्त श्रीज्ञानेश्वरमहाराज असे एवढेच घेतले, तर पुन्हा सामान्यबुद्धीने उचल खाल्ली असे होईल. श्रीज्ञानदेवांविषयी जेवढा आदर-पुज्यभाव तेवढाच ज्ञानाविषयीही हवाच हवा. ज्ञानाने रचिलेला पाया..ज्ञानाने घातिलेला पाया..असेही येथे म्हणायाचे आहे. अज्ञानाने घातिलेला नव्हे. अज्ञानाचे पाये..तर आपल्या सर्वबाजुंना आपण पाहतच आहोत. शारीरिक कमकुवत-मानसिक अशक्त-दुबळे-आजारी-ग्रस्त-त्रस्त-संतप्त-कृद्ध-मग्रुर-संतप्त-काय आहे हे? चित्र बदलायला हवे. वास्तविक सारे अभ्यस्त हवेत नी तसे ते आपण आहोतही. फक्त कंटाळा सुटला-आळस परागंदा झाला की अभ्यास आलाच. पण शोध-ज्ञान याचाच कंटाळा आहे. आता गतिरोधन सुविधा हा शब्द कळणेही अवघड आहे. प्रश्न पडेल म्हणिजे काय असा, म्हणून ब्रेक हा शब्द वापरला की कळेल, का हे असे? आपले समृद्ध-ऐश्वर्य सोडून, हिरे-मोती सोडून हे काचखडे वेचण्याचा कसला हा हट्ट. काय हा वेडेपणा. कशासाठी हे असं? अमृताशी पैज लावून जर माझी गीर्वाण-माझी प्राकृत-मराठी-

मायमराठी-मायमाऊली-माझी मातृभाषा, जिंकणारी-जिंकेल-जिंकेलच अशी त्या श्रीज्ञानियांच्याराजाची ग्वाही आहे. जिंकु शकेल..अशी भ्याड-भित्री वचने नाहीत ही. तर मग या एवढ्या अतुलनीय विश्वासास मी जाणिले नाही, असेच म्हणावे लागेल नां. त्यापेक्षा जाणून घ्या, जाणून घ्या आपली भाषा. तीमधे लपलेले आपले आरोग्य. आपले ऐश्वर्य, जाणून घ्या. मी हा एक असा स्तर आहे, जो सामान्य भावनेच्या पलिकडे, स्वकेंद्रिताच्या पलिकडे, पाहू देत नाही. नी आपण त्यांस बांधून ठेवू शकत नाही. त्यावर कोणाचेच नियंत्रण नाही. नी श्रीसमर्थ सांगतात, जीता बोलती सर्व ही जीव मी मी..चिरंजीव ते सर्वही मानितातीअकस्मात ते सांडोनिया सर्व जाती..,**सांडून का जातं? तर भरलेलं आहे हे कळतच नाही नां म्हणून.** बुद्धीची केवढी दैन्यावस्था आहे ही. येथे आपणांस, एकूण सर्वांच्याच बुद्धीस कमकुवत म्हणावयाचे नाही, तर ती बुद्धी-तिचे सामर्थ्य-तिच्यातील असामान्यत्व जागविण्यासाठी-तिची तिलाच ओळख पटावी-तिच्या शक्तीचे तिलाच स्मरण व्हावे-तिचा तो भ्रं उलगडावा त्यासाठी हे करावयाचे आहे. या साऱ्यामागील हेतू अत्यंत शुद्ध आहे. नी श्रीमहाराज सांगतात, हेतू शुद्ध असल्यावरी..साह्य होतो जगजेठी. दूध जसे मुळातच गोरस-शुद्ध-सात्विक-आरोग्य-बल-बुद्धीवर्धक घटकांनी तत्वांनी युक्त परिपूर्ण आहे. येथे पुन्हा प्रथम ग.. चे अभिधान-अधिष्ठान. तर असा हा शुभ्र-धवल-स्वच्छ-सात्विक-ताजा-सर्वअंगांनी-ब्रह्मरसांनी-ज्ञान-विद्या-वय-आयुरारोग्य-ऐश्वर्यांनी परिपूर्ण पोषक असा गोरस-दूध, त्यास ही फाडावे लागते. जाणिवपुर्वक ही क्रिया करावी लागते, कारण का? तर त्यातून ते सायुज्य जीवास प्राप्त व्हावे म्हणून. सायुज्य म्हणिजे साजुक तूप. त्यातिलही अर्क, फुलातील मधाचाही मधबिंदु. मधाचे केंद्रस्थान. तसे हे दुधाचे केंद्रस्थान. दुधाचा मध्यबिंदु म्हणजे गणिती पद्धतीने दूध पसरवून मध्य नव्हे हा..नाहीतर पुन्हा इथे आपली...! असे नकों. आता ही बुद्धी-हा स्तर, जी शंका निर्माण करतो-विश्वास होऊ देत नाही-बसू देत नाही, तो सोडून द्यावयासच हवा. तरच लाभ आहे. लाभणार आहे. तरच भलं. चांगभलं होईल-होणार आहे. ती तळी अशी उचलावयाची आहे. परंपरेने खंडोबाच्या

नवरात्रात तशी ती उचलतातच. पण तळी म्हणिजे काय? पुन्हा अभ्यास नाही. तो केला पाहिजे. अभ्यासाने-ज्ञानाने जी प्राप्ती आहे ती अन्य कशाने नाही. परंतु तो अभ्यास म्हणिजे केवळ शालेय शिक्षण एवढाच मर्यादित अर्थ करुन घेतल्याने, नी तशा अर्थाचे समज दृढच झाल्याने फार फार घोटाळा नी नुकसान झाले आहे आपले. बरे ते सर्वत्रांचेच झाले असल्याकारणाने ते नुकसान आहे, हेच आता वाटेनासे झाले. ती सुधारणा आहे, असेच वाटू लागले तर काय करावे? आरंभिली बोहरी दयाळा..कल्याण करी रामराया..शेवटी हेच..आर्तता कळू दे. कळू दे. कळावे लोभ असावा, असे लिहून जर तो असता-जागता-उमजता तर ज्ञान. हे केवळ शब्द आहेत हो. लहानांस अ.आ. नी मोठ्यांस शि.सा., जेव्हा हे असे सुरु झाले ना, तेव्हाच ज्ञानाचा म्हणजे खऱ्या ज्ञानाचा संकोच व्हायला लागला. प.पू.-स.न.वि.वि. हे दिसावयाला बरे. लिहावयाला आटोपशीर. पण हे अवमर्यादन झाले. अन्याय झाला शब्दांवर. त्यातील पूज्य भावांवर. असे करुन कसे चालेल?शब्दांचा अशापद्धतीने संकोच करणारे आपण कोण? येथे श्रीसमर्थ तर शब्द फोडून, अर्थ-आत्मज्ञान-जाणिव-विवेक-प्रेम-समर्पण-शांतता-समाधान-ऐश्वर्य-यश-किर्ती-प्रताप-श्रद्धा-निष्ठा-भक्ती-उपास्य-उपासना-साधना-अनन्य-श्रवण-किर्तन-नामस्मरण-पादसेवन-अर्चन-वंदन-दास्य-सख्य-आत्मनिवेदन-तत् त्वं असि-अस्ति-भाति-प्रिया-ङ ङ ङणत्र ङं-ऊ-ग्रं या साऱ्याचा, आदी साऱ्याचा उलगडा करुन घ्या, असे म्हणत आहेत. तर? तर शब्द किती पूर्ण-परिपूर्ण-पूर्णत्वास गेलेले आहेत हे उमगायला हवेच आपल्याला. आपण या शब्दांचाच खरेतर पूर्णपणे अभ्यास करावयाला हवा. बघा, बाराखडे म्हणिजेच आपली बाराखडी, यातून बारावं ते बारसं. नी पुन्हा बारसं ते बारावं. एवढं ज्ञान आपणांस करवून घ्यावयाचं आहे. बाराखडे नी बाराखडी या बाराखड्यांचे तरी आपणांस कुठे पूर्ण ज्ञान आहे? आता तर हे सारे सोडून, वेगळे घर-वेगळी रुजवण-वेगळे संस्कार? मुलाची सर्वांगिण प्रगति-दहावितच वाढतय मुलाच बी.पी. काय करतो आहोत आपण? चुकते तेच योग्य असे वाटू लागणाऱ्यांच्या दुनियेत बरोबर..या गोष्टींनाच

जर न्याय नाही, तर 'जो' बरोबर आहे, तोच मागे पडला-त्याला बरोबरच नाही घेतिला, तर काय हो? जेथे जातो तेथे तू माझा सांगाती..कुठपर्यंत-कसा? तर बोलू जाता बरळ..करीशी ते नीट..नेली लाज धीट..केलो देवा.. येथपर्यंत जो बरोबर आहे तो. येथे लाज म्हणिजे पार्थिव. नी धीट म्हणिजे 'चैतन्य'. एवढा आकाशगर्भ अर्थ-व्यापक अर्थ आपणांस घ्यावयाचा आहे. पण आपण वेगळ्याच 'अर्थाच्या' मागे लागल्यामुळे या सार्थ करणाऱ्या साऱ्या गोष्टींचा आपणच संकोच केला. नी स्वतःहून सौख्याचे, आपल्याच मंगल मांगल्याचे घडे आपण सांडून दिले. अहा अहा रे दुर्दैवा..त्वां कैसा साधिला दावा..माझ्या करे संतसेवा..होवो ना तू दिलीस. अनुतापाचे हे उद्‌गार जर संकोचले तर..? आटोपले नां ब्रह्मज्ञान? श्रीसमर्थ सांगतात, अनुताप झाला ज्यासी..ब्रह्मज्ञान सांगणे त्यासी..,बघा कुठल्याचा कुठे दर्जा. आता हा आपला अहंकार अनुतापाच्या पातळीवर न्यावयाचा तर तो तळ गाठावा लागेल, की जेथे अहंकार नाही. अथवा ती उंची गाठावी लागेल, जेथे हा अहंकार पाहोचू शकत नाही. हे [illegible]ल्यामधेच आपले चालणे असल्यामुळे सारी फरफट होते आहे. कळते पण वळत नाही, ही अवस्था. म्हणून तर तळी उचला, नाहीतर खंडोबा. कशाचा, तर अवघ्या खेळाचा. अहो, तो केवळ कुळधर्म नाही. ते मुळात काय आहे-तळात काय आहे, हे सांगण्याकरीता केलेला विधी आहे हो. अभ्यास याचाच हवा की हे का? कसे? ज्ञान प्रश्नातून येते, तर्कातून नाही. नुसते शब्दपांडीत्य माजले जगी अतोनात..त्यानेच आहे झाला घात..आपुल्या या संस्कृतिचा.. हे श्रीगुरुवचन आहे. श्रीगुरुबोल आहेत. याचा शोध-गांभीर्याने विचार, हा झालाच पाहिजे. आपल्या संस्कृतिच्या घातापर्यंत गोष्टी आल्या तरी आपण निद्रीस्त? उठा-उत्तिष्ठ-जाग्रत, हे फक्त श्रीकृष्ण श्रीअर्जुनांस म्हणाले एवढ्याच अभ्यासापुरते का? अर्थात आता हे प्रश्न, उत्तरापुरते-धड्यापुरतेही नाही हो उरले. आता हे प्रश्नही कोणी विचारीत नाही. याचाच अर्थ आता हे धडेही संपले-संपवले नी धडा घेणेही थांबले. उद्या काय घडेल? काय पुढे वाढून ठेवले आहे? हे मुलाचे पाय पाळण्यात दिसतात या न्यायाने बघावयाला-जोखावयाला नको का? का हे कोणा एकाचे

अथवा आपण सोडून तिसऱ्याचेच काम आहे? कसे बदलेल हे सारे, म्हणून डोक्यास हात लावून भागणार नाही. तर प्रथम हे आपलेच काम आहे, हे उमजले पाहिजे. असा जर दिवा बालपणीच प्रत्येकात लागला, तर पार्थिव उरेल का? नी अजून हा एकोपा-ही एकजूट-हे एकमत एवढ्याशा-एवढ्याही पातळीवर होत नसेल तर चैतन्यस्पर्श कसे म्हणावयाचे? पृथ्वीचे राज्य उपभोगायचे तर स्वतः राजा होऊन ते नाहीच उपभोगिता यायचे. कारण राजा, यात प्रजा अगोदर आहे. राजा पूर्वीच ती आहे. तिस आवडेल ते नी तसे देण्यात राजेपण पिचून जाते. गुलाम-नोकर होउन जाते. जसे आता आपण सारे यच्चयावत् जगत्रय मनाचे गुलाम-नोकर आहोत. असूनी खास मालक घरचा..म्हणती चोर त्याला..परवशता पाश दैवे ज्यांच्या गळा लागला..,कीती कीती अंतःकरणातून या आर्तता निघाल्या. या साऱ्या देशाच्या-जगाच्या केलेल्या आरत्याच होत. त्या जाणल्या तर चैतन्य, नाहीतर पार्थिवच. म्हणून आपण त्या चैतन्याचे-त्या शक्तीचे पूर्ण दास्य करावे. कारण राजा नी स्वामी या स्वरुपात फरक आहे. दास हा भाव आहे. ती नोकरी-गुलामगिरी-मालक-नोकर असले सत्ता-स्पर्धा-संघर्ष नाहीत. स्वामी रामो मत्सखा रामचंद्रा..असे प्रत्यक्ष श्रीमहादेव सांगत आहेत.

**..बाळलेणी..**

ज्या शिवांनी आपणांस पिंड दिला नी ज्या आईसाहेबांनी म्हणिजेच श्रीउमा-पार्वतीदेवी यांनी वहन म्हणिजेच मार्ग-दिशा दिली. पुढे काय? हा प्रश्न पडण्याआत श्रीगजानन म्हणिजेच ज्ञान दिले. वहनास वळण म्हणून श्रीशारदा-श्रीसरस्वती दिल्या. श्रीसरस्वतींनी त्यांच्या सदनातून जीवाला बाळलेणी दिली. कारण जीव हा श्रीमहादेवांकडून आलेला आहे. त्यास तसेच कसे पाठवू. जीव प्रथमच माझ्या अंकावर आला आहे. मी प्रथमच त्याचे मुखावलोकन करीत आहे, तर मी त्यास काहीही न देता कसे पाठवीन? म्हणून श्रीसरस्वतींनी जीवास ही बाळलेणी दिली. यासच उपजत-अंगभूत-अंगचेच-बाळकडू-पूर्वीचे संस्कार, असे आपण संबोधतो. श्रीसरस्वतींच्या अंकावरील वीणा म्हणिजेच जीवस्वरुप-नादस्वरुप-

झंकार-पदन्यास-पदरव-शब्दांचेअर्थ-ज्ञान-भाव-प्रेम यासह नर्तन. अ उ म या त्रि धारांवर-भूमींवर-आधारांवर जीवाने केलेले कर्तृत्व, म्हणजेच हे नर्तन होय. नर्तन म्हणिजे नृत्य-नाच या अर्थानी जे आपण घेतो, तसे हे नाही. श्रीगणेशांच्या नृत्याबाबतही नाच हाच संबंध कींवा माहिती आपणास आहे. श्रीगणेश नाचले, असेच आपण समजतो. परंतु ते नृत्य कींवा नाच नाही, तर ते कर्तृत्व या संदर्भातच आहे. मुळातही ते तसेच आहे. एकेका अक्षरावर ज्ञानाचे नर्तन, जे आता आपण थोडेफार समजून घेण्याचा प्रयत्न ग्रं या अक्षरामधून करीत आहोत, ते हे नृत्य-म्हणजेच कर्तृत्व. ग्रं उमज. हे न जाणणे-हे न समजणे हीच आपल्या बुद्धीची कमकुवतता कींवा मर्यादा कींवा लहानपण कींवा बुद्धीक्षेत्र विस्तारलेच नाही, असे म्हणूया. वाणिस्वरुप-परा-पश्यंति-मध्यमा-वैखरी अशी ही बाळलेणी श्रीसरस्वतीमातांनी जीवास दिली. नी कशी आहेत ही बाळलेणी ही वाणि, तर शब्दोच्चारासरशी ती मयूरास नर्तन करायला लावील, एवढी सुंदर नी एवढी प्रभावी वाणि. जीवाचा श्रीगणेश व श्रीशारदामातांनी केलेला केवढा हा सन्मान आहे हो. कसा ग्रं आहे हा आपला. केवढा सुंदर नी परिपूर्ण. परा-पश्यंति-मध्यमा-वैखरी नी अशी या श्रीशारदा सदनातील ही दालने आहेत. श्रीपरा-श्रीपश्यंति-श्रीमध्यमा-श्रीवैखरी या चार, वाणि होत. वाणि म्हणजे वाचा-वाणि म्हणिजे-घळी-कपारी-गुहा-विवरे-ढोल्या-एकांतस्थली-गुप्तस्थली-सल्ला मसलतीच्या गूढ जागा-गुप्त जागा. अशा या चारवाणि म्हणिजेच ही चारवने आहेत. श्रीपरेमध्ये अष्टवने. श्रीपश्यतिं मधे त्रिवने. श्रीमध्यमे मधे चौदावने. नी श्रीवैखरीशी बारावने आहेत. व म्हणजे जय. म्हणून दे या अक्षरापुढे जर हा व आला की देव होतो. शब्दांची उत्पत्ती ही फार सुंदर गोष्ट आहे. आपल्या जे पुढे येते त्याचे अंतरंग जाणणे ही तर मुख्य कला आहे. आपल्या पुढे शब्द आला-अक्षर आले की त्याचे अंतःकरण त्वरेने जाणणे-विनाविलंब त्या अक्षरास आपणास काय सांगावयाचे आहे ते उमजणे. त्याची जाणिव होणे. नी आपण म्हणजे अनंतयोनींचे-अनंतमार्गांचे पांथस्थ-यात्रस्थ-वाटसरु-भुकेलेले-गांजलेले-गुंतलेले-बद्ध-मुमुक्षू-जड-मंद-आळशी-पीडलेले-

त्रस्त-व्यस्त-अशा निरनिराळ्या वैचित्र्यपूर्ण-वैविध्यपूर्ण ज्ञान-अज्ञान प्रदेशातून भागातून हिंडून आलेलो-हिंडणारे-अस्थिर-तमातून ज्योतिकडे याचे विस्मरण झालेले-याचे स्मरण नसलेले-मनन विसरलेले-याचेच करा सदा मनन कशापासोनी जग झाले..हेच विसरलेले-अशाश्वताचे पोषण करणारे-शाश्वतास विसरलेले-सदाचे व्यवहारी गुंतलेले-जवळचा ईश्वर न. ओळखणारे-आपला परका न कळणारे, अशा आपणांसमोर हे अक्षर-हा शब्द आला की त्याचे तत्काळ अंतरंग जाणणे म्हणिजे कला होय. अशी ही कला म्हणिजे १४ विद्या ६४ कलांमधीलच एक कला होय. आपण ज्यास कला-कौशल्य, हस्तकला, भरतकाम, विणकाम, मुर्तिकाम, चित्रकारी इत्यादींस कलाविभाग म्हणतो त्या किंवा तशा प्रकारीच्या या कला कदापिही समजू नयेत. अहो या श्रीगजानांच्या कला आहेत त्या का अशा असतील? त्या फार वेगळ्या आहेत. पण जीवास उमजतील अशाच आहेत. तेच तर सारे ज्ञान आपल्या ग्रं मधे आहे नां, जे श्री समर्थ आपणांस समजवून देत आहेत. उकलून सांगत आहेत.

**..श्रीगजाननांनी जीवास दिलेला ठेवा..**

श्रीगणेशांस भेटून जेव्हा जीव पुढील प्रवासास-म्हणजेच पृथ्वी प्रदक्षिणेस निघतो. म्हणिजेच गर्भात यावयास निघतो, तेव्हा श्रीगजानन जीवास दोन संख्या देतात. श्रीगणेशांची पृथ्वीप्रदक्षिणा, याचाही याबाबत वेगळा विचार-अभ्यास व्हावयास हवा. काही वेगळे हाताशी येईल आपुल्या. की त्यांची पृथ्वीप्रदक्षिणा म्हणिजे केवळ कथा नव्हे. तर त्यातून खूप काही अभ्यास दडला आहे. अभ्यास होणार आहे. बघा, जीवास अक्षरबल श्रीसरस्वतींनी दिले. नी संख्याबल श्रीगजाननांनी दिले. त्यातीलच एक म्हणजे . बिंदु. ज्यास आपण ० असे म्हणतो ते. नी दुसरे म्हणजे ८ ही संख्या होय. मग यात अष्टदिशा-अष्टविनायक-अष्टवसू-अष्टदिक्पाल-अष्टांग-अष्टभाव-अष्टांगुल-आठवी-अष्टमी-आठवा महिना याअर्थी-आठवा, स्मरा या अर्थी आठवा आठवा. जसे श्रीकृष्ण आठवा असे. आठ-आठ्या-आट्या. हा एक खेळपण आहे, नी तो ज्ञानयुक्त आहे. आट्या श्रीगणेशांनी दिल्या नी पाट्या श्रीसरस्वतींनी दिल्या. श्रीकृष्ण हा खेळ

आपल्या संवगड्यांबरोबर खेळायाचे. हा खेळ म्हणिजे एक वेगळाच ज्ञानाभ्यास आहे. आठ वर्ष-आठ वय-आठवणे-आठवले-आठवते-आठवा आठवा-श्रीकृष्ण आठवा. यांस आठवा या अर्थाने. आठवा-म्हणजे शोधा-जाणा या अर्थाने. ८ चैतन्यस्वरुप-८संख्यास्वरुप-८ डावी शुंड या अर्थाने. दंत-नासिका-नासाग्र-प्राणवहन-प्राणसदन-परिक्रमा-वरुन खाली खालून वर-आगम निगम-जन्म-मृत्यू या साऱ्याचा या आठ या बाबतीत शोध कारायला हवा. हे सारे जीवास याच आठव्या महिन्यात, श्रीगर्भात प्राप्त होत असते. आठव्या महिन्यातच श्रीचैतन्य-श्रीअंशरुप जीवामधे प्रवेश करते होते नी मातेच्या नाळेशी त्याचा संबध संपून तो वेगळा होतो. नी त्याचा संबध नवाशी येतो. तो त्या नवव्या द्वाराशी यायला निघतो. आजही हे घडते आहे. यच्चयावतत् जीवाबाबत हीच घडण-घटना चालू आहे पृथ्वीवर. यात कदापिही बदल होत नाहीत. होणार नाहीत. आपण जीवाचा उगम एकदम १२ व्या दिवशी घेतो, म्हणजेच साजरा करतो, ज्यास आपण बारसे संबोधतो. नी जीवाचे गंतव्य म्हणिजे जाणे, हे एकदम दहाव्या दिवशी धरतो. कारण तशी परंपरा आहे. त्यामागील अर्थ आपणांस ठाऊक नाहीत. म्हणिजे वास्तविक त्या जीवास श्रीगर्भातच जर सदन-द्वार-उंबरा-काना-कोपरा-कुळ-गोत्र-मातृस्थान-पितृस्थान-आडनाव-आप्तस्थान-विद्यास्थान-कर्मस्थान-दातृत्व-भोक्तृत्व-गंतव्य-भूमी-सव्य-वाम-इत्यादी सारे सारे प्राप्त झालेले असते, तर मग त्यास स्वतःचे नाव मात्र १२ व्या दिवशी का लाभते? बाराव्या दिवशी ठेविले जाते? १२ या संख्येशी काही सूत्र आहे का? काही धागा-दोरा? या साऱ्याचा विचार आपण हळुहळु करणार आहोतच. आता आठ-आपण ८ चा विचार करीत आहोत. तर ८ ही मुक्त संख्या आहे. यास अष्टमी म्हटल्यानंतर-संबोधल्या नंतर जो बोध होईल तो नित्यमुक्त ही संकल्पना उघडेल. तीचे ज्ञान देईल. कारण अष्टमीला घागरी फुंकतात. नवरात्रात ८ चे महत्व वेगळे, तर नव दिवसात आठचे महत्व वेगळे. श्रीगर्भातही या आठाचे महत्व वेगळेच आहे. जे आपण पाहीलेच आहे. म्हणून आपली घागर आपण फुंकू शकतो एवढी ज्यात ताकद, ती अष्टमी. पुन्हा येथे घागर फुंकणे म्हणिजे श्रीकुंभारांकडून

मडके आणून ते फु..फु करुन फुंकणे असे नव्हे. एवढेच नव्हे. तर आपल्यासारख्या पार्थिवांस दिलेला वन्ही, हा फुंकर मारुन चेतवावा. तो चेतविण्याचा किंवा त्यापर्यंत म्हणिजेच पार्थिवापर्यंत फुंकर पोहोचण्याचा-पाहोचविण्याचा जो दिवस तीच ही नवरात्रातील अष्टमी होय. अष्ट मी-श्रीगजाननांनी दिलेले हेच ते ८ होत. याच अष्टमीस म्हणिजेच श्रीशारदाष्टमीस श्रीश्रीकृष्णांनी वृंदावनात याच म्हणिजे पार्थिवाचा-मानवीराशींचा-याच नरउतरंडीचा-याच मानवीवृत्तींचा ऱ्हास केला. पार्थिवाचा ऱ्हास म्हणजेच, केवळ शुद्धचैतन्य भेटविले. मुळापर्यंत त्या श्रीजीवास नेले. त्याचे उत्पत्तीस्थान त्यास स्पर्शविले. नी शाश्वत काय ते दाखविले. आपण फार मर्यादीत अर्थांनी या साऱ्याकडे पाहतो, या साऱ्या लिला घेतो, म्हणून उच्च गोष्टींपासून आपण दूर राहतो नी आहोतही. पुन्हा आपण अज्ञानवश त्यास रासलिला असे संबोधतो. तो हा अज्ञानऱ्हास होय. अशाश्वतातून निघून शाश्वतापर्यंत पाहोचणे. जसे श्रीगजाननविजयामधील चौथ्या अध्यायातील प्रसंग असा आहे, श्रीगजाननमहाराज आपल्या एका भक्तास म्हणजे श्रीचंदु मुकींदांस सांगतात की, चंदु तुझ्या उतरंडीचा कान्हवला मला आणून दे. श्रीमुकीन चंदु घरी येतात. पत्नीस विचारतात, आपणाकडे कानव्हले आहेत काय? ती म्हणते, अक्षयतृतिया दिवशी मी कानव्हले केले होते. त्यास आता कितीतरी दिवस उलटून गेले. आता कानव्हले कोठून? परंतु जर श्रीमहाराजांनाच कानव्हले हवेत तर शिळे कशास मी ताजे करुन तळून देते नां. परंतु श्रीमुकीन म्हणतात की, ताजे नकोत, उतरंडीचाच कानव्हला श्रीं ना हवा आहे. श्रीमहाराजांना यातून आपणांस हेच सांगावयाचे आहे, की 'तो रस' प्राप्त होण्यासाठी तळातच उतरावयास हवे. नी सारी गोडी-सारे ज्ञान हे तळात आहे. तळातून आहे. श्रीसांगतात, तू ही अहंकाराची उतरंड उतरव नी ज्याकडे अद्यापी तुझे लक्षच गेलेले नाही. जो गोड घास तू अद्यापी चाखलाच नाही, तो गोड घास घे. बघ, मीच तूला अक्षयतृतीयेदिवसी हा कानव्हला दिला आहे. याची काही आठवण करुन बघ. बुरसा कधीच नसेल त्याला. तो कधीच नासणार नाही. सुकला असेल. कारण त्यास सिंचन करायचेच तू विसरलास. ही लिला आपण

केवळ श्रीमहाराजांना कानव्हला खावासा वाटला, एवढ्यापर्यंतच मर्यादीत अर्थाने घेतो. तेवढे नी तसेच वाचतोही. जसे तेवढ्याच, किंबहूना अधिक मर्यादीत-संकुचित अर्थाने आपण, श्रींना पिठल-भाकरी आवडते, हा एवढाच अर्थ अध्याय १६ तून घेतला तसे. अशा नी एवढ्या मर्यादित अर्थांनी या श्रीलिला घेउ नयेत. त्या पाठीमागे फार फार वेगळा नी जीवाच्या अनंतजन्मींच्या हिताचा अर्थ दडलेला आहे. खरेच जर श्रीग्रंथ आपण वाचित असू तर बघा, श्रीगजाननविजय ग्रंथात प्रथमोध्यायातच श्रींविषयी सांगितले आहे, ठेविलेल्या पात्रावरी । भोजना बैसली समर्थस्वारी। चवी न कशाची अंतरी । अणुमात्र उरली असे ।। अनुपम ब्रह्मरसाला । जो पिउनी तृप्त झाला । तो का मागतो गुळवण्याला । मिटक्या मारीत बैसेल।। आवड निवड साचार । उरली ना जवळ जयाच्या।। काय दर्शविते हे..? म्हणून अक्षर समोर आले की त्याचे अंतरंग कोणत्या नी किती प्रकारे आपण जाणून घ्यावे ते आता आपणांस विशषे उमगले असेल असे आपण म्हणूया. श्रीसमर्थ या अष्टमीचे वर्णन करताना सांगतात, वन्ही तो चेतवावारे..चेतविताचि चेतती. श्रीश्रीमहाराजांनी श्रीदासगणूमहाराजांना श्रीगजाननविजयात हा वन्हीचाच अध्याय आठवा घ्यावयास लावला. त्यावेळेस श्रीमहाराजांनी श्रीदासगणू महाराजांना या आठव्याचीही थोडीशी गूढ फोड सांगितलेली आहे. म्हणून जेव्हा श्रीदासगणू महाराजांनी, श्रीगजाननमहाराजांची आरती लिहिली, त्यात ही ओळ याच ८ बाबतीत आठवून-आवर्जून घातिली की, 'होऊ न देशी त्याची जाणिव तू कवणा'.. श्रीदासगणू महाराज आपले लक्षही तिकडेच वळवित आहेत, की श्रीगजाननमहाराज हे प्रत्यक्षात अवतरलेले श्रीगणेशच आहेत. कुणाला पटते कुणास नाही म्हणून श्रीसंत सांगायाचे थांबत नाहीत. ऐसी कळवळ्याची जाती करी लाभाविण प्रिती, हे जर जीवाला कळते, तर तो चैतन्याचा सोबती. नाहीतर पार्थिवाचा सांगाति. हे असे आठ म्हणिजेच श्रीचैतन्य-श्रीगजानन, जेव्हा दहादिवस, म्हणिजेच श्रीगणेशोत्सवात दहादिवस आपल्या सदनात येतात, तेव्हाच पार्थिवास चैतन्याचा अविष्कार होऊ द्या-करा-घडवा-भेटा-ठेवा-'ठेवा' ठेवा-गाठा-प्राप्त करुन घ्या, हे सांगण्याकरीता-

जागविण्याकरीताच येतात. श्रीटिळकांनीही याच ज्ञानज्योति अंतःकरणात जागाव्या-हाच स्व-वन्ही चेतून-चेतवून गुलामगिरी संपावी-एकोपा व्हावा, याकरीता या श्रीगणेशांस उत्सव स्वरुप दिले. त्याचेही आपण काय केले? तो आपला शोध. परंतु पार्थिव अधिक पार्थिव होउ नये, ही तळमळ साऱ्यांचीच. ती जीवासही लागली म्हणिजे तळी उचलली म्हणायची. तळातून उमगले म्हणावयाचे. काय आहे तळात?आठवा, समुद्रमंथन आठवा. श्रीमहालक्ष्मी-श्रीऐरावत-श्रीगजराज-श्रीहलाहल-श्रीवेदोनारायण-श्रीनिजवल्ली म्हणजे नवनीताचे-लोण्याचे इक्षु. इक्षु म्हणिजे गोडरस..गोरस. इक्षु म्हणिजे दंड. दंड म्हणिजे शक्ती. नी शक्ती म्हणिजे मध्य. जीवामधे ही शक्ती नसेल तर जीव पार्थिव-प्रेत-प्रेतवत होतो. म्हणून दुधाचा मध्य म्हणिजे नवनीत अशा अर्थानी हे घ्यावे. नी क्षुधा म्हणिजे रसाची गोडी. सर्व सुखाचे आगर..श्रीस्वामि चरणसेवेची गोडी, म्हणिजेच क्षुधा. क्षुधा म्हणिजे भूक या सामान्य अर्थाने कृपया ती घेउ नये. खूप मोठे मोठे-व्यापक-अर्थपूर्ण शब्द आपण फार सामान्यपद्धतीने वापरल्याने हा सारा गोंधळ होत आहे, असो. पण आता असे होउ द्यावयाचे नाही. होणारही नाही. कारण आता आपण हा सामान्यस्तर सोडून उंचावयाचे ठरविले आहे. तरच हे जे आपल्या हिताचे आहे ते कळून हित होईल. नाहीतर पुन्हा पितृपक्ष. १० दिवसानंतर १५ दिवस येणारा हा पितृपक्ष. ऐवढे चैतन्य भेटूनही नाहीतर ते आहेच. सारा अभ्यास व्हावा. **जो जो तळमळीने-हिताचे सांगतो आहे, ते ते तसे, त्याच पातळीवर-तशाच नी तेवढ्याच भावाने-भावनेने घेणे म्हणजे अभ्यास.** बुद्धीचा किती सामान्यस्तर असतो ते दर्शविणारे एक गंमतीशीर उदाहरण जर घ्यावयाचे झाले तर बघा-शालेय जीवनात आपण थोडी श्रीगुरुजींची गंमत करीत असतो. पुस्तकावरील चित्रासं विचित्र रंगवायाचे, कुठे लांब कान, लांब नाक काढावयाचे नी हसायाचे, अशी गंमत. चेष्टा वगैरे. खरेतर हे योग्य नाही. पण त्या वयात ती समज नसते. तसे घडू नये-घडू देऊ नये हे संस्कार. हे संस्कार म्हणिजेच वळण. नी वळण म्हणिजेच वहन. जे श्रीआईसाहेबांनी आपणांस दिले. त्यासच कुळं असे आपण संबोधतो. श्रीआईसाहेबांनी आपणांस कुठे

वळविले तर, श्रीगणेश-श्रीशारदा यांकडे. नी आपण कुठे वळलो, तर अहंकार-स्व-स्वार्थ-पार्थिव याकडे. म्हणून उचल तळी-उचला तळी-तळातून उचला. तळात एवढ्या गोष्टी आहेत. पण विसरु नका, आठवा. कुर्माच्या पृष्ठेवर-पाठीवर श्रीमेरु पर्वताची रवि करुन मंथन केले आहे, ती कथा नव्हे. तो रोजच्या जीवनात करावयाचा विचार आहे. आचरणात आणण्याची ती कला आहे. मुक्त-अलिप्त राहण्याचा तो बोध आहे. आपला ब्रं हे सारे जाणतो आहे. त्या जाणत्यापाशीच श्रीसमर्थ आपणांस नेत आहेत. पण 'मुळच' दुसऱ्या भाषेत रुजविलेल्यांना हे अमृत मिळणे नाही. ही प्राप्ती होणे नाही. यास उपाय नाही. बसायाचे अंधारात नी मागायाचे उजेडातले हे होणे नाही. हे कोणीही पुरविणार नाही. शिवपिंड आहे ही. नंदनवनीचे हे वृक्ष आहेत..अन्यठायी न येती. अन्य कशातच नाही. भाषेपासून देशापर्यंत कुठेही हा संदर्भ घेता येईल. १२ खडे-हे १२ खूप अभ्यासावे लागणार आहेत. त्यातील हे आठ-८ हे आठच केवढे विलक्षण आहेत बघा. तर लहानपणाचा तो शालेय जीवनातील संदर्भ बघा कसा, वास्तवात तो गंमत स्वरुपात आहे, आपण जरा तो अभ्यासरुप घेउ. तेव्हाही हा संदर्भ कसा आपल्याशीच संलग्न होता बघा, मास्तरांनी सांगितले १०. आम्ही ऐकले ८. पाटीवर लिहीले ६. मास्तरांच डोक पहा. गंमत-आठवली का? काय ऐकले? तर आठ ऐकले. श्रीमास्तरांनी सांगितले कीती?तर १०. बुद्धीचे वहन श्रीगणेशांना हवे तसे झाले नाही नां, म्हणून ऐकले तेच, तसेच हे, हेच नाही उमगले. म्हणूनच ऐकणे नी लिहीणे यात फरक झाला. इथे खऱ्या अर्थानी लिहीलेले कळले नाही नी जे ऐकले ते लिहीता आले नाही. किती दूर गेलो आपणच आपल्यापासून बघा. यातील आम्ही ऐकले आठ, हे काय आहे? कशाचे सूत्र आपण ऐकले नी तेच आता आठवत-८वत नाही?गंमत सोडून द्या, पण तेव्हाचे आठ, आपल्या पाटीवरचे



शालेय जीवनातील एक गंमत

सहा, हे काय आहे हे पाहणे महत्वाचे ठरणार आहे. फक्त दिल्या मार्गावरुन वहन न झाल्याने ही गंमत झाली सारी. साऱ्या आयुष्याचाच एक खेळ झाला. कळला नाही. म्हणिजे ऐकणे नी लिहिणे हे वेगवेगळे झाले म्हणून ही गंमत झाली. नी हे असे सारे ऐकूनही सहाच लिहिल्यामुळे, नी ते १-२-३-४ निघून गेल्यामुळे आता त्या चतुर्थीशी संकष्ट निवारा म्हणून बसावे लागते नां. नी या अशा नेमक्या सहाच्या वेळेलाच भान जागेवर आल्यामुळे हे सहा-षडरिपू आमचे आम्हीच मिळविले. नी आता बसलो आहोत बोल लावीत ऐकमेका. जो मिळाला-लाभला-नातेसंबधी झाला, त्याशी हे षडरिपू जुळू देत नाहीत. कोणी कुणाकडे ओढावले जाते, तेथेही पुढे मन लागू देत नाहीत. नैराश्य येते. दहा-दशइंद्रिये हे सर्वार्थाने बेचैनच राहतात. पुढे एकएक इंद्रिय आम्ही कसा चकवा दिला ते सांगत राहतात. त्यास वृद्धपण म्हणायाचे. कारण आपण मूळंच खुडून, दोन्ही अर्थानी घ्यायचे हे मूळ. ते मूळंच खुडून टाकल्यामुळे न ० कळले न . बिंदू कळला. न १ कळला न ८ न ९. सारे १० फिस्कटले. बसा बारस ते बाराव करीत. अरे, पूर्वजन्मी जे करावे ते या जन्मी भोगावे नी ते भोगण्यासाठी यावे जन्मा, हा सिद्धांत असे, असे श्रीमहाराज आपणांस सांगत आहेत. पुन्हा श्री सांगतात, या जन्मी जे करावे ते पुढच्या जन्मास उरवावे, असे कीती सांग घ्यावे फेरे जन्म मृत्यूचे..आपल्याला जे ठावकी नाही तेच कोणी आपणांस सांगतो आहे तर किती मनापासून ते ऐकावयास हवे. पण मन लागत नाही, ही कायमची तक्रार आहे आपली. परंतु बघा-हे न लागणारं आपल मन टि.व्ही. समोरुन हलत नाही. हेच मन सिनेमा चवीने बघते. निंदा-मत्सर चवीने ऐकते, करतेही. काय म्हणायाचे या साऱ्यास? मग हेच मन अध्यात्मात-सद्श्रवणात-अभ्यासातच का लागत नाही? वहन चुकले-वळण-चुकले. बाळलेणी-बाळकडू उमगलेच नाही. मना त्वांचि रे पूर्वसंचित केले..तयासारीखे भोगणे प्राप्त झाले.

बालपणीच परा-पश्यंति-ते चौदा विद्या-चौसष्ट कला प्राप्त व्हाव्यात. केवढा आरंभ सुंदर. आरंभच केवढा सुंदर. किती अलभ्य. कीती दुर्लभ. पण विसरलो सगळे. आपला अपराध म्हणून-दुर्बलता म्हणून,

विसरलो आपण, जे विसरावयाला नको तेच विसरलो. नी आता आठवले पाहिजे-८ वले पाहिजे-८ आठवले पाहिजे. पुन्हा एक एक असे ते विनायक आहेत. अष्टविनायक. आपले जयरुप असे ते. आपला श्रीगणेशा असे ते श्रीरुप आठवले पाहिजे. म्हणिजे विजयकारक श्रीरुप. विजयाचा कारक. नी विजय हा आयुधाने-शस्त्रात्राने मिळविलेला नाही. कुणावर कुरघोडी करुन-खोटे-नाटे आरोप करुन मिळविलेला नाही. या अशा मार्गाने जाणे म्हणजे स्पर्धा होत. तशा कुठल्याच मार्गाचा हा विजय नाही. तर हा विजय ज्ञानाने मिळविलेला. ज्ञानमार्गाचा विजय. श्रीभगवंताचे दोन पार्षद-सेवेकरी-द्वारपाल असे ते जय-विजयरुप. इथे पुन्हा आपल्या सामान्यस्तरावर यातील अर्थ न घेता हा अभ्यासपूर्ण अर्थ घ्यावयाचा आहे. कारण पुष्कळ मंदिरांवर हे श्रीजय-विजय कसेही दाखविलेले असतात. कसेही म्हणजे त्यांच्या पायाची दुमड वगैरे कशीही ठेविलेली असते. तर हा आपला विजय असा आहे, ज्ञानमार्गातला. **बिंदुरुप समजून घेतल्यानंतर आठवलेला.** '८ वेला'. याचा प्रत्यंतर नदीच्या उगमाशी आपणांस येतो. नदी ही उगमाशी याच बिंदुरुपात असते. पुढे ती सिंधुरुपापर्यंत वहन करते. तेच वहन आपणही आपले तसेच ठेवले, तर आपणही बिंदु ते सिंधु-अणु ते ब्रह्मांड-जीव ते शिव असे सहज पाहोचु-होउ. किती सोपे. पण मधेच सगळा गोंधळ झाला नी मूळ विसरले. मुळच विस्मरणात गेले. आता समरणाशी हा ग्रं जोडला तर ग्रंथी उकलेल. नी मग सारे ज्ञानभांडारच खुले होईल. कपाट उघडेल. योगामधील 'का की' मुख उघडेल. नी खरे कुहूकुहू कुजन ऐकता येईल. वसंत येईल. नी वसंत म्हणिजे चैत्र. नी चैत्र म्हणिजे श्रीरामराय. श्रीस्वामीराम. पुढील सारे मग मत्सखा कुजन. कूजन्तं राम रामेति..मधुरं मधुराक्षरं..आरुह्य कविता शाखा..वंदे वाल्मिकी कोकीलं.., कुठूनही या, कसेही या. कुठेही जा, कुठुनही जा, ठकारे पर्वता ऐसा..नेटका सडपातळू.., असे जे श्रीहनुमंत जयांचे दास ते श्रीस्वामीराम आहेतच. अशावळणाचे खरेतर आपले पाणी आहे. आपली वाणि आहे नी लोणी ही आहे.

पण ते कुठेतरी साचले-खराब झाले. खराब झाल्यामुळेच तर

आपणांस त्रास होत आहे नं. साचल्यामुळेच तर प्रगतीस खीळ बसते नां. जाणिले पाहीजे. सतत निर्मळाचा ध्यास-निर्मळाची सोबत धरीली पाहिजे. ठेवीली पाहीजे. राखिली पाहीजे. अरे भगवंताच्या प्रितीपात्रा..जरा थांबून विचार कर नां..जिथे तू तिथे तो हे तर आहेच, पण जिथे तो तिथे तू..हे अजून घडायाचे आहे. घडव रे घडव, असे स्वरुप घडव. घडव घडव रे सोनारा..माणिकमोत्यांच्या बिलवरा..बिलवराला दोन खिडक्या..आम्ही दोघी बहिणी लाडक्या..फु..बाई..फु..फुगडी फु..फु..फु..चेतवा-घडवा-उघडा त्या खिडक्या. जाणिवेच्या-ज्ञानाच्या-प्रेमाच्या-अनंतजन्मींच्या त्या बंद खिडक्या उघडा. नी बघा काय बिलवर साज प्राप्त होतो ते. हे नुसते खेळगाणे नाही तर फार मोठया अर्थ-जाणिव-धर्म-वर्म-कर्म-मुक्त-परिपूर्णतेच्या, या जागा आहेत. यात सोने आपणच. नी सोने म्हणजेच चैतन्य. वन्ही चेतवा, फुंकर घाला. फु..फु म्हणून श्रीगणेशांनी तो पिंड घडविला. त्या बी वर-बीजावर-बिलवरावर साज चढविला. जाणा-उठा, गाढ निद्रेतून उठा. नी जाग येताच आपणांस जर ते परमज्ञान लाभणार आहे तर मग किती लवकर आपण ही गाढ निद्रा त्यागिली पाहिजे बरे.

**..परावाणितील अष्टवने..**

श्रीसरस्वती मातांनी जे बाळलेणे दिले, परा-पश्यंति-मध्यमा-वैखरी असे. त्यामधील परावाणितील अष्टवने म्हणिजेच आठजागा ज्या आपल्या ज्ञानाची वने-उपवने आहेत ती ही अष्टवने कशी ते बघूया-परावाणिचा आकार हा गज शुंडेसारखा असतो. नी इथूनच आपण जो ग्रं समजून घेण्याकरीता धडपडतो आहोत, ते हे सूत्र सुरु होते. मूळात बिंदुरुपातील-तरंगिणी स्वरुपातील या स्थानी आपले सारे जन्म-त्यातील ज्ञान-आपण केलेले कार्यकर्तृत्व-आपण भोगून फेडलेली कर्मे-उरलेले संचित-हाती असलेले प्रारब्ध-नासवावयाचे म्हणिजे संपवावयाचे क्रियमाण-अनंतजन्मांच्या अनंतजन्मातील आठवणी-साठवणी-घडलेल्या भेटी-दिलेली वचने, सर्व. शून्यापासून ३ पर्यंतचे ज्ञान-जसे प्रतिपदा-द्वितीया-तृतीया-चतुर्थी येथपासून पुढे पंच मी-षष्ठ मी-सप्त मी-अष्ट मी-नव मी-दश मी, कोठपर्यंत मी? तर दश शमे पर्यंत. दहाही शांत होईपर्यंत ही

मी मी. पुढे नाही. ११-१२ एकादशी-द्वादशी येथे मी मी नाही. येथे कळते-उमगते मी कोणीच नाही म्हणून. मी काहीच नाही तयांपुढे म्हणून. त्यापरमशक्तीपुढे-त्या श्रीस्वामिरामांपुढे हेच ज्ञान. सान्या ग्रं ग्रंथी ग उत्पत्ती . बिंदुप्राप्ती. नी र चे बी मिळून ग्रं स्वरुपग्रहण करण्याचे-ग्रहण संपविण्याचे-आपण मधे न येण्याचे, श्रद्धा-भक्ती-ऐश्वर्य-यश-किर्ती-प्रताप ही सारी दालने एवंच सारे जे ब्रह्मांडीही कदाचित नसेल ते सारे या परेत दडलेले-भरलेले-ओतप्रोत असे आहे. येथे शंकास्वरुप या अर्थाने हा कदाचित शब्द वापरलेला नाही, तर खचितच हे ब्रह्मांडीही नसेल अशा अर्थाने तो योजिला आहे. असे श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. येथेच या बिंदुसच श्रीश्रीकृष्णांनी आज्ञापिले की उत्तिष्ठ-जाग्रत..उठ..जागा हो, नी प्राप्तकर्म कर्तव्यरत हो. ज्या त्या वेळची ही घंटा व हा नाद जो परेमधून सतत वहन करीत असतो. हे वहन-हा नाद-ही स्पंदने सतत सुरु असतात. यासच आपण संभाषण चालू ठेविताना अथवा काही विसरलेले आठवितांना अं..हं असा जीभ व ओठ न उघडता न हलविता उच्चारतो. असा हा नाद वहन करणारी ही अक्षरे होत. अशी ही अष्टवनांची द्विमुखी, द्विमुखी म्हणिजे अं हे एक मुख नी हं हे दुसरे मुख, अशी ही द्विमुखी होय. ८ गुणिले २ = १६. म्हणिजेच अष्टवने गुणिले अं हं=सोळा कला होत. अशा १६ कलांनी, १६ संस्कारांनी युक्त ही वाणि. कोणती कशी ते पाहूया-**प्रथमरुप . बिंदु.** परावाणितील अष्टवनात हे बिंदु स्वरुप कुठे असते ते पुढील पानावर दाखविलेले आहे. या बिंदुचे नदी-सरोवरे ते जन्म-विचार यापर्यंत वहन आहे. कण-रज-अणु-रेणु-तुषार असे या बिंदुचे वहन आहे. या बिंदुचे पुढचे रुप-पुढची पायरी म्हणिजे थेंब. थेंबाच्या पुढची पायरी म्हणिजेच अवस्था मुख. त्यापुढची ओघ. त्यापुढची आहोळ. त्यापुढची निर्झर. त्यापुढची वहन. त्यापुढची खळाळ. त्यापुढची लाटा. त्यापुढची धो धो. त्यापुढची धबधबा. शिवस्तराचे वर्णन करतांना श्रींनी याचेच, धबाबा तोय आदळे.. असे वर्णन केले आहे. या प्रत्येक गोष्टीचा स्पर्श वेगळा. ज्ञान वेगळे. जाण वेगळी नी बोधही वेगळा. प्रथम बिंदुरुप-बीज म्हणूया ते आहेच आहे. रुजविणारा दुसराच आहे. बी तयार करणाराही दुसराच.

यामधे सारेच अनंतजन्मांचे नर ते नारायण ज्ञान अनुस्यूत आहे. परंतु वहन चुकले-मार्ग चुकला तर फेरे ठरलेले. म्हणजे स्मरेपर्यंत-आठवेपर्यंत परत परत, पुनरपि जननं पुनरपि मरणं..पुनरपि जननी जठरे शयनं. पुनरावृत्ती, नाहीतर निवृत्ती. निवृत्ती-ज्ञानदेव-सोपान-मुक्ताबाई श्रीविठ्ठल नी रखुमाबाई. कीती शांत नी सुंदर मार्ग आहे हा सारा. ते शिव ते कल्याण चुकु नये म्हणून तर श्रीपांडुरंगांनी देखील हे शिवलिंग मस्तकावर धरीले आहे. एवढे ते महत्वाचे आहे. असा हा बिंदु-मध्यस्थान-पदक-भूषणस्थान-गौरविण्याची जागा-वक्षमध्य-श्रीरामजानकीसहित जेथे विराजमान आहेत ते श्रीहनुमंतहृदयस्थान-बलभीम स्थान-अचाट-अफाट-भीमकाय-पर्वतप्राय-महारुद्र-प्रतापि-आगळा सर्व गुणे-असे अतुलीत बलधाम स्थान, म्हणिजे वक्ष-छाती. धाडस-निर्भयता-अभय-अयोध्य-अलंकारस्थान. बिंदुरुप परावाणिचे थेट तेथे लक्ष असते. कंठी कौस्तुभ मणि विराजित, असे ते मध्यबिंदुस्थान. इवलेसे रोप लावियेले द्वारी असे ते द्वारस्थान-हृदयस्थान. येथूनच वेलु हा गगनावेरी जाईल..जाणार..जाणारा होईल. या बिंदु प्रगटीकरणात ग्रहमंडलस्थाने-तालिका म्हणिजे काळाची पावले ओळखणारी वेळा-तासिका-नासिका-कारीका काहीच नसते. जीवाचा हा बिंदु मुक्त असतो. जीवनमुक्त. इथेच श्रीगजानन महाराज आपले लक्ष वेधितांना सांगतात, जन्मे न कोणी मरे न कोणी. पण अज्ञानवश हे ज्ञान जीवास होत नाही. जीवाचा यावर विश्वासच बसत नाही. म्हणूनच श्रीसमर्थ एका वेगळ्या अर्थाने यास जुने ठेवणे असे म्हणतात. सातवे दालन जे आपण कथांमधून ऐकतो-वाचतो ते हेच सातवे दालन होय. जीवास म्हणिजेच बिंदुस झेलणारे. झोळणा-झोळी-पाळणा-जु जु रे बाळा, असे जोजवणे याचाच अभ्यास खरेतर व्हावयास हवा. तान्हुल्यास झोळी करणे, त्यात निजविणे हा एक संस्कार आहे. झोळी



बालकाचे झोळीतील पालन-जोजविणे

कशी आहे ते चित्रात पाहीलेच आपण. म्हणजे परावाणित काय काय दडलेले आहे ते ते सारे शोधावे लागणार आहे. तळी उचलायची ती ही. ही नीट नाही उचलली तर खंडोबा. नुसते कुळधर्म पाळून समाधान कदाचित होईलही पण त्यापाठी असणारे ज्ञान घेण्याने पूर्ण शांत नी मुक्त, नित्यमुक्त आपण राहू. नित्यमुक्तास, आकाश-आकाशपंथ-आकाशमार्ग आहे. श्रीकपिवर-श्रीसमर्थ-श्रीमहाराज या आकाशपंथाचेच वारकरी आहेत.




जीवाच्या परावाणितच हे साध्य आहेत-या साधनाही आहेत. या धारणा आहेत. जपमाळ, कंठी धारण करावयाची माळ-माला ही जी पद्धत आहे ती या पराचनेवरुनच आहे. तीच या मालासूत्राची रचनाकार आहे. या ग्रं सूत्राचीही रचनाकार आहेच. तुळशी हार गळा..याचा अभ्यासही महत्वाचा आहेच.

### ..स्वसंवेद्य-पराशक्तीतील एक वन..

स्वसंवेद्या-पराशक्तीतील अष्टवनातील एक वन. श्रीसमर्थ आपल्या श्रीमन्मनाच्या श्लोकात या वनांविषयी निर्देश कसा करीतात बघा-मना रे जनी मौन्य मुद्रा धरावी । कथा आदरे राघवाचि करावी । नसे

राम ते धाम सोडोनी द्यावे । सुखालागि आरण्य सेवित जावे ।। हे आरण्य म्हणिजेच ही वने होत. फार सूक्ष्म आहे श्रींचे शास्त्र. वैखरीच्या पुढच्या गुप्त-प्रगटशक्ती आहेत ही वनं. पूर्ण ज्ञानातून होणारी स्वत्वाची जाणिव. दीपकी दीपक मावळल्या ज्योति..घरभरी वाति शून्य झाल्या. श्रीमाऊलींनी याच स्थानास आपल्या श्रीभावार्थदीपिका म्हणिजेच श्रीज्ञानेश्वरीमधे जयजयाजि स्वसंवेद्या आत्मरुपा, असे संबोधिले आहे. तिच ही शक्ती होय. या साऱ्या १६ ही शक्तीरुपिणी आहेत. जसे गुळ खाल्ला. तो गोड आहे हे सांगताही आले. परंतु गोड म्हणिजे कसे, हे सांगता येणार नाही. तुम्ही खाऊन बघा, असे म्हणावेच लागेल. तसे हे केवळ नुसत्या वर्णनाने रुचि कळणे अवघड आहे. प्रत्यक्ष तो खाल्लयाने जे कळेल तेच खरे. गुळ खाऊनच पाहावे लागेल तसे. असे ते स्वतःचे स्वतःनेच घेतिल्यावर कळणारे स्वसंवेद्य ज्ञान होय. आत्म्याने परमात्म्याचा अनुभव घेणे म्हणिजेच स्वसंवेद्य. ज्याचे त्यास-जेथिल्या तेथे. श्रीसमर्थ सांगतात, साधक भावे नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली । सुगमपंथे नेऊनी घाली। जेथिल्या तेथे ।। ते हे स्थान होय. हीच जीवाची शक्ती. आद्यास्वरुप-प्रारंभ स्वरुप आहे. ॐ नमोजी आद्या वेदप्रतिपाद्या. अशी ही शक्ती जीवास ते भाग्य-ते ऐश्वर्य प्रदान करते, की जे प्राप्त झाल्यावर निवृत्तीस्थानच हवेहवेसे वाटते. पण आपल्या बाबतीत मात्र, सूर्य उगवला प्रकाश पडला आडवा डोंगर..अशी अवस्था होते. सारे कळते पण वळत नाही अशी अवस्था. अशा या शक्तीपर्यंत पोहोचणे भल्याभल्यांना अशक्य आहे. वास्तवात ही शक्ती आपलीच आपल्यातच आपल्यासाठीच आहे. पण अंतरावरच राहते. दूरच राहते. इयेचा लाभ करुन घेता येत नाही. तेच ते मुळबीज-१- सुरवात-आरंभ. श्रीसमर्थ सांगतात, लवे नेत्रपाति। स्फुरे आजि बाहो। दीनानाथ तो राम येणार आहे ।। सकळांचा ध्येयविषय असा तो कमलनयन सुलोचन-दयाळ श्रीराम येणार असल्याचे श्रीसमर्थ पाहू शकतात. तेच श्रीसमर्थ आपणांस ही फोड करुन सांगू शकतात. त्यांमुळे या गुह्य-गौप्य ज्ञानास आपण सम्मुखे होत आहोत. वाचित आहोत. परावाणितील सर्व कला या गुप्तरुपिणी आहेत. त्या पश्यंतितही त्रिविधा-त्रिपथगा-त्रिवेधी-

त्रिपदा-त्रिपथा-त्रिवेणी-त्रिपदगा-मैत्रेय, या साऱ्याशक्ती त्रिविधा या पद्धतीने म्हणिजेच वेणितील एक पेड गुप्त असतो तशा पद्धतीने, गुप्तच असतात. मध्यमेत त्यांचे थोडे स्फुटीकरण होते. परेतील अगदी थोडे म्हणिजे फारच अगदी अंशस्वरुपच वैखरी पर्यंत येते. **जशी परा तशी वरा आली, तर श्रीमहाराज सांगतात, ही शक्तीच जीवास सधन करते.** करु शकते. ओठी एक पोटी एक अशी ही विषयवल्ली मग पूर्ण अमृतकुंभच नासविते. म्हणून ही स्वसंवेद्य शक्ती, याप्रत पाहोचणे हे एक चक्रव्यूह भेदनच म्हणावे-जाणावे-समजावे. नी त्या तयारीस जीवाने लागावे. तीळ-गुळ-शेंगदाणे-पडवळ-हरबरा-काळे फुटाणे-गोरस हे पदार्थ, यांचे बनविलेले पदार्थ या शक्तीस जागविण्यास मदत करतात. पण हेही खरेतर फार मर्यादीत अर्थाने आपण घेत आहोत. नी अशा मुळापर्यंत न पाहोचताच वरवर काढलेल्या अनुमानांमुळे मग इतक्या सुंदर स्थांनापासून दूर राहून वियोग दुःख भोगीत राहतो. १ ही सुरवात नाही. एकापासून प्रारंभ नाही. हे आता विज्ञानानेही मान्य केले आहे. १ पासून प्रारंभ नाही. त्यापूर्वीचीही काही अवस्था आहे. आताच्या भाषेत त्यास डॉट असे म्हणतात, याने लवकर कळेल. अशी ही बिंदुरुप . अवस्था आहे. खरेतर श्रीसमर्थ सांगतात . या बिंदुरुपापूर्वीचीही अवस्था आहेच आहे. हे तर . बीजस्वरुप. यात जे जे भरलेले आहे त्याचा विस्तार आपण पाहत आहोतच. तो समजून घेणे सुद्धा एका जीवास एका जन्मी कठीण वाटेल. परंतु श्रीसमर्थांचे अधिष्ठान ठेवीले-पुजिले-तयांपायी अनन्यशरण झाले तर, तर नुपेक्षी कदा राम दासाभिमानी. सदा चक्रवाकासी मार्तंड जैसा । उडी घालीतो संकटी स्वामी तैसा । हरी भक्तीचा घोष गाजे निशाणी । नुपेक्षी कदा राम दासाभिमानी।। आपले बीजच दासरुपाचे. तत्पूर्वीच श्रीस्वामी स्वरुप. एवढेच जाणावयाचे आहे. स्वसंवेदायाचे आहे. स्वसंवेद्य हा ते परमज्ञान आत्मसात करुन घेण्याचा एक पथ आहे. मग त्यास श्रीईश्वर-श्रीपरमेश्वर-श्रीचैतन्यशक्ती काहीही संबोधा, ते आहेच. कुणाच्या संबोधण्याने-स्वीकारण्याने अथवा नाकारण्याने तेथे-त्या स्थानी-त्या स्थली काहीच फरक होत नाही. ते आहेच. आपण जन्मलो तेवढ्यापुरतीच आपली बडबड. तुटपुंज्या भांडवलावर

आपली सारी बोली. जी मृत्यूच्या दारात आटोपते घेते अशी. इथे? वसे मेरु मांदार हे सृष्टीलिळा । शशि सूर्य तारांगणे मेघमाळा । चिरंजीव केले जगी दास दोन्ही ।। स्वामी चिरंजीव नी सेवकही चिरंजीव. एवढे सामर्थ्य लाभूनही दास, जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा. स्तव-वेध-स्वसंवेद्य फार सुंदर सूत्र आहे हे. परंतु आता भाषेचे-संस्कारांचे मुळ-कुळच बदलल्याने त वरुन तपेले ही भाषाच बंद झाली. आता चक्रवाक म्हणिजे काय? येथपासून सुरवात करावी लागणार आहे. बरे तपेले आता दाखविण्यापुरतेही उरलेले नाही. नुसता त घेऊन करता काय. तवा सुद्धा आता निर्लेप लागतो. लोखंडी तवा-खापर संपले. आटोपले. पण जेव्हा आरोग्याच्या-बल-बुद्धीच्या निकषावर आपल्या सुधारणा घासल्या जातील, त्याचा कस-कसोटी लागेल तेव्हा सर्व गोष्टी फेकून द्याव्या लागतील. रोगास निमंत्रण-जीवास दगा-बुद्धी-आरोग्यावर आघात या अशा सर्व धोक्यांमुळे या सुधारणा, या सुधारणा नसून हा जीवास भक्षिणारा राक्षसच म्हणावयास हवा. जीवास गिळावयास आलेला राक्षसच. हे उमजेल, पण उशीर होऊ नये, हातचे जाऊ नये, फीर..फीर..फीरुन परत याच अध्यात्म मार्गानेच यावयाचे आहे, अन्य मार्गच नाही हो, म्हणून श्रीसमर्थ सांगत आहेत, विशाळ व्याळ व्यस्तकी । नदी खळाळ मस्तकी। ऋषि भविष्यकारणा। श्रीरामराम हे म्हणा ।। जे करणे ते वेळेवर । अरे, वेळ गेल्यावरी । नाही उपयोग साधनांचा ।। आपल्या पूर्वजांच्या सांगण्यानुसार तहान लागल्यावर विहीर खणणे, हे शिकून सवरुन मुर्खपणाचेच लक्षण नव्हे का? नी मग हा असा मुळारंभ, आरंभाकडून तोडून, उखडून दुसऱ्या प्रांति, जो नाहीचि आपुला असल्या अपिक ठिकाणी लावला गेला तर, रुजणे-बहरणे-मोहरणे-फुलणे-फळणे कदापि शक्य नाही. केवळ पैसा नी चकचकीत आयुष्ये म्हणिजे सार्थक नव्हे. संकटांनी-समस्यांनी-व्याधिंनी-साधे डोके दुखले तरी आपले आपणास बरे होता येत नाही, तर पुढची गोष्टच सोडून द्यावयाची. स चीच ओळख नाही. स्व ची तर अवघडच. स म्हणिजे भूमी-बीज-पृथा, नी व म्हणिजे विजय. आपण हे सूत्र पाहिलेलेच आहे. नी हे सारे ज्ञान स्वसंवेद्य असे आहे. ज्याचे त्याने घ्यावे असे. अशी ही स्वसंवेदता

श्रीसमर्थांना ग्रं या आपल्या ग्रंथारंभापूर्वीच-कार्यारंभापूर्वीच आपल्या जाणिव कक्षात घावयाची आहे. एखादया अक्षराचा केवढा विस्तार असू शकतो, तेच आपण पाहत आहोत. हे सारेच श्रीसमर्थांना सांगावयाचे आहे. त्यांचाच आपणांस हा सांगावा आहे. एवढे अक्षर अर्थाच्या-भावनेच्या-ज्ञान-विवेकाच्या-प्रेम-वैराग्याच्या जवळ दुसरे कोण आपणांस नेऊ शकेल? श्रीसमर्थ-श्रीसमर्थ नी श्रीसमर्थच फक्त. मला युक्ती ना बुद्धी काहीच नाही। पतितांसी रे आणि हाती धरावे। समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे ।। असेच म्हणावे नी श्रीसद्‌गुरुंच्या ऋणातच रहावे. यातच सारे सार, सारे रहस्य, सारा आनंद सामावलेला आहे. एका अक्षरातून जर एवढा धबाबा तर समग्र श्रीमद्‌श्रीग्रंथराजातून किती..? पियुषांची अर्णविच्या अर्णवे हो. देता किती घेशील..अशी अवस्था होणार जीवाची. नी आपणही मुळापर्यंत पाहोचलेच पाहिजे. वरवरचे ज्ञान खरी शांतता-खरे समाधान देऊच शकत नाही. कणासही मन आहे. हेच तर श्रीमहाराजांनी आपणांस श्रीगजाननविजयाच्या प्रथमोध्यायात दाखवून दिले आहे. ते शिताशीही संवादीत होते. नी ते शितही त्यांशी संवादीत होते. एखाद्या धान्यामधे अग्नि नी शितलता, उष्ण नी थंड या दोन्ही गोष्टी जेथून भरल्या जातात, ती दृष्टी तर श्रीमहाराजांची दृष्टी आहे. वास्तवात या दोन्ही विरुद्ध टोकाच्या गोष्टी. परंतु गुणधर्माने त्या सम आहेत. सारख्या आहेत. एकमेकांस पूरक आहेत. थोडेही अधिक उणे नाही. कमी जास्त नाही. अग्नीने पदार्थ पूर्ण पक्व केला नाही, तर कच्चा, असे आपण संबोधतो. तो पूर्ण पक्व असेल तर ते पक्व अन्न खाऊन आपण तृप्त होतो. शीतल होतो. हे झाले अन्नाबाबत. सर्वच ठीकाणी हे समीकरण समच आहे. अग्नी, मूळरुपात अत्यत शांत नी शीतल आहे. जयास ही समानता कळली. तफावत-भेद-अभेद विरले. समता अभंग झाली. ही अखंडता ज्यास कळली, त्यास स्वसंवेद्यता उमगली म्हणावयाची.

**..ध्येयाची निश्चिती वेधाशक्ती..**

आता दुसरी शक्ती वेधा-द्वितीया-द्वितीयस्थान-द्विभाजन अशी. वेधा म्हणजे वेध लागणे. जसे आपणांस ग्रहणकाली वेध लागतात, एवढे कानावरुन गेलेले आहे. परंतु हे वेध, अनंतजन्मांपासून अनंतजन्मांपर्यंत

लागलेले असतात. जीवास याची उमज नाही. वेध म्हणिजे जीवाचे जे निश्चित ध्येय आहे, त्या ध्येय गाठण्यापर्यंतची जीव नी ध्येय यांना सांधणारी रेषा-रेघा-रेखा-चिन्ह-संकेत-उर्ध्वगामिनी-उर्ध्वा-तंतु होय. ही अस्पष्ट अशी, साध्या डोळ्यांनी न दिसणारी पण असणारी अशी रेषा असा तंतू आहे. इयेसच आयुष्याची दोरी असे आपण संबोधतो. दिसत नाही परंतु एक टोक आत्म्याकडे नी एक टोक परमात्म्याकडे अशी ही असते. तीस बळकटी येण्याकरीता देण्याकरीता हीची उकल होण्याकरीताच निरंजन-दिवा-वात हे सूत्र आले. धागा या पद्धतीच्या ज्या ज्या उपासना म्हणिजे, वटपौर्णिमा-अनंताचेव्रत-लग्न मुहुर्ती हळद बांधणे-सोडणे-मौंजीबंधन-मंगलसूत्र-गर्भाधान-बीजोद्भव म्हणजे गर्भ राहणे-जानवे-मुंडावळ्या-तोरण-अलंकार-सर्व प्रकारच्या वेण्या-गजरे-फुले-कर्णकुंडले-पैंजणे-नाती-सर्व ऋणानुबंध-आप्त इष्ट संबंध-समज-जाणिव-हृदय-बुद्धी-जन्म-मृत्यू-जीव-शिव-बाल्य-वार्धक्य-कौमार्य-तारुण्य-व्याधिग्रस्त-व्याधिमुक्त-बद्ध-मुमुक्षु-सिद्ध-साधक-ज्ञान-अज्ञान-पति-पत्नी-पिता-पुत्र-माता पुत्र-पिता कन्या-माता कन्या-पुत्र-पौत्र-प्रपौत्र आदी ही सारी सूत्रे इजवर असतात. जसे मुलगा जन्मला नी त्याच्या मानेमागे केसांचा वेणी सारखा भाग आला की पुढे पोटी कन्या जन्मास येणार हे सूत्र समजले जाते. किंवा मुलगी जन्मास आली नी तिच्या मस्कावर जर भोवरा आला तर पुढे पोटी पुत्र जन्मास येणार ही सुत्री असते यासच वेध असे संबोधन आहे. अगदी तसेच हे वेधशास्त्र आहे. आता या संदर्भाचेही सध्या विस्मरण झाल्यामुळे खूपच बारकाव्याने सारे समजून घ्यावे लागेल. म्हणिजे पाठीवर कोण येणार हा वेधाचा भाग आहे तसेच, मुळावर येणे इत्यादी सारी सुत्रेही अशीच या वेधा शक्तीवर अवलंबून आहेत. एवढेच नव्हे तर जीवाचे कर्मसूत्र-त्याचे भाग्य-भाग्यकाल-एखाद्या गोष्टीची वेला-जसे विवाहबंधन आदी. घात-अपघात तसेच ताटी उघडा-ताटी बांधा नी त्यानंतरचीही सारी सुत्रे इजवरच आहेत. सारेच साऱ्याचेच वेध असतात. वेध म्हणिजे ती गोष्ट होण्यापूर्वीची अवस्था. जसे कौमार्याचे वेध म्हणिजे बाल्य. सौभाग्याचे वेध म्हणिजे कौमार्यप्राप्ती-गर्भादान. म्हणूनच

हे सोळा संस्कार यातूनच फुटले-पुढे आले. आता या संस्कारांपैकी काही उरले आहेत, काही नाही. तसे आपणांस आश्चर्य वाटेल पण जीवाचे अंनतजन्मकर्मांचे सारे मिळून १३ कोटी संस्कार आहेत. त्यातील काही प्रगट-काही अप्रगट अशा अवस्थेत असतात. त्यातील सोळा. नी त्यातील ही काही न उरलेले असे आता आहे. नी आता तर पूर्ण संस्कृतिवरच घाला पडत चालल्यामुळे हे सारे आपलेच, मुळचेच कळणे-लाभणे दूर गेले. अवघड झाले. कठीण त्यावरी कठीणचि झाले, अशी अवस्था. या वेधासच दोरी तुटणे-बळकट असणे-आपण कळसूत्री असणे. दोरीस ताण होणे. हलकेपणा जाणवणे. वस्त्रजीर्ण होणे. आत्मा नवीन वस्त्र धारण करणे इत्यादी साधने आहेत. ही दोरी म्हणिजेच हे सूत्र, आपल्या केसांपेक्षा ११ पट सूक्ष्म असते, म्हणून ते दिसत नाही. जसे माणसाच्या बुबुळात कुठलीही गोष्ट सातपट मोठी दिसते. लहान मुलास मात्र ती जशी आहे तशीच दिसते. म्हणून ते कुठलीही गोष्ट चिमटीत पकडायला बघते. त्याच्या या बाल हातांची चिमटी पद्धतीची रचना बऱ्याचवेळा होते. जसे सावलीत एखादी वस्तू म्हणिजे ज्या वस्तूची सावली पडते ती वस्तू मोठी दिसते तसेच हे आहे. परंतु छाया-प्रकाश यात ही 'वेधा' कुठेच अडकत नाही. ती आरपार जाणारी पण द्रव-नाद-स्पंदने-अशा कुठल्याही दृश्यातून किंवा संकेतचिन्हांमधून आपणापर्यंत येउ शकत नाही. तिचा थोडासा अंदाज जर आपणास जीव पातळीवर घ्यावयाचा असल्यास बघा, मूल मान धरत नाही. कुठेही लोळागोळा अशी त्याची मान हलत असते. ही दोरी-ही वेधा जोपर्यंत सरळ होत नाही, ही वेधा जोपर्यंत उर्ध्व होत नाही, तोपर्यंत जीव मान धरत नाही. जातांनाही ही तुटते नी मान कलते. फार गंभीर नी कठीण सूत्र आहे हे. जसे पाठीच्या मणक्यात ही अत्यंत सूक्ष्म स्वरुपात वास करीत असल्याकारणाने, धक्का बसणे-कंबर खचणे-धसका बसणे-यातूनही हिचे रुप आपणास कळू शकते. हर्षवायूनेही ही मूळ ठिकाणापासून हलते नी दुःखातिरेकानेही ही कोमजते. हिस झोळ पडला की वृद्धत्व येते. नी शरीरास बाक यावयास लागतो. हिस झोळ पडल्यानेच अवयव क्षीण होत जातात. त्याच्यातील शक्ती कमी कमी होत

जाते. दिसणे-ऐकणे याबाबत हिचा प्रत्यय लवकर येतो. म्हणून हिस उर्ध्वा ठेवावी लागते. त्या उर्ध्वतेकरीताच-लक्ष बेलवहन-लक्ष तुलसीवहन आपल्या धर्मकर्मात-आपल्या शास्त्रात ग्रंथित केलेले आहे. सांगितलेले आहेत. ही केवळ नुसती पूजाविधी-पद्धती नाही. तेवढा वेळ ताठ बसणे-अध्ययन-अध्यापन-जप-स्नान-पूजा इ. साठी साधना-ध्यान या साऱ्यात ताठ बसणे, हे सारे इजसाठीच साधावयाचे असते. हे सूत्र हलू नये म्हणून फार जपावे लागते. नी आता आपण कसे, तर आपला स्वभाव ताठ. अहंकार-गर्वाचा ताठा-फुगारा. जे नको तेच. आता तर आपल्या त्या पाठीस ताठ ठेवणाऱ्या खुर्च्याही आता गेल्या. आताच्या खुर्च्यांना काय म्हणावे तेच कळत नाही. पाठ नाही, हात नाही, पाय टेकवायला जागा नाही. फक्त पार्श्वभाग टेकवायचां. एक रंगीत फळी म्हणजे आधुनिक खुर्ची. काय सुधारणा? मग नंतर कळतं की अशा खुर्च्यांवर बसून किडनीचे आजार वाढायला लागले-हृदयास रक्तपुरवठा होईना झाले-जेवल्यावर अन्न घशाशी यायला लागले-मळमळ सुटायाला लागली-ढेकर येईनासे झाले-जेवताना उचकी लागायाला लागली-हे असे उर्ध्व लागणे घडते. नी ही वेधाशक्ती म्हणिजे वेगळ्याच बाबतीतली उर्ध्वा. या अशा सुधारणा म्हणिजे कावळ्याच्या छत्र्या. एक एक करीत येतील नी जातीलही. महापूरे झाडे जाती..तेथे लव्हाळे वाचती. एवढी बळकटी केवळ आर्य संस्कृतीतूनच प्राप्त होणारी आहे. कुठल्याही गर्वाने-अभिमानाने-कुणास बोचेल असे हे सांगणे नाही. तर हा अभ्यास आहे. नी तो या ब्रह्मांडावरील यच्चयावत चर-अचरांच्या हितासाठीचा आहे. आपली आपल्याला ओळख होणे कोणास नको आहे? उगाच साप साप म्हणून भूई धोपटत आपण कशाला आयुष्येच्या आयुष्ये वाया घालवावयाची? अल्पबुद्धीने होणारे संघर्ष टाळून पक्व नी परिपूर्ण बुद्धीने होणारे मैत्र किती सुंदर-व्यापक नी उपयुक्त आहे, हेच श्रीसमर्थांना तद्धतच सर्व श्रीसंतांना सांगावयाचे आहे. आम्ही ही भावंडे सारी। येतो झालो भूमीवरी । कैवल्याच्या वाटेवरी । भाविक आणून सोडावया ॥ असे हे नाते, असे हे सूत्र. या सूत्रातून त्या सुत्रधारासच गाठता येते. भेटता येते. सर्व सूत्रे-सर्व धागे रेशमाचे-केशराचे-चंदनाचे.

नी दुधा-मधा-लोण्याचे आहेत. दुधाचे थोडेफार उमजतील. पण पुढच्यासाठी अभ्यासच करावा लागेल. ही दोरी, हे सूत्र मौनाने बळकट राहते-तसेच गुळ-पाणी नी गोपद्म दर्शनाने याची धवलता-शुद्धता कायम राहते. या दोरीस, या सूत्रास लेपन पद्धती आवडते म्हणून, आपण आपल्या उपास्य दैवतांना चंदन-अष्टगंध-केशर आदींचे लेपन करतो. नी अभिषेक-पंचामृती पूजाही याच कारणासाठी करतो. कारण ती ताठ-सरळ-अग्रजा-उर्ध्वा रहावी म्हणून. भस्मविलेपन हे ही याचसाठी आहे. हे जाणायाला हवे. नारळात बरोबर मधे कोंब फुटतो तोही याच सूत्रामुळे. फळे-फुले सारे देठामधून फुटणे तेही हेच सूत्र आहे. आत्मा-परमात्मा एकरुप करण्याचेही हेच सूत्र आहे. काही संख्येनी मण्यांना एकत्र आणून जपमाळ करण्यातही हेच सूत्र आहे. प्रिया-प्रियोत्तमाच्या आकर्षणातही हेच सूत्र आहे. हे सारे आहे-असते, पण दिसत नाही. आरंभ नी अंत एका माळेतच. आपण मेरुमणि मधे ठेवून जे १०८ मणिमाळेचे सूत्र जपवेळी अनुभवितो तेही हेच सूत्र होय. अशी ही वेधा. हिस चाफा नी मोगरा प्रिय. म्हणून श्रीमाऊली म्हणाल्या, तयाचा वेलू गेला गगनावेरी..नी श्रीसमर्थांच्या शिष्या श्रीवेणाबाई यांच्या समाधीस्थानी वृंदावनातूनही हाच चंपक बहरला. नी आरती प्रसंगी श्रीसमर्थांच्या समाधीवर सेवारुप श्रीगुरुसेवा करीता झाला. श्रींचे चरणी आत्मलीन झाल्यानंतरही, श्रीसेवेकरीता चंपकवृष्टीकरीता जाहलां.

श्रीगुरु-शिष्य हे तर इयेचे सर्वात लाडके-अंतरंग-हृदय-काळीज-प्रेमळ-जिव्हाळा सूत्र आहे. तुटता तुटत नाही अशी ही घट्ट नाती. जन्मोजन्मीची ही सूत्री. हे ही इयेचेच सूत्र. नी 'स्मरण' हे ही इयेच्याच अंकीत. ते स्मरणसूत्र जमले, तर सारे जन्म स्मरतील. नी मग हा सारा खटाटोप, हा सारा पसारा व्यर्थ वाटून, खरोखरच आनंदाचे डोही आनंद तरंग । समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे । अशी जीवाची अवस्था होईल.

**..बाणेदार-धीट-निर्भिड मेधाशक्ती..**

आता ३ री शक्ती मेधा. मेधा म्हणिजे-तीव्र-प्रखर-कठोर-तेजस्वी-बाणेदार-धीट-निर्भिड-परात्पर अशी विद्या. विद्या म्हणिजेच शक्ती. ही शक्ती अश्वशक्ती आहे. अश्व म्हणिजे अ शव-अ पार्थिव. ज्यात शव संभवत

नाही ती. या मेधा शक्तीतच आपली सारी संक्रमणे म्हणिजे अनंतजन्म दडलेले असतात. अश्वमेधादिकं पुण्यं..म्हणून पूर्वीचे राजे अश्वमेधयज्ञ करीत असत. अर्थात त्यात त्यांचा उद्देश स्वसत्ता स्थापिण्याचा-पृथ्वीचे राज्यकरण्याचा असे. परंतु त्याकरिता-ते जो अश्व वापरीत-उपयोगात आणित, तो अश्व हा मेधाशक्तीने युक्त असावयाचा. आता असे अश्व बघावयासही मिळणे अवघड. तसे ते आता उरलेलेच नाहीत. त्यांचे म्हणिजे श्रीअश्वांचे विषयी थोडे बघू या. या अश्वांचे पुच्छ हिर्मुजी रंगाचे व पंख कर्पूरगौर असत. संवाद माध्यम जर त्यांच्या तोडीचे असेल, म्हणिजे पूर्णज्ञानी जर कोणी भेटले, तर ते अश्व त्याचेसी संवादही करीत. प्रचंड शक्ती-युक्ती-चार्तुय-ज्ञान-भूत-वर्तमान-भविष्य नी प्रेरणा जाणण्याची त्यांमध्ये ताकद असे. म्हणिजे कोणत्याही प्रदेशी गेल्यावर काय आपत्ती येईल हे ते सांगत. यांना लगाम घालावयाची आवश्यकता नसे. कोणाचे कीती सैन्यबल हे ते आपल्या पुढच्या मागच्या पदांच्या चालीवरुन सांगत. एखाद्या ठीकाणी जर या अश्वाने मान खाली घातिली तर हे राज्य आपले मांडलिक होणार हे ओळखले जायाचे. श्रीश्वानांस जसे श्रीयमाजी भास्कर म्हणजेच यम येणार असतील तर संकेत कळतो, तसेच या अश्वासही दिनमान कळत असे. राजाच्या घरी मुलगा जन्मला की त्या बालकास श्रीअश्वांपुढे आणित. त्या अश्वाने त्यास हुंगले-चाटले की त्या मुलाच्या २१ मेधाशक्ती तत्काळ जाग्या होत असत. अग्नि-पाणी-यांचा वेग, तसेच वायुवेगही यांना अवगत असे. धन्याच्या मनाचा वेग-त्याची मानसिक अवस्था-एखादा बाका प्रसंग ते बरोबर ताडीत. योगमार्गाचे-आपल्या स्वशक्तीचे पूर्णज्ञान यांस असते. कित्येक पट उंचावरुन छलांग देणे हे यांचे कौशल्य. म्हणजे तटावरुन छलांग दिली की आपल्या भाषेत ७० ते १०० की.मी. पर्यंत यांची उडी जात असे. यांचे मुखास कधीही फेस येत नसे. हरबरे-काळे फुटाणे-शेंगदाणे-कोवळा घास तर आहेच. परंतु कोवळा गहू यांस प्रिय. कारण कोवळ्या गव्हात तर अफाट ताकद असते. कुठेही विश्रांती दरम्यान जर यांस पाणी दिले तर हे अश्व, ते पाणी स्वच्छ करुन पीत असत. ती त्यांची पद्धती असे. त्यावेळचा अश्व जर एखाद्या ठिकाणी

एखाद्या प्रदेशी फुरफुरला, तर त्या सैन्याच्या सेनापतीस धोका संभवत असे. पूर्ण उच्चीचे हे सारे रसायन आहे. नी हे सारे या अश्वमेधाच्या अश्वाबाबतचे तंत्र होय. सर्वच अश्व असे असतात असे नव्हे. परंतु बहुतांशी असेच असतात हे ही खरे. श्रीअर्जुन नी श्रीअश्व हेच पूर्णपुरुष म्हणिजेच नर अवस्थाप्राप्त आहेत. बाकी सर्वच जीव अर्धनारी अवस्थेत आहेत. तशा अर्थाने हे सारे आपल्या बुद्धी पैलचेच आहे. आत्ता आत्तापर्यंतचे अश्व बघा- श्रीराणाप्रतापांचा चेतक. श्रीछत्रपतींचा रामबाण. हाच अश्व श्रीसमर्थांस श्रीछत्रपतींनी नंतर अर्पण केला. श्रीलक्ष्मीबाईंचा रामप्रसाद अश्व. श्रीबाजीराव पेशव्यांचा उर्ध्वराज अश्व. पेशव्यांचे तर दुसरे सदनच म्हणावे हे श्रीअश्व. ते सततच लढाई-मोहिमांवर असत. या साऱ्यांजवळ पुष्कळच अश्व असत. नी त्यांची त्यांस पारखही उत्तम करता येत असे. असे सुलक्षणी-उत्तमगुणी- अष्टध्यानी असे पुष्कळ अश्व आहेत. परंतु आपण येथे उदाहणादाखल थोडे घेतले. श्रीगजाननमहाराजांचा उध्वर्यू-श्री गोंदवलेकर महाराजांचा बत्ताशा-श्रीअक्कलकोट स्वामींचा दिव्यबाण. सारे स्वामीनिष्ठ सेवक. अशा या साऱ्या सेवकांचा उल्लेख या मेधाशक्तीत आपणांस करता येईल. प्रचंड स्वामीनिष्ठा असते यांमधे. या अश्वांस धन्यानी ठेविलेले नाव कसे कळत असेल? कोणत्या योगे कळत असेल कुणास ठाऊक? परंतु श्रीस्वामींनी त्यांस ठेविलेल्या नावाने हाक मारली की ते अश्व उड्या मारणारच. चौखुरे दाखविणारच, इतके हुशार असत हे. आता तर विद्युतशक्तीस देखील अश्वशक्ती म्हणतात. अशी ही शक्ती 'अशवी'. पार्थिवता किंचीतही नसलेली- संपूर्ण चैतन्याने युक्त अशी ही शक्ती आहे. नी ती आपल्यातच म्हणजे जीवाच्याच बुध्दीत-मस्तकात तसेच हृदयात-नाभीत-जानुत व पायाचे अंगठे-तसेच हातामधील तर्जनीत-भ्रूमध्यात व कानाच्या पाळींमध्ये अनुस्यूत अशी ही शक्ती असते. जीवाचे अभ्यास सूत्राशीही हे निगडीत असते. स्मरण-ग्रहण या बाजूही याच सूत्राशी असतात. मन लावून- मनापासून-मनःपूर्वक अशा साऱ्या मननाच्या जागाही याचेच कक्षेत येतात. श्रीमहाराज जे आपणास सांगत आहेत की, याचेच करा सदा मनन। कशापासूनी जग झाले।। ती मननाची गुहा देखील इथेच आहे. ती शक्ती

आहे. अश्वाचे खाणे हरबरे-यातही ही मेधाशक्ती आहेच. या मेधाशक्तीचा प्रसव-उद्भव-प्रवाह हा चंद्रविकसीनी आहे. चंद्रास पाहून हा शक्ती प्रसव आहे. प्रतिभा म्हणून जी साहित्यवेधी शक्ती आहे, ती याचाच भाग होय. याचे म्हणजे मेधाशक्तीचे प्रतिक म्हणून अश्विन महिन्यात वाफविलेल्या-उकडलेल्या-तेलमसाला लावून-फोडणी दिलेल्या, अशापध्दतीच्या हरबऱ्यांनी ओटी भरण्याचा नी ते ही अष्टमीस ओटी भरण्याचा प्रघात आहे. कारण ही शक्ती रात्री विकास पावते. प्रवाहीत होते. म्हणून नवरात्रीचा सारा खजिना-अवघे भांडार हिचे ठायी लपलेले आहे. अर्थात ही वेधाकडे झुकलेली असते. वेधावर अवलंबून असते-तशी स्वतंत्र, पण दिवस-रात्रीच्या सूत्रात ही रात्रीच प्रगटणारी म्हणून संकोची, पण पूर्ण अशी असते. शीघ्र कवित्व-हजरजबाबी-विनोदबुद्धी-बुध्दीचापल्य-युक्तीविभाग-तीव्रबुध्दी-चटकन म्हणिजेच तीव्र ग्रहणशक्ती-कठोर एकपाठी इत्यादी गोष्टी-तसेच तैलबुध्दी-कामातील परिपूर्णत्व आदी या शक्तीच्या सावल्या होत. प्रत्यक्ष ही शक्ती जर पहावयाची असेल, तर भोपळा पाहून-म्हणिजे न कापता केवळ पाहूनच बिया किती आहेत हे सांगणे ही शक्ती म्हणता येईल. श्रीसमर्थांनी एका ठिकाणी पेच टाकण्याचे पद रचिले त्यात ते पृच्छा करीतात, कीती अंगुळे गगन । सांग सिंधुचे जल किती टाक । श्रीसमर्थ हे सारेच जाणितात. त्यांच्या दृष्टीने हे पेच नाहीतच. हे संपूर्ण पद पुढे दिले आहेच. आपणांस हाच आनंद-हाच अभिमान, योग्य अर्थाने-सार्थ भावाने अभिमान वाटावा असे आपले हे श्रीसद्गुरुस्थान आहे. या मेधाशक्तीने तर श्रीसमर्थांना वरीलेच आहे.

ठकारे पर्वता ऐसा। नेटका सडपातळू।
चपळांग पाहता मोठे। महाविद्युल्यतेपरी।
कोटीच्या कोटी उड्डाणे। झेपावे उत्तरेकडे।
मंदाद्रीसारीखा द्रोणू क्रोधे उत्पाटीला बळे।
आणिला मागुती नेला। आला गेला मनोगती।
मनासी टाकीले मागे। गतिसी तुळणा नसे।
अणुपासोनी ब्रह्मांडा एवढा होत जातसे।

तयासी तुळणा कैसी। मेरु मांदार धाकुटे।
ब्रह्मांडा भोवता वेढे। स्वपुच्छे घालवू शके।
तयासी तुळणा कोठे। ब्रह्मांडी पाहता नसे।
आरक्त देखीले डोळा। गिळीले सूर्यमंडळा।
वाढता वाढता वाढे। भेदिले शून्यमंडळा।।

हे कुठल्याच-कुणाच्याच शक्तीचे देणे नाही. कुठल्या शक्तीतही ही शक्ती नाही. शक्तीसही हे शक्य नाही. ही सर्व शक्तींच्या पलिकडील 'स्वतंत्र' अशी ही श्रीकपिवरदिव्या आहे. श्रीसमर्थ..श्रीसमर्थ..सामर्थ्यांचेही सामर्थ्य. सामर्थ्यानेही चरणी लोळावे असे दिव्यस्थान. श्रीकपिवरमहाबलीमहारुद्र हनुमंत-श्रीसमर्थरामदासस्वामी महाराज-श्रीश्रीगजाननमहाराज. आपणांस पूर्ण अचंबित करणारा-कोड्यात टाकणारा, नी आपण कधीही सोडवू शकणार नाही असा हा पेच कसा टाकला बघा श्रीस्वामींनी-

किती पृथ्वीचे वजन। कीती अंगोळ्या गगन।
सांग सिंधूचे जीवन कीती टाक।।
कीती आकाशीचा वारा। कीती परजन्याच्या धारा।
तृण भुमीवरी चतुरा। संख्या सांग।।
वायुसरसे उडती। सांग अणूरेणू कीती।
लक्ष चौऱ्यांशीची उत्पत्ती। संख्या सांग।।
अठराभार वनस्पती। भुमंडळी पाणी कीती।
पुष्पे फळे माती कीती। संख्या सांग।।
बीज़ वडी आणि पिंपळी। किती आहे भूमंडळी।
सर्व धान्यांची मोकळी। संख्या सांग।।
सर्व सरीतांची वाळू कीती। सिंधू सागरी वाळू कीती।
हरखू आहे कीती। संख्या सांग।।
सांग माझे डफगाणे। की डफ ठेवी शहाणपणे।
देह बुध्दीचे लक्षण। सोडवीन।।
ऐक जे जे पुशिले तुज। ते ते आता सांगे मज।
अनंतब्रह्मांड बेरीज। किती जाहली।।

रामदासाचा विनोद। सांडी अहंतेचे बीज।
मग स्वरुपी आनंद। सुखी राहे।।

काय सामर्थ्य आहे हो हे. या सामर्थ्याचे वर्णन करण्यास कुठली शब्द योजना करावयाची. कोणते शब्द आणावयाचे. श्रीशारदामातांनाच विनंती की श्रीस्वामीन् किर्ती वर्णिण्याचे ते भाग्य या जीवास लाभू द्या. ते कपाट उघडा. ते शब्दभांडार फोडा. येथे विनोद याचा सामान्य अर्थ घ्यावयाचा नाही. म्हणिजे समर्थांनी त्या शाहीराची गंमत केली, असा अर्थ घ्यावयाचा नाही. काळाग्नी काळ रुद्राग्नी। देखता कापती भये।। असे रुप गंमत करेल? श्रीसमर्थांचा शाहीरास प्रश्न. या एका स्वतंत्र प्रकरणात सदरील सारे उल्लेखित आहे. नमूद आहे. त्या प्रकरणात या घटनेविषयी जसे लिहीले आहे, ते तसेच्या तसेच येथे दिले आहे. बघा–कोणे एके समयी श्रीसमर्थ परळीहून चांफळास येण्याकरीता निघाले. मार्गी येतांना पालीस आले. तेथे पौषमासी जत्रा भरलेली होती. त्यात नागेशवाले व हरदासवाले शाहीर यांचा फड पडून एकमेकांवर चढ करीत बैसिले होते. तेथे श्रीसमर्थ येताच ते सर्व उठून साष्टांग नमस्कार व दंडवत करुन उभे राहिले. त्यांनी विनंती केली की, आम्ही दोन पक्षांचे शाहीर आहोत, एकमेकांवर चढ टाकून एकमेकांची परीक्षा करीत आहोत. हे ऐकून, आम्ही, तुम्हा दोघांवर चढ टाकितो, त्याचे दोघे मिळून उत्तर द्या. असे म्हणून श्रीसमर्थांनी हे डफगाणे केले आहे. आता सांगा, ज्यांनी ही चढ केली ते का विनोद करीत होते? नाही हो. त्या शाहीरास पडलेला पेच पाहून श्रीसमर्थ सांगते जाहले, **अहंता सांडीली, की या साऱ्याचे उत्तर जरुर देऊ. स्वरुपातला आनंद हा अहंकारासह घेता येणार नाही.** तो कळणारच नाही. म्हणून अहंकार लय झाल्यास जे ज्ञान, जो आनंद मिळणार आहे, तो अन्य कशानेच प्राप्त होणारा नाही. काय हे अफाट सामर्थ्य. आपल्याला या साऱ्याची उत्तरे नाही माहीत करुन घ्यावयाची, तर आता आपले सारे प्रश्नच संपले, या जाणिवेने ही श्रीसद्‌गुरुचरणे सेवावयाची आहेत. दृढतर धरावयाची आहेत. अशी ही मेधाशक्ती. अध्यात्मिक–अधिभौतिक–अधिदैविक ताप जेव्हा जीवास गांजतात–पीडतात तेव्हा, कींवा एखाद्या संकटसमयी जीवाची बुध्दी चालत

नाही-काही सुचतच नाही, अशी जेव्हा बुध्दीची अवस्था होते-अशा ज्या कडेस बुध्दी रेंगाळत राहते-परंतु बुध्दीला तो कणखर-समस्येचा-संकटांचा नी प्रश्नांचा दगडासारखा कठीण भाग फोडून पुढे जाता येत नाही. जीवाची तडफड होते, पण उत्तर सापडत नाही. या नी अशा जागेपासूनही अनंतयोजने दूर असणारी ही मेधाशक्ती आहे. जसे 'बी' या पर्यंत जीवाचे ज्ञान एक वेळ जाउ शकेल. परंतु 'बी' कसे-कोणी-कधी निर्माण केले हे, या सृष्टीचे बीज काय आहे, हे? हे काही सांगता येत नाही. तडफड होते, परंतु सत्य गवसत नाही. तेव्हा ही बुध्दी अशीच शोध-संशोधन-तर्क-अंदाज-आडाखे यांबाजूस-या कडेस रेंगाळत राहते, पण तरीही चित्र स्पष्ट होत नाही. अशा या सर्व तर्क-तार्कीकांपलिकडे, त्याच्याहीपुढे हे खरे, हे सत्य ज्ञानक्षेत्र सुरु होते. तेथील प्रमाण..नेणवे वेदांसी..ते जीवजंतूसी केवि कळे. ज्ञान म्हणजे जाणिव. नी जाणिव-विवेक याने परिपूर्ण, आता काहीच जाणावयाचे उरले नाही-नेणता भाव विरला-खरा प्रणेता कळला की, ही शक्ती स्फुरण पावते. ही शक्ती म्हणजे स्फुरणपद्धती आहे. या शक्तीच्या कक्षेत मग अनंतकोटी ब्रह्मांड नी पूर्णज्ञान केवळ विहरत असते. सातत्य-शिस्त-नियम-नेम-व्रतं-सत्संग-संतसेवा-ग्रंथसेवा या अतिकोमल विनयाकडे वळविणाऱ्या गोष्टीतून हीचे ज्ञान-हीचा मार्ग-हीची दिशा कळते. कान्होला म्हणजे करंजी-गुळ-खोबरे घालून केलेला एक पदार्थ. नी बाजरीची भाकरी, हे हिची पुष्टता-तीव्रता वाढवितात. कडधान्यांच्या सेवनाने ही समृद्ध होते. कडधान्ये हिस कसे समृद्ध करतात. हा एक फार सुंदर असा विषय आहे. तो आपण या मालीकेतच पुढे पाहणार आहोत. इतकी तेज होते ही शक्ती, की जसे सूर्य पाहिला की सर्व ग्रहमंडळांसह त्यावरील स्थित्यंतरांसह भूत-भविष्य-वर्तमान इजमुळे सांगता येते. वोळखिता येते. उत्पत्ती पासून भ्रमण कक्षेपर्यंत सारे स्पष्ट करता येते. थोडक्यात ज्या गोष्टीकडे पाहू त्या गोष्टीचे मुळारंभ आरंभापासूनचे सारे ज्ञान, क्षणापेक्षाही कमी कालावधीत इजमुळे होते.

**..प्रयत्नांनी प्राप्तशक्ती त्रिधा..**

आता चौथी शक्ती त्रिधा. ही मेधा शक्तीच्याच समतोलाची, पण

मर्यादित अशी ही शक्ती जीवास त्रिलोकांपर्यंतचे ज्ञान प्रयत्नांनी देते. जसे आपण म्हणतो की प्रयत्नांति परमेश्वर अशी ती ही होय. ही स्वभावतः शांत असल्याकारणाने स्वर्ग-मृत्यू-पाताळ या तिन्ही जागी ही वावरते. या तिन्ही गोष्टींचे हिचे ज्ञान विशेष आहे. हिस तिन्हीकाळांचे, म्हणिजे भूत-भविष्य-वर्तमान या काळांचे. सत्व-रज-तम या भावाचे. अध्यात्मिक-अधिभौतिक-अधिदैविक या पिंडेचे. संचित-प्रारब्ध-क्रियमाण या रचनेचे. बाल्य-तारुण्य-वार्धक्य या संक्रमणाचे. ज्ञान-वैराग्य-मुक्ती या स्वतंत्रतेचे. जन्म-जरा-मरण या त्रिविध तापाचे. आप्त-स्वकीय-परकीय-गोत्र-कुंडली-कुळं, या साऱ्यांचे संपूर्ण ज्ञान असते. हे ज्ञान, जीवास अभ्यासाने प्राप्त होऊ शकते. परंतु जीवाचे कुठल्याच बाबतीत नीटसे-पुरेसे सातत्य नसल्यामुळे ही शक्ती उपयोगात येऊ शकत नाही. या शक्तीपासून त्यास काहीच लाभ करुन घेता येत नाही. ज्योतिष-होरा-कुंडली-संख्या इत्यादी शास्त्र इयेच्याच कक्षात येतात. परंतु पूर्ण त्रिधा प्राप्ती न झाल्यामुळे कुठल्याच बाबतीत पुरेसे 'ठाम'पण, निश्चीतता या शास्त्रात घट्ट शकत नाही. अंदाज बरोबर येऊ शकेल. असे हे शक्यता वर्तविण्याचे शास्त्र आहे. तसे ते पूर्णच नी व्यवस्थितच सूत्र आहे. परंतु तरीही श्रीज्योतिषमहाशयही इस अंदाज-होरा असेच संबोधितात. एखाद्या गोष्टीवरील विश्वास हे कार्यक्षेत्र देखील इयेच्याच अखत्यारीतील होय. द्रवपदार्थांमधून हिची शक्ती वाढण्यास मदत होते. जसे दूध पिणे-सरबते-खिरी-सर्व प्रकारच्या आमटी-वरण इत्यादी पदार्थांमधून हिची शक्ती वाढते. नी जीवास यांचे स्वादामधून या ज्ञानकक्षेच्या जवळ आसपास जाता येते. शेतीचे पिक येणे-वाढणे-अमाप होणे हे देखील याच शक्तीचे कार्य होय. विहिरीस पाणी-पर्जन्यवृष्टी साऱ्या हिच्याच हातात आहेत. हिस मेधा शक्तीचेच लघुरुप म्हंटले तरी चालेल. श्रीनरास या प्राप्त करुन घ्याव्या लागतात. श्रीवानरांमधे या उपजतच प्रेरीत असतात. श्रीकाक-कावळा यांतही ही त्रिधाशक्ती मोठ्या प्रमाणावर असल्याकारणाने सूक्ष्म दृष्टीने त्यांस या सृष्टीचे अवलोकन करीता येते. अंतरिक्षातील प्राण, सपिंड करणे, हे श्रीकाक यांस याचशक्तीने कळते-समजते. पितरांकडील कोणी स्वप्नी येणे-भविष्यसदृश काही स्वप्ने पडणे, हे इयेच्याच कक्षेत

येते. परंतु सारीच स्वप्ने ही सूचक असतात असे नव्हे. काही प्रकृती अस्वास्थ्यामुळेही पडू शकतात. स्वर्ग-मृत्यु-पाताळ या सर्व ठिकाणी जाण्याचे मार्ग हिस ठावकी आहेत. परंतु जीवास हे ज्ञान होणे कठीण. कारण आपण आपल्या मूळच्याच गोष्टींमध्ये खुपच कशाकशाची सरमिसळ केलेली आहे. सारे कालविले आहे. त्यामुळे अंतस्थ शुध्दता हरविली. नी सारे चित्र स्पष्ट असूनही धूसर झाले. दिसेनासे झाले. आपण ही सर्व श्रीदेवभूमी पाहू शकतो. या भूमीवर वावरलेल्या श्रीदेवांच्या जागा-स्थाने-क्षेत्रे-तीर्थे पाहू शकतो. परंतु प्रत्यक्ष श्रीदेवांना पाहू शकत नाही. असे का? तर हेच ते धूसर-धूमील-अस्पष्ट होणे. स्वच्छ-स्पष्ट नी निर्मळ दिसणे हे अवघड होऊन बसले आहे. समजणे-उमजणे सारे हिच्या कक्षेत आहे. स्मरणात राहणे-स्मरणात ठेवणे-येणे, सारे या त्रिधेच्या प्रांतातील तियेच्या हातातील सूत्र आहे. हिस प्रार्थनेने प्राप्त करुन घेता येते. विश्वाचे आर्त माझ्या मनी प्रगटले। अवघेचि झाले देह ब्रह्म। ही वैश्विक पातळी जीवास हिच्यामुळे गाठता येते. सोलून खाण्याचे पदार्थांनी या शक्तीस, पुष्टी येते. जसे शेंगा-सीताफळ-ऊस-केळी इत्यादी. उकल करणारी ही शक्ती आहे.

**..संशोधनाची आद्या द्विविधाशक्ती..**

पाचवी शक्ती द्विविधा शक्ती. ही मेधा-त्रिधा यांच्या मधून प्रवाहीत होणारी शक्ती. जीवास शोध-बोध-संशोधन यात मदत करणारी. त्रिवेणीतील एक पेड जो गुप्त असतो. तसे हिस संबोधावे. स्वशोधनापासून आत्मशोधना पर्यंत हिची जीवास मदतच होते. फक्त ही यमधर्मांच्या कक्षेत असल्यामुळे बऱ्याच वेळेस यातील 'वि' हे अक्षर लुप्त होउन म्हणिजे, द्विविधा यातील वि हे अक्षर लुप्त होऊन फक्त ही द्विधा-ही तारांबळच तेवढी जीवास आयुष्यभर अनुभवास येते. हा 'वि' म्हणिजेच विजय. म्हणून आपल्या श्रीसद्ग्रंथांना विजय म्हणण्याची पद्धती आहे. जसे श्रीगजाननविजय, श्रीहरीविजय, श्रीरामविजय, श्रीभक्तीविजय असे. पुर्वीच्या काळी-अतिपुर्वीच्या काळी श्रीरामायण-श्रीमहाभारत-श्रीवेद-इत्यादी ग्रंथांस जय म्हणावयाची पध्दती होती. या ग्रंथाचरणातून जो तपस्वी-ब्रह्मर्षि-महर्षि-तपःर्षि-जपर्षि होत असे, त्यांस विजय ही संज्ञा प्राप्त होत असे. त्यातील हा 'वि' होय.

संशोधन-कला-विद्या यातून प्रवाहित होतात. नेम-नियम-शिस्त-व्रत-उपवास-दान-धर्म हे या क्षेत्रात मोडतात. या साऱ्यांच्या आचरणानी जीव निश्चितपणे श्रीनारायणस्वरुपी जाऊ शकतो-पोहोचू शकतो. ही द्विविधा, प्रकृतीस्वरुप असल्याकारणाने स्त्रीयांच्या वेणीच्या पेडात सरतेशेवटी, स्त्रिया वेणी सुटू नये म्हणून, जी केसांचीच गाठ मारतात, ती गाठ हे या द्विविधेचे रुप होय. नी या गाठीमुळे, या पेडयुक्त वेणीमुळे स्त्रीस मेधा-त्रिधा-द्विविधा या साऱ्यांचे संयोगवश शक्ती प्राप्त होते. नी ती सहस्त्रभुजाबलाची होते. दिव्या-भवानी शक्तीधारीणी होते. असे हे श्रीवेणीदर्शन ज्यांस होईल तो धन्य होय. शुभशकुनांमध्ये या वेणीदर्शनाचा फारच मोठा सहभाग आहे. श्रीश्रीकृष्णांनी श्रीराधाजींची कुसुमसरोवरावर याच मेधा-त्रिधा-द्विविधा पध्दतीने वेणी घातिलेली आहे. वेणीदान हा भाग पूर्णतः वेगळा आहे. त्रिवेणी संगम ज्या नद्यांचा ज्या ठिकाणी होतो, त्या ठिकाणीही संगम स्नानाचे अतिशय महत्व आहे ते याचमुळे. त्यामध्येही एकनदी मेधा-एकनदी त्रिधा व एकनदी द्विविधा अशा स्वरुपाची असते. ती श्रीगुरुअंजनेशिवाय मात्र जीवास दिसणे अथवा प्राप्त होणे नाही. संगम हा केवळ नद्यांचाच होतो असे नाही, तर एकाच वेळी पाचवट- पंचवट बघणे-अर्थात एका नजरेत, बुबुळे न हालविता न फिरविता,तोडून दृश्य न बघता हे सारे पाहावयास हवे. ११ औदुंबरवृक्ष एकत्र पहाणे. ७१ बेलाचे वृक्ष एकाचवेळी पाहणे. १०७१ चिंचेची झाडे जो एका नजरेत-एकाच वेळेस मान-बुबुळे न हलविता मोजू शकेल-त्यास आयुष्यवाढ लाभते. १२ आदित्य एकाचवेळी बघणे. अर्थात हे सारे तंत्र अभ्यासावयाचे नी ते श्रीगुरु आदेशानेच प्राप्त. नी फलीत व्हावयाचे तंत्र आहे. म्हणूनच ते श्रीयमधर्मांच्याच अखत्यारीत ठेविले आहे. अत्यंत शुद्ध-सर्वकर्तव्यांच्या परीपूर्णतेची पूर्णजाण अशी यात पथ्ये आहेत. श्रीपरमईश्वराच्या अतिसुंदर-सुबक अशा या योजना आहेत. पूर्वी दंडकारण्ये-तपोवने हे भाग या अभ्यासाकरीता विशेषेकरुन तयार केले जात असत. रक्षिले-वाढविले जात असत. नी मग ऋषी-मुनी अशा या अरण्य-वन-तपोवन-उपवन-सरोवर-तळी याअशा राखीवस्थली येऊन जनहितकारी विद्यांचे-शोधांचे प्रेरणा-स्फुर्तीने ग्रहण करुन श्रीग्रंथांद्वारे

अथवा श्रीकथनांद्वारे ज्यास आपण दंतकथा संबोधितो अशी ही विद्या एकाकडून दुसऱ्याकडे पोहोचवित. आता हे एवढ्या प्रमाणात एकाचवेळी एकाच ठिकाणी हे असे वृक्ष बघावयाला मिळणेही अवघडच आहे. बरे त्या वृक्षांस पाटाचे वगैरे पाणी नव्हे, तर संगमाचे पाणी वळविण्याइतपत त्या वेळचे राजेही शूर-ताकदवान नी धर्मपरायण असत. धर्म म्हणिजे सध्या जो झगडा चालू आहे तो धर्म नव्हे. तर सर्वंकष कल्याणाचा-श्रीपृथ्वी ही माता नी आपण सारे तियेचे पुत्र असा भाव. नी तद्नुषंगानी बांधव हा एवढाच विचार या साऱ्यापाठीमागे असावयाचा. तेव्हा ही फलिते लाभत-असत. केवळ इमारतींमधून एखादे दुसरे झाड, हे यास उपयोगी नाही. येथे काय साधावयाचे हाच संभ्रम आहे. नी काही साधलेच तरी त्यात समाधान गवसत नाही. अशा वातावरणात-अशा परिस्थितीत कुठली आली साधना नी तपःश्चर्या. ध्यानही दुर्घटच. साधे नामःस्मरण नी पोथी वाचनातही लक्ष नसते. तर कसली ही दिव्यफलीते. खूप नुकसान करुन घेतिले आहे आपण आपले. नी पुन्हा व्हावी तशी खंतही होताना दिसत नाही. हे खूपच कठीण. अपराधी जन चुकतचि गेले। तुझा तुचि सावरी दयाळा। कल्याण करी रामराया।। नाही. आता असे होणे नाही. होउ द्यावयाचे नाही. या साऱ्यांचे जतन-रक्षण-संवर्धन करावयासच हवे. औषधे-गोळ्या इत्यादीपेक्षा जर भरल्यापुरल्या विपुल अशा निसर्गातील परिपक्व अशा रसांमधून घेतिलेल्या श्वासोच्छ्श्वासाने आपण आरोग्यशील राहाणार असू, तर या साऱ्याचा विचार किती प्राधान्याने आपण केला पाहिजे. १००८ आम्रवृक्ष एकत्र एकाचवेळी मोजून बघणे. पथ्य-पुन्हा मान-डोळे-बुबुळे-शरीर कुठल्याच प्रकारे न हलविता-नी सरळ एका रेषेतील नव्हेत तर चौफेर पसरलेले हे आम्रवृक्ष, जर मोजिता आले, तर सर्व पिढ्यांत एक चक्रवर्ती सम्राट होतो. म्हणजे प्रत्येक पिढीत एक असा. तुळशीच्या वनामध्ये आपल्या उपास्य दैवताची अचानक भेट घडणे. नी ते तुळशीचे वन केवळ पर्णयुक्त असावे. मंजिऱ्या नसलेले. कुंद सुगंधयुक्त-शीतल अशा वनात आपल्या उपास्याची भेट अचानक अकस्मात, नी आपण श्रीसदगुरु वियोगाने तळमळत असता, दर्शन-पूजा-अर्चन-वंदन हेतू उत्कंठीत असता-घडली, तर त्या

सेवकाचे तारुण्य-युवादशा कायम राहाते. म्हणिजे त्यास शरीरवस्त्र बदलावे लागतेच. चिरंजीवित्व नव्हे. पण असेतोपर्यंत त्याचे तारुण्य कायम राहते. थोडक्यात जीव ताजा राहतो. कारण ताजे रहाण्याचे, स्वतःस टिकविण्याचे ज्ञान हे त्या अत्यंत उत्कट




तळमळीतून प्राप्त होत असते, होते. हे समजून घेणे खूप महत्वाचे आहे. कारण आपण बऱ्याच वेळेस पौष्टिक पदार्थांमधून ही शक्ती प्राप्त करुन घेण्याच्या मागे लागतो. नी ती कशाने प्राप्य आहे बघा. विचार-शोध हा झालाच पाहीजे. भ्रांत-भ्रामक तर्कांनी बुध्दी इतकी खाली, निम्न स्तरावर उतरलेली असते, की या अतिशय उच्चस्तराच्या गोष्टी-आपल्या हिताच्या गोष्टी म्हणून तरी अतिशय शांतपणे त्या समजून घेतिल्या पाहिजेत. १२ आदित्य. २१ शशी. ३ रोहिणी. २ मृगशीर्ष. १ ब्रह्मकवच असे दिसणे, बघणे हा ही संगम भागच होय. अष्टवसु म्हणिजे एका गोलाचे वेळी ८ तारका एकत्र दिसणे. हा योग पौर्णिमा किंवा अमावास्या याचदिवशी बहुतांश असतो. कोजागिरी म्हणिजे अश्विनपौर्णिमा-कार्तिकीपौर्णिमा-मार्गशीर्षपौणिमा-फाल्गुनपौर्णिमा-चैत्रीपौर्णिमा-आषाढपौर्णिमा यादिवशी व माघीअमावास्या-पौषीअमावास्या-भाद्रपदअमावास्या-वैशाखीअमावास्या या दिवशी हा योग दिसू शकतो. पहाटे, आपल्या वेळेनुसार २ ते २.४५ एवढ्याच वेळात आकाशस्थ परिसरात कुठेही हे उद्भवतात. जागा ठराविक नाही. म्हणूनच उद्भव सांगितला. या वसूं मध्ये जो बलवान तेजस्वी दिसतो, तोच ज्ञाडेय. होय. महावीर्यवान आठवा वसु-श्रीपितामह भीष्म. श्रीगंगा व श्रीशांतनु यांचा कारक पुत्र. हे अष्टवसू साधारण असे दिसतात-चमकतात. चित्रात हे दर्शविले आहेच. यांचे दर्शनाने आपल्या मस्तकावर एक वेगळाच तेजोगोल येतो. नी बुध्दीच्या काही कक्षा, जशा उपासना-

साधना-सत्संग-श्रीसाधूसंतांची सेवा-श्रीगुर्वादेश पालन-श्रीगुरुसेवा-सर्व नीती-नियमांचे शास्त्रमार्ग धर्मानुसार आचरण-प्रामाणिक आचरण-शुध्द अंतःकरण-न्यायी नी वैश्विक धर्मनिष्ठता-सर्वांबाबत आदरभाव-चर-अचर सृष्टिविषयी वात्सल्य, अशा अत्यंत सद्‌गुणधारी उच्चजीवांस या दर्शनाचा अतिशय विशेष असा लाभ आहे. सामान्यजनांना हे दर्शन शुभफलदायी असते. त्यांची कामे होतात. बहुगुंत्यांची कामे उकलतात. हे सर्व सद्‌गुण आपल्या अंगी आहेतच. फक्त विशेष यत्नाने ते आपणांस आत्मसात करावे लागतात. नी यासच श्रीगुरुकृपा आवश्यक ठरते. कारण माणूस एकवेळ अंगमेहनतीची कामे करु शकेल. परंतु ऐक्य-प्रेमळपणा-निष्ठा हे असे भाव कायम ठेवून सतत सद्‌गुण आश्रय तो सातत्याने करु शकत नाही. या सातत्यासाठीच त्यास पाठबळ लागते. नी आपल्या जवळच्यांचे जवळही ते नसते. कारण तेही चाचपडतच असतात. अंदाज घेतच जगत असतात. नी आपल्या बऱ्यावाईट अनुभावांनुसार जगाचा नकाशा बनवून इतरांस सांगते होतात. नी यांचे जग म्हणजे तरी काय, तर यांच्या खिडकीतून दिसणारे आकाश. एवढाच मर्यादीत परिसर. जग नी

## अष्टवसुंची मुखावरील रचना

वाम मध्य सव्य



जगन्नायक या असीम नी व्यापक अशासुत्रास जाणावयाचे तर त्याच व्यापकतेचा कुठेतरी स्पर्श हवा. नी तेच श्रीगुरुअंजन होय. म्हणूनच अशा तुटपुंज्या गोष्टींवर येणारे अनुभव हे सर्वथैव सर्वांच्या काय उपयोगाचे? नी हे अनुभव ऐकून जर आपण जगाकडे पाहण्याची दृष्टी बनवित असू तर? तर पुन्हा नैराश्यच नां. नी जगाकडून नैराश्याशिवाय काही लाभले नाही, असे जीवास वाटायाला लागले तर मग त्यास जबाबदार कोण? वास्तवात जग असे नाही, नाहीच. फार सुंदर आहे हे. परंतु आपले सार्‍यांचेच भ्रांतिरुप जगणे होत असल्याने म्हणिजे जसे श्रीसूर्यदेव पश्चिमेस गेल्यावर पुर्वेस अंधारते त्याप्रमाणे. नी अंधार म्हणिजेच भ्रांति. म्हणिजेच स्पष्ट न दिसणे. याप्रमाणे जग दिसते नी नैराश्य येते. हे नैराश्य म्हणजे मळभच समजावे. की जे ज्ञानरुपी श्रीसूर्यांचे आगमन झाल्यावर उरणार नाही. राहणार नाही. नाही..नाही..नाहीच. पश्चिमेचा मावळला तोच पूर्वेकडे आला, असे श्रीमहाराज सांगतात. तिकडे मावळलेला आहे. इकडे उगवलेला आहे. इकडे सारे उद्‌भव आहेत. हे विसरायचेच नाही. यातच उत्साह-आनंद-ताजेपणा सामावलेला आहे. म्हणूनच पूर्वीच्याकाळी श्रीऋषि-मुनींनी या युतींमधील तो आनंद अनुभवून आपणांस सांगितला नी आपल्याही वाड-वडिलांनी या सर्व गुणलक्षणांचे महत्व जाणिले नी आपल्या कुळपरंपरा घडविल्या त्याही याच कारणाने. की या आकाशस्थ युतींचा म्हणजेच या सर्व संगमांचा आपणास लाभ करुन घेता यावा म्हणून. भले आपणास ते दिसोत अथवा न. परंतु त्या छत्राखाली काही तर प्राप्त होईल हा हेतू. आता आधुनिकतेच्या नावाखाली सारेच काही धाब्यावर बसविल्यामुळे इतके सहज-सोपे-सुंदर सारे आता अशक्य नी अवघड वाटायाला लागले आहे. हे सारे सांगण्याचा श्रीसमर्थांचा हेतू हाच की, हे आहे..हे आहे..हे आहेच आहे. याचा अभ्यास करा-हे प्राप्त करा. ही सारी पृथ्वी-अवनी-वसुंधरा आपणा सर्वांचीच आहे. केवळ पृथाच नव्हे, तर सारे ब्रह्मांडही आपलेच आहे. एखाद्या तुकड्यासाठी भांडणे-एखाद्या गोष्टीने महासंघर्षाची तयारी करणे. एखादी गोष्ट मिळाली म्हणून गर्व करणे. इतरां तुच्छ लेखणे. एखादी गोष्ट नाही मिळाली म्हणून मत्सर-द्वेष करणे. अहंकार-ताठा-अभिमानाने 'मीपणास'

पोसणे. केवळ पैसा यापलिकडे कशातच सुख नाही असे मानणे हे अज्ञान आहे. हा अंधार आहे. ते पैशाव्यतिरीक्त कशात असेल असा किमान विचारही न करणे. नी अनंतजन्मांच्या पुण्यजोडीने प्राप्त असा नरजन्म आपणांस लाभला आहे. याकडे कुणाचेच लक्ष नाही. याचे कुणासच गांभीर्यही नाही. श्रीसमर्थांची तळमळ केवळ हीच की जीवास-आपल्या बाळास हे सारे समग्रज्ञान व्हावे. त्याने जाणावे की हे मी काय त्यास बहुमूल्य असे दिले आहे ते. म्हणूनच ग्रं या अक्षराने श्रीग्रंथराजाची सुरुवात करुन श्रीसमर्थ सांगतात-

माझी काया आणि वाणी। गेली म्हणाल अंतःकरणी।
परी मी आहे जगज्जीवनी निरंतर ।।
आत्माराम दासबोध। माझे स्वरुप स्वतःसिध्द।
असता न करावा खेद। भक्तजनी ।।
नका करु खटपट। पहा माझा ग्रंथ नीट।
तेणे सायुज्याची वाट। गवसेल की ।।

कुठल्या वाटेस आपणांस नेत आहेत, तर ज्या वाटेस ही सारी शुभफले आहेत त्या वाटेस. स्वये मार्गस्थ होता प्रभुरामराजा..हनुमंत ठेवीला मागुती याच काजा..जीवीचे परमसूत्र जीवासी द्यावे..श्रीरामराम हे सूत्र ह्दयी धरावे. श्रीमहाराजही सांगतात, मी गेलो ऐसे मानू नका। भक्तीत अंतर करु नका। कदा मजलागी विसरु नका। मी आहे येथेच ।। येथेच म्हणिजे भक्तीपंथात. याच शुभफलदायी अशामार्गात. ही तळमळ ही आत्यंतिक तळमळ एकाच ह्दयातून येणार नी ती म्हणिजेच ही **श्रीत्रयी**. आपले उपास्य श्रीमहाबलीअंजनीकुमार-श्रीसमर्थ-श्रीश्रीगजाननमहाराज हेच ते परमसूत्र. एक-ऐक्यह्दय. आपले माहेर-आपले सच्चिदानंदधाम. श्रीदासमारुती-कपिवरमहाबली-जीवनमुक्तसाधूवर-महद्‌भूतईश्वर अशी ही द्विविधा. फुटाणे-शेंगदाणे-वाफविलेले पदार्थ यांमधून ही शक्ती धगधगते. निसर्ग-पहाटदृश्ये-उगवता सूर्य यांमध्ये-या सान्निध्यात ही आनंदते. प्रसारीत होते. प्रसरण पावते. म्हणूनच केवळ सरिता संगम नव्हे, तर हा सारा संगमच शुभ व मंगलकारी आहे. एकूण सारे संगमच हिच्या आधीन आहेत. किंबहुना सारे

संगमच इच्यामुळे होतात. पति-पत्नी-पुत्र-संधी-योग-विवेक-जाण-ज्ञान-वैराग्य-जन्म-गृह-कुळ इत्यादी संगम इजमुळे प्राप्त होतात. नाहीतर माणसाची अवस्था एक आहे तर एक नाही अशी. दात आहेत तर चणे नाहीत अशी. असे होऊ नये हीच तळमळ श्रीसंतांना, श्रीसमर्थांना आहे. तेवढी जाणिली तरी आपली हृदये एक होतील. सर्व चतुर्थीयोग-चतुर्थयोग, जसे ४ मुक्ती-४ धाम-४ योग इत्यादी सर्व. योग इजमुळे आहेत.

**२१ पेडी वेणीचे महत्व**-अशी ही वेणी मधील मधल्या पेडाची गुप्तबाजू. ही द्विविधा होय. वामभागी-त्रिधा शक्ती व सव्यभागी-मेधा शक्ती या दोहींमधून वहन करणारी उर्ध्वा-उर्ध्वगामिनी जीस श्रीगंगा-श्रीयमुना-श्रीसरस्वती असे आपण संबोधतो. यांमधील श्रीसरस्वती हे संबोधन या द्विविधेस आहे. ती ही द्विविधाशक्ती होय. येथे या आकृतीत शक्तींचे आपण २१ च पेडांचे हे किमान सूत्र दाखविलेले आहे. वास्तवात १०८-५०८ पेडांपर्यंत हे आहे. नी त्यापुढेही कितीएक ते असतील असे ते. आपणांस सर्वच गोष्टी किती सहजप्राप्त नी भाग्याच्या होत्या बघा. आता १-२ पेड तरी येतील की नाही वेणीचे कोण जाणे. पूर्वी कोकण हा भाग कुंतल या नावाने ओळखला जायचा. तेथील स्त्रियांची उंची म्हणिजे एकूणच आपल्यापेक्षा, खूप वर्षांपूर्वीच्या लोकांची उंची भरपूर असे. आता आभाळच खाली आल्यामुळे उंची कमी झाली. आता ६ फूट उंची सुध्दा आपणास सध्याच्या काळात आश्चर्यकारक वाटते. तेव्हा ६ फूट म्हणिजे बुटका समजत असत. आता पुन्हा ही गोष्ट, नाहीच्या स्तरावर नेऊन, असे कसे असेल? हे कसे शक्य आहे? या वर्गात नेऊन बसवू नये. आपण नाही पाहिले ते नसेलच, ते नाहीच, असे समजणे हेच तर अज्ञान आहे. नी अज्ञानवश जीव खऱ्या सुखापर्यंत पोहचूच शकत नाही. तो याचमुळे. नी श्रीसमर्थ सांगतात-मनाची शते ऐकता दोष जाती। मतीमंद ते साधना योग्य होती । चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगी। म्हणे दास विश्वासता मुक्ती भोगी ।। विश्वासले तर काय प्राप्ती आहे बघा. छोट्या-मोठ्या समस्या तर सोडूनच द्याव्या. पण आपल्या मुक्ती-मोक्षाचीही चिंता आटोपलीच समजा. काय सुंदर आयुष्य होईल विश्वासिल्यायोगे बघा. तर्क करुन काय

## स्त्रीचे उमास्वरुप-त्रिपेडी वेणी- त्रिधा,द्विविधा,मेधा शक्तींचा त्रिवेणी संगम

वाम बाजु-त्रिधा

सव्य बाजु-मेधा

शलाका म्हणजे, वेणी घालण्याकरीता पेड जिथे प्रथम जुळविले जातात,ती खोच- -प्रथम भाग जिथून त्रिभाग घेतात,ती जागा- -फूल- वेणी, गजरा माळण्याची जागा → शलाका

मध्या-उर्ध्वा अशीही द्वीविधा-मधला पेड

१ — १ आरंभ

चंद्रकला-कृष्णपक्ष २ — २ चंद्रकला-शुक्लपक्ष

३ — ३ संकेत → ललाट, जीयबिंदु, भाग्यरेखा

४ — ४ शित

५ — ५ पुज्य — दुर्वास्वरुप

६ — ६ सरोवर

७ — ७ अमृत

८ — ८ बिंदु

९ — ९ वहन

१० — १० गहन

११ — ११ पूर्णा

१२ — १२ श्री

१३ — १३ मुक्ता

१४ — १४ ऱ्हुं

१५ — १५ श्वेत

१६ — १६ युक्ती

१७ — १७ सप्त

१८ — १८ अष्ट

१९ — १९ तृतीया

२० — २० मिलन

२१ — २१ कलश

— द्वीविधा

— द्विविधेची गाठ-



या प्रकारची

केसांची पेड संपल्यावर मारलेली गाठ

**अत्यंत शुभदर्शी - फलदायीनी २१ पेडी वेणी**

होईल..?तर काही कृतीत-काही बाबतीत आपण हुशार आहोत असे समजले जाईल. पंडीत-विद्धान आहोत हे सिद्ध होईल. वादात कोणी आपला हात धरु शकणार नाही असेही होईल. भरपूर छायाचित्रे-मानपत्रे-अनेक पुस्तकात नोंदी-बक्षिसे-भरपूर पैसा-मान-सर्व जगच मानेल असे नाही, परंतु मानणार नाही असेही नाही. कुठेही गेलो तरी आपणांस ओळखतील. पुढे मागे माणसे असतील. गाड्या-चकचकीत आयुष्य-सर्व आराम, बस्स! परंतु या साऱ्यात आंतरिक सुखाच्या जागा कुठे आहेत-आहेत का? शांत-तृप्त-समाधानी-पावलो-धन्य झालो, असा भाव प्राप्त होईल का या साऱ्याने? या अशाच आयुष्याची मग सवय होऊन जाते नी ते तसे नाही मिळाले तर पुन्हा नैराश्य घेरते. उंचीवरुन उंचीच-उच्चीचेच असे होताना दिसत नाही. नी उंचीवरुनही पतन होण्याचा धोका यात राहतोच. नी मग या साऱ्यानंतर पुढे काय? तर, सगेसोयरे डोळे पुसतील..पुन्हा आपुल्या कामी लागतील..उठतील-बसतील-हसूनी खिदळतील..मी जाता त्यांचे काय जाय? ही वास्तवता-हे वास्तव चित्र बदलणार आहे का? हे अगदी अलीकडील काव्य आहे. कलियुगाच्या ऐन बहरातील काव्य. किती बोलके नी स्पष्ट आहे हे. नाही श्रीसंत सांगतात ते पटत, परंतु हा तर आपल्यातीलच एक सांगतो आहे नां. ते केवळ गाणे नव्हे. तो एक ज्वलंत अनुभव आहे. अंतस्थ समाधानाचे-आनंदाचे-ऐश्वर्याचे झरे याने प्राप्त नाही व्हावयाचे. हे सारे अहंकाराचे पोषण आहे. वृध्दपणी जीवाची काय अवस्था होते ती ज्याची त्यासच ठावकी. म्हणून तात्पुरते-तात्कालिक फल न पाहता, चिरंजीव-चिरकाल-अनंतजन्मींपर्यंत टिकणारा वृक्षच लावा. आपणांस नेमकी जी हवी तिच-तशीच नी तेवढीच फले देणारा वृक्ष लावा. परंतु अभ्यास असू द्या त्यामागे, की पृथ्वीवरती आंबट-तुरट-गोड अशा चवीच्या फळांसाठी वेगवेगळी बीजे आहेत. नी आपणांस या सर्व चवी एकत्र हव्या आहेत, तर कोणता वृक्ष लावावा? त्याचे काय बीज आहे? कसे लावावे ते? माती-सिंचन, या साऱ्याचा अभ्यास असू द्या. असे श्रीसमर्थ आपणास सांगत आहेत. नी शिवाय ज्या गुणांचे वर्णन आपण द्विविधाशक्ती वेळी केले ती सारी गुणखाण, तो सारा गुणसमुच्चय नी

निरंतर विवेक-ज्ञान-जाणिवेची परमावधी. अभ्यासाची आवडी नी विनयाची गोडी. विश्वास-श्रध्दा-निष्ठेची तातडी. भक्तीची पायरी. नी प्रेमाची वरकडी असल्याशिवाय हे ज्ञान-हे सारे आपलेच आपणांस प्रचितीचे कक्षात घेता येणार नाही. त्याकरीताच तर ही सारी तळमळ आहे. ही ग्रं ची उकलही त्याचकरीता आहे. की आपुले स्वरुप कळावे-उमगावे-आवडावे. आपल्याला आपल्यासाठीच दर्पण दाखवावा लागतो. असे हे झाले खरे. परंतु हे सारे ज्ञान सत्य आहे. स्पष्ट आहे नी उघडही आहे. गुप्त काही नाही. फक्त प्रगट करावे लागते. त्यासाठीच.हा सारा विधी श्रीसमर्थ, दिनाचा दयाळु..मनाचा मवाळु..स्नेहाळु कृपाळु..जनी दासपाळु.. हे आपणांस आपल्या हितार्थ सांगत आहेत. आपणास ही २१ पेडी वेणी आपल्या बुध्दीकक्षात आणावयाची असल्यास, श्रीफळ म्हणिजे नारळाचे झाड-त्याची उंची, त्याचे पेड-किंवा वडाच्या पारंब्या-परीसांबी-परसांब-प्रसांब-बिंबि, अशा बहुविध नामाभिधानांनी युक्त अशी वडाची पारंबी बघावी. किती पेड येतील त्या पारंबीचे? म्हणून आपण तर्क किंवा असत्य किंवा हे सारे नसेल, नाही, असे म्हणून नाकारु नये. अमर्याद-असीम अशा या जगत्रयात सारे उपलब्ध आहे. आपणांस ते माहितही आहे. फक्त विसरलो एवढेच. नी त्याच्या प्राप्तीसाठीची परिस्थिती ते वातावरण आता आपणच ठेविले नाही. राखीले नाही. स्वये कष्टण्याची सवे-सवय गेली. नी मधेच आळसाने गाठले. नाहीतर कासव निघालेच होते हो शर्यत जिंकायाला. पण मधेच भित्रा ससा आला सांगातिला. नी लागली निद्रा त्याचे साន्निध्याला. नी बुडविले हो अमुच्या निद्रेनेच आम्हाला. अशी अवस्था. जसे वेणीच्या पेडा संदर्भात आपण येथे वटवृक्षाचे उदाहरण पाहिले. परंतु आता पुढे पुढे तर उदाहरणासाठी तरी ही वृक्षराजी राहतील की नाही कुणास ठाऊक. वृक्षवल्ली आम्हा सोय रे वनचरे । पक्षी ही सुस्वरे आळविती। हे श्री तुकाराममहाराजांनी निसर्गाचे केलेले प्रसन्न वर्णन आता कुठे दिसते का? हे वर्णन सोळावे शतकातील आहे. फार लांबचे नाही हे. नी आता बुध्दी इतकी कठिण झाली आहे, केवळ लग्न-मुंज-डोहाळं-बारसं-बाराव्यात स्वतःला वेढून बसलेली बुध्दी, याचा काय अर्थ घेते, तर, हे वृक्षवल्ली आमुचे सोयरे आहेत. म्हणिजे

वृक्ष हे व्याही-सोयरे अशा अर्थाने. काय म्हणावे बघा या बुद्धीस? म्हणून ज्ञान घेतांना श्रीसरस्वतींच्या, श्रीगुरुंच्या पायाशीच बसावे. जसे वृक्षावर उमललेली फुले-फळे देखील वृक्षाच्या पायाशी पडतात. तसे नम्रतेने-त्या भावनेने श्रीगुरुचरणी बसावे-असावे-वसावे-सेवावे-प्रार्थावे. सृष्टीत सर्वत्रच दासभाव आहे. मुळात ही सारी सृष्टीच त्या श्रीस्वामीरामांची दास आहे. श्रीसमर्थ सांगतात, रामदास्य करुनी पाहे। सर्व सृष्टी चालताहे। रामी राम तो चि दास। भेद नाही त्या आम्हात। नी हे दास्य आपणास कळण्याकरीताच श्रीअंजनीकुमारमहाबलीश्रीहनुमंतांना-श्रीरामरायांनी मागे ठेवले. नी चिरंजीवपदी बैसविले. तयांस ते चिरंजीव सिंहासन दिधले. बघा-स्व धामासी जाता महारामराजा। हनुमंत तो ठेविला याचि काजा। सदा सर्वदा रामदासांसी पावे। खळी गांजीता ध्यान सांडोनी धावे।। असे हे चिरंजीवश्रीकपिवर आपणांस भेटावेसे वाटत असतील, तर रामदास्य आवश्यक नाही का? जे आवडे जयाला ते द्यावे तयाला, असे श्रीमहाराज सांगतात. श्रीसमर्थ सांगतात. नी श्रीसमर्थांना जर रामदास्य आवडते. नी त्यातूनच जर जीवास महद्प्राप्ती होणार आहे, तर मग आता विचार कसला करावयाचा? आता आचरणातच हे सारे आणावयास हवे. नी तेही पूर्ण विश्वासाने. या सर्वांविषयी आपणास थोडा थोडा विचार करावा लागेल. हे सारे जे आपण पाहत आहोत ते त्रिधा-मेधा-द्विविधाशक्ती बाबतचे पाहणे आहे. या साऱ्याचा पूर्ण विचार हा एक वेगळा विषय होईल. म्हणून थोडे थोडे याविषयी आपण जाणून घेऊ. **श्रीवेणीपेडातील प्रथमशक्ती-पहिले पेड** शेजारील चित्रात बघा, १०१ अशी ही द्विमुखी येथे तयार होते. या साऱ्या शक्ती आहेत. पाठीच्या कण्यावर बरोबर




१ ० १ हे कोन स्कंधाकडे शक्ती पाठवतात. द्विविधेची शक्ती ही सतत उर्ध्व असते. मेडस्वरुप असल्याकारणाने त्रिधा-मेधा यांची एकत्र गुंफण यात होते.

आरंभ

मधे, ही वेणी येण्याची पध्दती आहे. श्रीमहानंदींचे जिथे वशिंड असते, त्याचपध्दतीने हे आहे. पहिल्या शलाका, म्हणिजेच वेणी घालण्यासाठी सर्वप्रथम आपण पेडांची जेथे विभागणी करतो ती जागा होय. शक्तीचे बीज वहन करणारी ही जागा आहे. या शलाका भागानंतर लगेचच हा भाग-हा पहीला पेड येतो. तो बरोबर मानेच्या पहिल्या मणक्याजवळ येतो. मणक्यावर-इडा-पिंगला-सुषुम्ना यांचे वहनमार्गावर हा येतो. परंतु ही त्रिधा-मेधा-द्विविधाशक्ती गुप्त आहे. ती दोन खांद्यांच्या बरोबर मधे, माने मागे जो फुगीर भाग आहे तेथे ही वेणीस्वरुपातूनच प्रगट होणारी आहे. या २१ पेडांकरीता येथे उंची भरपूर गृहीत धरावयाची आहे. तेव्हाच हे समजेल-समजणार आहे.

..३ या संख्येचा प्रारंभ..

आता येथून म्हणजे त्रिधा-मेधा-द्विविधा यांपासून तीन या संख्येस आरंभ होतो. शरीराचे इतर पुढचे जे भाग आहेत, ते एकदम दोन या संख्येने सुरवात होतात. जसे दोन डोळे-दोन कान-दोन ओठ इत्यादी. तसे हे मागील पेड तीन या संख्येस आपणांस भेटवितात. या पेडांपासून ते तीन सुरु होतात. या पेडाचा आरंभ म्हणिजेच तीन या संख्येचा आरंभ होय. या तीनाचा आरंभ अक्षयतृतीये पासून होतो. म्हणजे त्यादिवशी वेणी घालावयाची असे नव्हे, तर ३ या संख्येची उत्पत्ती या पृथ्वीवर अक्षयतृतीयेच्या दिवशी झाली. आपला आरंभ श्रीब्रह्मा-श्रीविष्णु-श्रीमहेश्वर या त्रिशक्तींचे मुळापासून झालेला आहे. सत्व-रज-तम अशी आपल्या स्वभावाची विभागणी आहे. अध्यात्मिक-अधिभौतिक-अधिदैविक या त्रिविध तापांची आपले तापत्रय म्हणून विभागणी आहे. बाल्य-तारुण्य-वार्धक्य ही आपल्या शरीराची विभागणी आहे. जन्म-जरा-मृत्यू ही आपल्या अवस्थांची विभागणी आहे. संचित-प्रारब्ध-क्रियमाण ही आपल्या कर्मांची विभागणी आहे. जड-मंद-बद्ध ही आपल्या दृष्टीची विभागणी आहे. मुमुक्षू-साधक-सिद्ध ही आपल्या बुद्धीची विभागणी आहे. शोक-मोह-दुःख ही आपल्या अंधाराची-तमाची-अज्ञानाची विभागणी आहे. हर्ष-आनंद-उत्साह ही आपल्या दिवसाची विभागणी आहे. रक्षण-पालन-संवर्धन ही आपल्या कर्तव्याची विभागणी

आहे. कुटुंब-संसार-प्रपंच ही आपल्या कसोटीची विभागणी आहे. कलह-कपट-निंदा ही आपल्या धाडसाची विभागणी आहे. वियोग-विरह-प्रतिक्षा ही आपल्या भोगांची विभागणी आहे. घात-अपघात-समस्या ही आपल्या पापाची विभागणी आहे. वीरता-शौर्य-प्राण ही आपल्या धैर्याची विभागणी आहे. दया-क्षमा-शांति ही आपल्या पूर्णतेची विभागणी आहे. आदर्श-ध्येय-धारणा ही आपल्या शक्तीची विभागणी आहे. चैतन्य-सेवा-सत्संग ही आपल्या भाग्याची विभागणी आहे. तीर्थ-क्षेत्रे-दान ही आपल्या समाधानाची विभागणी आहे. श्रद्धा-भक्ती-निष्ठा ही आपल्या गुणांची विभागणी आहे. ज्ञान-जाणिव-विवेक ही आपल्या अमृताची विभागणी आहे. वैभव-ऐश्वर्य-श्रीलक्ष्मी ही आपल्या निःस्पृह अंतःकरणाची विभागणी आहे. शांति-तृप्ती-निवृत्ती ही आपल्या विधीची म्हणजेच ब्रह्माक्षरांची विभागणी आहे. अनुग्रह-श्रीगुरुप्राप्ती-श्रीगुरुनाम ही आपल्या पुण्यबलाची विभागणी आहे. अशी ही आपल्या श्रीत्रयींची विभागणी आहे. अशा या श्रीब्रह्मा-श्रीमहेश-श्रीविष्णू शक्तीने-या मुद्रेने-या बंधाने आपणांस संयमन शक्ती प्राप्त होते. क्रोध-मोह-लोभ या अती जलद तसेच तीव्रतेने वहन होणाऱ्या गोष्टींवरही संयमन करता येण्याची शक्ती याने प्राप्त होते. केस व नखे हे चिरंजीव व नीत्य वृध्दींगत होणारे आहेत. यांस रोग-व्याधि होत नाही. असे हे निरोगी वहन आपल्याजवळ आहे. म्हणून एखाद्या गोष्टीचे शेवटचे टोक या दृष्टीनेही या नखांबाबत आपण निर्देश करीत असतो. आपली असे म्हणण्याची पध्दती आहे की, आता नखातही रोग राहिला नाही. नखं, हे शुद्धतेचे शेवटचे प्रमाण आहे. तसेच केस हेही. म्हणूनच यांस आरंभ म्हंटले आहे. कशाचा आरंभ तर सात्विकतेचा-आनंदाचा-सच्चिदानंदाचा. नी हा कधी होईल तर क्रोध-मोह-लोभ या त्रयींच्या संयमनानेच. यांवर विजय मिळविल्यानेच. कारण क्रोधात अहंकार. मोहात मन. नी लोभात चित्त नाश होतो. म्हणून आपल्या ग्रं च्या आरंभी या शक्तींचा आपण उपयोग करून घ्यावयाचा आहे. म्हणून पूर्वीच्या काळी केस कापण्याऐवजी वाढविणे-जोपासिणे नी शेवटपर्यंत काळे राखणे जमू शकत होते. अभ्यास हवा. हे कोन दोन्ही स्कंधांकडे हिच आरंभशक्ती पाठवितात.

नी त्यांच्यामधील शक्ती यांचे दर्शनानी वाढवितात. श्रीपांडुरंगांची कटीवरील हस्त, ही मुद्रा येथे कोन स्वरुपाबाबत नेहमी ध्यानात ठेवावी. कायम लक्षात ठेवावी.

**श्रीवेणीपेडातील द्वितीयशक्ती-दुसरे पेड.** आता वेणीतील दुसरा पेड आपण बघू या. एक बिंदु म्हणजे शुक्लपक्ष-दुसरा बिंदु म्हणजे कृष्णपक्ष. या प्रत्येकाची पंधरा-पंधरा पदे आहेत. पदे म्हणिजे प्रत्येक पक्षाचे १५ दिवस. बघा, शुक्लपक्ष म्हणजे वृध्दी. नी कृष्णपक्ष म्हणजे समृध्दी. यात आपणास समजावे म्हणून असे म्हणता येईल की, पोळी जी लाटतो, तो शुक्लपक्ष. पोळी लाटत लाटत तिचा गोलाकार करणे, म्हणिजेच पूर्णचंद्र आकार करणे. नी नंतर ती पोळी एकेक तुकडा करुन भक्षण करीतो ती समृध्दी. कारण लाटणे ही वृध्दी आहे. वाढ आहे. परंतु खाणे ही समृध्दी आहे. तृप्ती आहे. या न्यायाने या दोन्ही पक्षांकडे आपण पहावे. असे श्रीसमर्थ आपणास सांगत आहेत. आता या पक्षांची १५-१५ पदे कशी ते बघूया. यामधे १ ची १५ पावले येतात. म्हणजेच १ हा आंकडा १५ वेळा घ्यायचा.१११११११११११११११ अशा पद्धतीने हा घेतल्यावर आपणांस पौर्णिमेचे दर्शन होते. म्हणजे प्रतिपदेत एका दिवसाने वाढ झाल्यावर द्वितिया येते तसे. एक एक करीत वाढतात तसे. आपली वाढही या एकेकपदानेच होत असते. हे बरेच मोठे गणित आहे. थोडे थोडे बघूया-ही १५ संख्या पाहण्याकरीता जीवास खूप खटाटोप करावा लागतो. नी तो एकट्याच्याने आटोपणारा नाही..नाहीच. सामर्थ्य आहे चळवळीचे..जो जो करील



तयाचे..परंतु तेथे भगवंताचे..अधिष्ठान पाहीजे..ही श्रीसमर्थ उक्ती येथे आपणांस पटेल. बघा १५ या संख्येकरीताचा खटाटोप-आपण २ या संख्येची अशी जोडी केली, २ह्न२ह्न२ह्न२ह्न२ह्न२ह्न२=१४ तर ही संख्या १४ पर्यंतच येते. म्हणिजे ही पंधरवड्याची ७ पावले येतात. ३ या संख्येची अशी जोडी येते, ३ह्न३ह्न३ह्न३ह्न३=१५ अशी ही तीनची ५ पावले येतात. चाराची बघा-४ह्न४ह्न४=१२ म्हणजे चाराची तीनच पावले येतात. ५ या संख्येची ५ह्न५ह्न५=१५ अशी ही पाचची ३ पावले येतात. ६ह्न६=१२ अशी सहाची दोनच पदे मिळतात. नी ७ह्न७=१४ नी साताचीही दोनच पदे मिळतात. पुढे ८ या संख्येपासून हे गणित जमत नाही. ते येतच नाही. जसे ८ह्न८=१६ असे ते ८ पासून पुढे सरकते. म्हणून आपल्या वाट्यास सप्तवार-सप्ततीर्थ-सप्तसागर-सप्तनद्या-सप्तपुऱ्या-सप्तपदी-सप्तजन्म इत्यादी सातांचे प्रमाणातच सारे आले. यात ही अष्टमी, हे ८ म्हणिजे, श्रीगर्भात श्रीचैतन्य याच, ८ व्या महिन्यातच प्रवेश करीते. अष्टमी म्हणिजे घागर फुंकणे-वन्ही चेतविणेही आहेच. ९ नवमी म्हणिजे भूमंडळ अवलोकनार्थ जीवितकार्य हेतू प्रेरणास्वरुप जन्म होय. १० दशमी म्हणिजे कर्तृत्वसिध्दी-स्वओळख. ११ एकादशी म्हणजे जाणता-ज्ञानी-त्यागी-सम असा जीव. १२ द्वादशी म्हणिजे बारसं ते बारावं परिक्रमा पूर्ण. त्रयोदशी ही शक्यतो पार्थिव जीवास बघता येत नाही. बारावयातच आटोपलेले असते. १३ वे कोण पहातो ? अनुक्रमे चतुर्दशी

जीवाची कुर्मगती




५ गुणिले ३ अशा पंधरवड्याचे हे ५ भाग तिन्ही देवांची शक्ती नी पंचमहाभुतांची शक्ती या आकारात एकवटलेली आहे. या स्वरुपाचे समुद्दर्शन जीवास शुभ आहे. यासच श्रीमहाराज कान्होला म्हणतात.




४+१=५

२+३=५

जीवाच्या मस्तकाचे हे चार भाग असतात. पाचवा भाग गुप्त असून तो ज्ञानानेच प्राप्त करावा लागतो. येथे जीवाचे फलस्वरुप कर्म-भोग-संचित-प्रारब्ध एकुणच जीवनयात्रा विभागलेली असते.

ही नाहीच. म्हणून पौर्णिमेस वृध्दी म्हंटले आहे. हे सारे जाणून घेत घेत जीवाने वाढायाचे आहे. ज्ञान एक एक करीत घ्यावयाचे आहे. यात सर्वात महत्वाची जोड म्हणजे ३ नी ५ ची. ३ नाचे ५ भाग म्हणजे १५. नी ५ चे ३ भाग म्हणजे १५. आता ३ नाचे ५ भाग कसे ते बघूया. खालील चित्रात दर्शविलेले हे ते ५ भाग होत. जो यात कोनाचा संधीभाग आहे तो म्हणिजे ३ होय. नी पोकळीचा भाग यात जो आहे तो २ होय. नी मधला भाग १ होय. अशी ही मांडणी होईल. यात १-२-३ हे वेगवेगळे कसे धरावयाचे, तर आतील १ व पोकळीतील २ यांची जोड म्हणिजे ३. याप्रमाणे ३ नाचे ५ आहेत. ३+२ ही ५ होत. आता असेच मागील चित्रात दर्शविल्याप्रमाणे ५ चे भाग बघू या. यात फक्त चारच भाग आपल्याला दिसतात. कारण ५ वा भाग यात गुप्त स्वरुपात आहे. तो ज्ञानरुपात ज्ञानानेच प्रगट होतो. नी तेव्हाच जीवाची खरी रंगपंचमी होते. म्हणून या गुप्तपंचमीकरीताच चतुर्थीचे-संकष्टी चुतर्थीचे व्रत करावे लागते. यात थोडेसे प्रगट, म्हणिजे जोड करुन प्रगट करावयाचे तर बघा. एकास म्हणिजेच जीवास च्यारीवाणि-च्यारीमुक्ती मिळविता आल्या पाहीजेत. नाहीतर द्वैत नी पंचमहाभुतां मध्ये त्यास पुन्हा ८४ लक्ष फेरे अनिवार्य. असे हे गणित आहे. म्हणूनही यास ४ चे संबोधन आहे. नी यातच तो १ गुप्त स्वरुपात आहे. तोच शोधावयाचा नी त्याचेशीच खरी रंगपंचमी खेळावयाची आहे. या पेडाने जीवास चतुर्विधमुक्ती-चौरंग म्हणजे धृवपद प्राप्ती होते. ही वेणी मानेच्या श्रीनंदीस्थानाच्या खाली येते. स्कंधाच्या खाली म्हणजे बगल किंवा कुस या भागाशी ही शक्ती प्रेरीत प्रसारीत करीते. अभ्यासे या साऱ्याची प्राप्ती जीवास होते. याच न्याये कृष्णपक्षही धरावा. चंद्र शुक्लात वाढतो तो खालून वर नी कृष्णात घटतो तो वरुन खाली असा. शुक्लपक्षी श्रीरघुवंश नी कृष्णपक्षी श्रीकृष्णवंश असे संबोधन आहेच. या दोन्ही पक्षांची शक्ती वेगवेगळी आहे. पुन्हा परमार्थात-भक्तीत-योगात-हटयोगात-ध्यानात-मुद्रेत-साधनेत-तपात-व्रतात-दानात-पुण्यात-नेमात-नियमात-अभ्यासात-संसारात या साऱ्याचा म्हणजे शुक्ल-कृष्णपक्षाचा परिणाम वेगवेगळा आहे. ज्ञान-जाणिव-विवेक-भक्ति या रसात देखील हा प्रत्यय वेगळावेगळा आहे. हे मूळसूत्र आहे याचा

बारकाव्याने विचार आपण नंतर करुया. येथे या कोष्टकाचा थोडासा भाग फक्त घेउ. १५+१५=३० असे हे १५ पदांचे म्हणिजेच दिवसांचे सूत्र आहे. या सर्व कोष्टकात + अधिक पध्दतीने गणित मांडले आहे. पहीले १ ते १५ वृध्दीचे. म्हणिजेच पौर्णिमा. नंतर १५ चा म्हणिजेच पौर्णिमेचा क्षय. म्हणिजे अमावस्या. १५ ते १ या दाहोंची मिळून बेरीज अधिक्य-हे १६ होते. १६ ची १+६ बेरीज ७ होते. पुन्हा या सर्व कोष्टकांची समोरा समोरील बेरीज १२०+१२०. तसेच १६ ची मिळून २४०. तसेच ७ ची मिळून १०५. तसेच ३९ ची मिळून ५८५. तसेच १२ ची मिळुन १८० नी ३ ची मिळुन ४५. आता यावरील संख्यांची म्हणिजेच १२०+१२०+२४०+१०५+५८५+१८०+४५ या संख्यांची बेरीज १३९५ होते. तसेच आता या १+३+९+५ यांची बेरीज होते १८ नी १+८ मिळून होते ९. असे हे आपुले नवमीसूत्र ७ वारांनी पंधरवड्याशी निगडीत असतात. अशा या अधिकातील अधिकाचा अधिक्याने शक्तीरुपाने लाभ आपणास या दोन्ही पंधरवड्यात होतो. ज्ञानरुपाने उत्कर्ष होतो. समृध्दीरुपाने फायदा होतो. शुक्ल-कृष्ण मिळून १६, १६, आऱ्यांचे हे चक्र, चंद्रांच्या १६ कलांवर आधारीत आहे. हे सारे कोष्टक चंद्राच्या सोळा कलांवर अधिष्ठीत असते. हेच चक्र जीवाच्या बोटांवर असते. चक्र व शंख असे जे अधिष्ठान असते ते याच कलांवर आधारीत-अधिष्ठीत असते. चक्र म्हणजे शुक्लपक्ष व शंख म्हणजे कृष्णपक्ष. आता यावरुन आपल्या हे निश्चितपणे ध्यानात येईल की हे पक्षस्वरुप किती महत्वाचे संक्रमण असून आपल्या नैसर्गिक लाभाचे आहे. शंख-चक्र-गदा-पद्म असे श्री महाविष्णूंचे जे स्वरुप मंडित असते, त्यातील शंख-चक्र आपण पाहीले. पद्म ही संख्या आपल्या दृष्टीने असंख्यच म्हणावी लागेल. कारण अठरापद्म वानरे. या १८ पद्मांचा इतिहास कल्पकल्प विसरला जाणार नाही. परंतु येथे या पद्मांना संख्येऐवजी संकेतात घ्यावे. पद्म म्हणिजेच कमल या स्वरुपात घ्यावे. जीव शुक्ल नी कृष्ण या पक्षांच्या मधोमध ७ वारांनी अधिवेष्ठीत असतो. पहिलेसूत्र गुणाकाराने बघू..१५x७=१०५ पुन्हा १०+५=१५ नी १+५=६, यात ६ ही अंतिम पदसंख्या होय. दुसरे सूत्र अधिक्याने बघू..१५+७=२२ पुन्हा २+२=४. चार ही अंतिम पदसंख्या

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| + | प्रतिपदा १ | द्वितीया २ | तृतीया ३ | चतुर्थी ४ | पंचमी ५ | षष्ठी ६ | सप्तमी ७ | अष्टमी ८ | नवमी ९ | दशमी १० | एकादशी ११ | द्वादशी १२ | त्रयोदशी १३ | चतुर्दशी १४ | पौर्णिमा १५ | १ ते १५ यांचे अधिक्य =१२० = १२० १+२=३ |
| | अमावास्या १५ | चतुर्दशी १४ | त्रयोदशी १३ | द्वादशी १२ | एकादशी ११ | दशमी १० | नवमी ९ | अष्टमी ८ | सप्तमी ७ | षष्ठी ६ | पंचमी ५ | चतुर्थी ४ | तृतीया ३ | द्वितीया २ | प्रतिपदा १ | १५ ते १ यांचे अधिक्य =१२० = १२० १+२=३ |
| = | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | १६ | जीवाचे १५ संस्कार [illegible] १५ कला-१६ गुणिले १५=२४० = २४० २+४=६ |
| १+६= | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | ७ | [illegible] ७ वार, १५ गुणिले ७=१०५ = १०५ १+५=६ |
| १+१५+१६+७ = | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | ३९ | [illegible] ३९ गुणिले १५=५८५ = ५८५ ५+८+५=१८ १+८=९ |
| ३+९ = | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | १२ | [illegible] १२ गुणिले १५=१८० = १८० १+८=९ |
| १+२= | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | ३ | जीवाची [illegible] ३ गुणिले १५=४५ = ४५ ४+५=९ |

१२०+१२०+२४०+१०५+५८५+१८०+४५ = १३९५, १+३+९+५=१८, ८+१=९

३+३+६+६+९+९+९= ४५, ४+५=९

हे केवळ संख्यासुत्र नसून यामध्ये अक्षरसंकेतही गुप्त स्वरुपात आहे.

हे सर्व संक्रमण जीवाचे गर्भावस्था ते गंतव्यपर्यंत होत असते.

यासर्वासुत्रातून जीवाची नवमी दाखविण्यात आली आहे.

होय. तिसरे सूत्र वजाबाकीने बघू..१७-७=८ ही अंतिम पदसंख्या होय. नी या अंतिम पदसंख्यांची पुन्हा बेरीज करुया-६+४+८=१८ म्हणिजेच १+८=९. नी आता या साऱ्यातून आलेली ही **९-नवम्** ही संख्या ही आता त्या पद्मस्वरुपाची द्योतक आहे. वरवर पाहीले तर आपणास ही संख्या दिसणार नाही. त्यासाठी-गुणून-अधिक-उणे ह्न+- या भागातून जीवास जावेच लागते. म्हणजे जीवाचे जे सहस्त्रदलकमलस्वरुप आहे. ते उमलण्यास ही नवमी हे एक आवश्यक अंग आहे. ही गुप्त 'नउमा' आहे. ही श्रीउमाशक्ती आहे. अशी ही नउमा पाहावयास १ ने सुरुवात करुन. ७ चा डोहळा भरुन. अष्टमीची यात्रा करुनच ही नवमी पाहता येते. म्हणून ६ म्हणिजे कमलपत्र होय. हे असे कमलाकार होय. अष्टदले म्हणिजे पराग होत. नी ९ वे मधुकेंद्र. आपण चतुर्थीकडून ते मधु घेण्याचे ज्ञान ही घ्यावयाचे आहे. असे हे पद्म जीवास अधिकमासात मधुरुपाने प्राप्त होते. म्हणिजेच या अधिकमास योगात षडाष्टक योग कींवा जुळत नसलेली स्थानेही मैत्ररुप होतात. गोड होतात. म्हणून अधिकमासात आपल्यापध्दतीने गोडपदार्थ, जसे अनारसे-बत्तासे-रेवड्या-गुळाच्यावड्या-गुळपापडी वाटण्याचा एक प्रघात आहे. कारण अधिक ही शक्ती आहे. नी म्हणूनच शक्तीचेवहन करणारा धातू म्हणून तांबे या धातूशीही हा अधिकमास निगडीत आहे. कारण ही शक्ती मस्तकाशी ज्या बिंदूशी छेदते, तेथे हा मधुसंचय असतो. नी ती जागा-ते स्थान म्हणिजे हृदय होय. म्हणिजे जे धडधडते ते हे हृदय नव्हे. तर वक्षमध्यस्थान म्हणिजे हे हृदय. श्रीहनुमंतांनी छाती फाडून दाखविली ती जागा. या जागेत सारा मधू-म्हणजेच हे पद्म असते. याचा पद्म म्हणिजे चरण. पद्म म्हणिजे कमल. पद्म म्हणिजे संख्या. कुठल्याही मार्गाने जरी घेतले तरी एकच अर्थ साऱ्यातून प्रवाहीत आहे. की हे जनहितार्थ आहे. जनहित विवरी..कल्याण



करी रामराया. म्हणून अधिकमासात तांब्याचे दिवे-तांब्याच्या वस्तू, दान करण्याची आपली पध्दती आहे. कारण तांबे हे या मधातील शक्तीस पूरक व मधाचे जलदवाहक असे आहे. आपल्या वाडवडिलांकडे श्रीस्वयंपाकगृहातील साधनांमधेही याचकारणे तांब्याचे अधिक्य अधिक असे. जसे, तांब्याच्या भांड्यातून पाणी पिणे, भोजन करणे-पूजन करणे, असे. यासर्वांच्या दर्शनाने जीवास आल्हाद प्राप्त होतो. आल्हाद म्हणजे पुण्य. जीवास हलके करणारे. जीवाचा भार कमी करणारे असे. पुण्य कशाने वाढते, तर गूळाच्या दर्शनाने. तांदुळाच्या दर्शनाने. म्हणूनच तांदुळाच्या पिठास गूळ व खसखस लावून बनविलेले अनारसे याच अधिकमासात-मधुमासात वाटण्याची आपली पद्धत आहे. कमल-कमलपत्र-पाणी-सुगंध-रंग-पराग-मधु-खोली दर्शविणाऱ्या वस्तू. दिवा-निरांजने इत्यादींच्या दर्शनाने पुण्यसंचय होतो. पुण्यवर्धन होते. नी जीवास आल्हाद लाभतो. याविषयी अधिक पटण्यासारीखा भाग अजून जरा बघावयाचा तर, औक्षवंत होण्यासाठी आपण जे औक्षण करीतो, त्यावेळी कायकाय सामुग्री आपण घेतो? तांब्याचे ताह्मण. तांब्याचा दिवा. तुपात भिजविलेली कापसाची वात. अखंड सुपारी. एखादा सुवर्णधातु. कुंकुंम मिश्रीत तांदुल. भाळी रेखाटण्याकरीता कुंकुम. नी श्रीमुखी भरविण्यासाठी एखादा गोडपदार्थ. अशी सारी सामुग्री एकत्र करुन केलेले औक्षण हे जीवास अक्षयवंत करीते होते. म्हणजेच जीवाची पुण्यवाढ यातून होते. तसेच हे दर्शन आल्हादकारक व पुण्यवर्धन करीते. नी जीवाचे पुण्यवर्धन करणारा हाच मधु होय. नी मधु म्हणिजेच पद्मलाभ होय. 'श्रीगदा' मात्र जीवास प्राप्त होत नाही. ती केवळ श्रीहनुमंतकृपा होय. श्रीकृष्णांनी सुद्धा महाभारत युद्धात श्रीभीमनाथांना श्रीहनुमंतांचे आशिर्वाद घ्यावयास लाविले. श्रीअर्जुनांस श्रीकपिवरांनी, ध्वजांकीत व्हावे, म्हणून प्रार्थना करण्यास सांगितले. श्रीयुधिष्ठीरांना श्रीमहारुद्रांचे चरण प्रक्षाळवयास लावून, प्रार्थनापूर्वक ध्वजनिर्मीती करावयास लाविली. त्यावेळी श्रीनकुल व श्रीसहदेवांनी चवरी ढाळीली. फार सामर्थ्य आहे श्रीकपिवरांचे. म्हणून श्रीगदा ही शक्ती केवळ श्रीहनुमंत-श्रीसमर्थ-श्रीमहाराज यांचे ठायीच एकवटलेली आहे. येथे पुन्हा 'ग' अक्षरच प्राधान्याने

आहे. श्रीसमर्थांनी 'ग्रं' अक्षर-तर श्रीमहाराजांनीही ङ ङ चाच उच्चार केला. म्हणूनच हे श्रीगदाधिष्ठान ही श्रीकपिवरांची वज्रशक्ती आहे. तिस आपण या स्थानी चरणस्पर्शपूर्वक हृदये नमस्करु या. श्रीकपिवरांच्या या श्रीगदामुद्राही खूप आनंदवर्धनकर्त्या आहेत. जसे श्रीगदा स्कंधावर. श्रीगदा हातात. श्रीगदा दोपदांच्या मध्ये. श्रीगदा वक्षासी. श्रीगदा उर्ध्वेसी-वरती. श्रीगदा उंचाविलेली. श्रीगदा फिरविलेली. श्रीगदा जानुजवळी. अशा या सार्‍या मुद्रांची फलिते वेगवेगळी आहेत. श्रीअर्जुनांच्या रथावरती श्रीमहाबलींची प्रतिमा ही सव्य करातील श्रीगदेश्वरीचीच होती. सव्य करात श्रीगदा, केवळ वाम बाजूने अंगुष्ठ. खाली करांगुलीनी धरीयेलेली. मधे मध्यमा लवियेलीली. या स्वरुपात धारण केलेली होती. अनामिका-आपतत्व. तर्जनी-वायूतत्व, हे दुरी होते तये प्रसंगी. केवळ ३ बोटांच्या आधारावर इस धारण केलीले होते. म्हणून सार्‍या गोष्टी 'जया'प्रत गेल्या. पण प्रगट होण्याकरीता खूप शुचिता-विनय-विवेक आवश्यक असतो. अहंकारचा पूर्ण लय लागतो. श्रीभीमनाथांची देखील अहंकार परीक्षा केल्याचे आपल्या ऐकीवात आहेच. तसेच श्रीअर्जुनांचीही 'सेतु' बाबत अहंकार परीक्षा श्रीमहारुद्रांनी केलेली आहे. श्रीवैनतेय-श्रीसमुद्र-श्रीमान सत्यभामा, या सार्‍यांचे अहंकारलय श्रीहनुमंतांनी केलेले आहेत. अशा श्रीमद्श्रेष्ठांचे हे आयुध नव्हे तर ही तयांची शक्ती आहे. तिचे दर्शन असे सहज होणे नाही. श्रीसमर्थांच्या वेळेत म्हणिजे श्रीकपिवरांनी श्रीसमर्थ रुपात जगध्दोधारणाकरीता जो अवतार घेतला त्यात याच शक्तीस कुबडीत समाविष्ट केले होते. श्रीमहाराजांचे अवतारात हीच शक्ती जानुत समाविष्ट केली गेली. पण श्रीगदा विसंबिले नाहीत. जेव्हा श्रीकपिवरमहाबली श्रीरामरायांच्या सेवेत त्यांचे चरणांशी बसत, जसे दक्षिणे लक्ष्मणो यस्य । वामे तू जनकात्मजा। पुरतोंमारुर्तियस्य्। त्वं वंदे रघुनंदनम् ।। असे. त्या श्रीमुद्रेत श्रीरामरायांच्या सव्यपदी श्रीकपिवर बसत. तेव्हा ही श्रीगदेश्वरी अधोमुखी व तिची दंडीका म्हणिजे हाती धरावयाचा भाग, हा श्रीकपिवरांच्या जानुजवळ व श्रीरामरायांच्याही जानु म्हणिजे गुडघ्याजवळच असे. याच जानुस श्रीमहाराज सतत उंचावून असतात. या सार्‍या खुणा निजसंकेत आहेत. जीवाने या सार्‍याच्या

अभ्यासात स्वत:स विद्यार्थी करुन घ्यावे नी नित्य आनंद सेवावा. असेच श्रीसमर्थ सांगतात. कोण हो एवढे तपशीलवार आपणांस सांगेल? एक अक्षर योजितांना श्रीसमर्थ जर जीवाचा एवढा बारकाईने-सूक्ष्मरीतीने जिव्हाळा करतात तर, संपूर्ण-समग्र 'ग्रंथराज'? कोटीकोटी-पद्मपद्म प्रणाम करावेत त्या अचाट-अफाट-व्यापक श्रीमुख्यदेवांना. आपण एवढे तरी निश्चित करु शकतो. पथ्य एकच, हे मात्र नि:संशय विश्वासाने करावे.

असे हे १५ + १५ चे ७ ने म्हणिजेच सप्तमीने बांधिलेले हे सूत्र आहे. श्रीयुधिष्ठीरांची देखील श्रीहनुमंतांनी परीक्षा केली. ध्वजांकीत होण्यापूर्वी श्रीश्रीकृष्णांनी श्रीकपिवरांचे चरण प्रक्षाळीण्यास श्रीयुधिष्ठीरांस सांगितले. त्यावेळी श्रीमहाबलींनी अत्यंत लघुरुपधारणा केली. नी ते शाखा शाखांवर मुक्त विहरु लागले. श्रीयुधिष्ठीरांची मोठी कठीण अवस्था जाहली. श्रीवृक्षराजांवर आरुढ होणे, हे रथारुढ होण्याएवढे का सोपे होते? यत्न केला, पण बुंध्यापासून हात दोन हातच ते वर चढू शकले. नी श्रीकपिवर तर उच्चस्थानी. शेंड्यावरती विराजमान. शेवटी श्रीयुधिष्ठीरांनी श्रीवायुदेवतांची मनोमन प्रार्थना केली. नी त्या श्रीवृक्षराजासच विनंती केली. विनवीले की आपल्या अग्रावर विराजमान झालेले आमचे आराध्य-आमची प्रक्षाळणा स्विकारण्यास होत्साते नव्हेती. याचेकारण आम्हास उमजावे. त्यापदांचे क्षालनकरीण्या आम्ही योग्य नव्हेति. याकरीता आपल्या श्रीआधारास-बुंध्यासच ते श्रीचरण समजोन क्षाळणा करीतो. कारण आपल्या अग्रावर जे आहेत ते साऱ्यांचेच-सर्वांचेच अग्रज आहेति. मुख्य-थोरले आहेति. आमुचे धाकुटपण मान्य करुन ही सेवा स्वीकारावी. नी श्रीयुधिष्ठीरांनी बुंध्याशीच ते सप्तनद्यांचे तीर्थ घातिले. तेव्हा बुंध्याशी घातिलेल्या त्या तिर्थाचा झाडाच्या शेंड्यावरुन श्रीयुधिष्ठीरांवर अभिषेक झाला. नी श्रीश्रीकृष्णांनी श्रीयुधिष्ठीरांस तेथेच गाढ अलिंगन दिले की हिच विजयश्री. अभिषिक्त केले आपणाते..स्वये हनुमंते. युद्ध येथेच संपले. उरले ते कर्म. कर्तव्य कर्म. केवढे हे अनुपमेय घटीत. केवढी विलक्षण ही लिला होय. अद्‌भूत-अद्‌भूत असे ते महद्‌भूत तत्वच या साऱ्यातून प्रवाहीत आहे. हा सारा लाभ, पंधरवडा म्हणिजे पक्ष. नी सातवडा म्हणिजे वार यांमधून आहे. फक्त अहंकारलयाचे पथ्य यात

महत्वाचे. 'श्रीदासबोध' सूत्रच-सूत्राचा आरंभच दासापासून आहे. येथे अहंकार उभाच राहणार नाही. तो पळ काढेल. फार फार सुंदर नी विलक्षण गोड आहे हे सारे. हे सारे आपल्याकरीता आहे. आपले आहे. आपणांस कळले की आनंद 'त्या' हृदयी होणार आहे. ज्या हृदयास या सर्व सुचित्राची आस आहे. प्रत्यक्षितेची प्रतिक्षा आहे. जो जो भजनी रंगला। तो तो रामदास झाला ।। अशा या रामदासीबाण्याचे हे सूत्र. जीवाचे खरेतर काळीजसूत्रच व्हावयास हवे. म्हणजे जीवाची एकूणच धडपड थांबून जीव निश्चिंत अशा सुखप्रदेशातून वाटचाल करेल. कारण श्रीसमर्थ सांगतात की, ज्या ठिकाणी श्रीरामरायांचे वास्तव्य आहे, त्या ठिकाणी दुःख कदापिही संभवत नाही. श्रीरामराज्य ही काही साधी गोष्ट नाही. येथे प्रत्येक जण श्रीरामांचा-श्रीरामच असा-श्रीरामदास असा. किती विलक्षण. म्हणूनच या साऱ्या गोष्टी निःसंशय घ्याव्यात नी जन्मा येऊन जननी-जन्मभूमीश्च सार्थकी करावे.

**श्रीवेणीपेडातील ३ री शक्ती-३ रे पेड.** आता तिसरीशक्ती. ३ रे पेड. हे शक्तीस्वरुपाचे एक संकेतचिन्ह आहे. यात वरची एक रेघ म्हणिजे-ललाट होय. नी तळाची रेघ म्हणिजे पाट-पट होय. मध्ये जे . बिंदुस्वरुप ते म्हणिजे जीव होय. असा हा पेडस्वरुप अभ्यास आहे. शलाके पासून ४ था नी आरंभा पासून ३ ऱ्या स्थानावर असलेले ललाट. असे गंध लावण्याची देखील पध्दत आहेच. ललाट म्हणिजे ज्यावर जीवाचे संगोपन-संजीवन-



**तृतीय पेड-कोन संधी**




३ ३ हे कोन दंड शक्तीस बळकटी देतात. हे कोन स्कंधाच्याखाली वाकी घालतां त्या भागात शक्ती प्रसारित करतात. हे भाग सतत कशानेतरी मंडीत असावेत. जसी वाकी-भस्म-गोपीचंदन आदीं.

**संकेत**

संकेत-समर्पण-संयोग-सव्य-सत्-स्वत्व-सत्व-सात्विकसंकेत-पाचवीचा लेखा, असे सारे असते. वाचता येत नाही, पण लिहीलेले असते. ही सर्व भाषा-ही लीपी आपल्या धर्मशास्त्राप्रमाणे जीवाच्या जन्मानंतर ५व्या दिवशी लिहीली जाते. ९ महिने + ५ दिवस=१४ असे चर्तुदशीपर्यंतचे आलेख लिहीलेले असतात. १+४ झाले की पंचमी. ४+१ झाले की मुक्ती. असा हा जीवनमुक्तावस्थेचा आनंद आहे. या म्हणिजे चित्रात दर्शविलेल्या ॐ ओंकाराच्या मात्रा आहेत. ललाटावरील ॐकार क्षेत्रात भरपूर आल्हाद असावा. म्हणजेच पुण्य असावे. याकरीता पाचव्या दिवशी हा पुजाविधी केला जातो. हा संपुर्ण पट गूढ-गुप्त आहे. श्रीगुरुंची जर कृपा जाहली, तरच हा विधीलेख जीवास वाचिता येतो. अन्यथा पट न उघडताच त्याचे जाणे घडते. श्रीकबीरांचे एक भजन बघा, घुंघट के पट खोल रे..तोहे पिया मिलेंगे. मीपणाच्या घुंघट म्हणिजे पदराने स्वतःस झाकील्याने, पिया म्हणिजे सर्वस्वाचा स्वामी, दिसेनासा झाला आहे. घूंघटपट उघड-जाण-मोकळा कर. तू त्याला भेटशील. या साऱ्यांची आठवण-स्मरण व्हावे याकरीता कुंकु-अष्टगंध-भस्म-सुवर्ण-सुपारी-पोफळी-बुक्का-चंदन-गोपीचंदन-विभूती-अंगारा-हळद तसेच मुंडावळ्या-मुगुट-शिरस्त्राण इत्यादींचा उपयोग केला जातो. स्मरण हवे म्हणून हे करावयाचे. स्मरणाकरीता हे सारे करावयाचे आहे, याचेच स्मरण नसते, तर इतराचे काय. म्हणून प्रत्येक योजनेविषयी जाणिव हवी की ही योजना आपल्यासाठी आहे. हितासाठी आहे. सारेच सांगावयाचे आहे. गुप्त काही राखावयाचेच नाही. पण जीवाचीच तयारी नाही हे ग्रहण करण्याची. सुईच्या अग्रावर खसखस ठेवायाची, पण कशी? सारं आयुष्य काट्याच्या अणिवर वसले तीन गाव-दोन वसे एक वसेचीना, या पध्दतीने जाते. तसेच, अ वस म्हणूनच. अवस म्हणिजे अमावास्या. दिसशील दिसशील नाहीसा होशील, असे होऊ नये. हे पूर्णचंद्रा तू तुझे स्वरुप जाणून घे. तू देहाचामध्य-आकाशीचामध्य-सागराचामध्य-फळाचामध्य-फुलाचा मध्य-भाग्याचामध्य-साऱ्याच्याच मध्यस्वरुपी आहेस. माझ्या माध्यांनी शीतलता कर. जीवही ललाटपटाच्या मध्येच आहे. ललाटपटाच्या मधेच असलेला. मधलाच असलेला भाग होय. आरंभ नी अंत जीवास कुठे ठावकी

आहेत. वस्त्र बदलायाचे तरी दुसऱ्या वस्त्राची निवड आपल्या हातात आहे का? तर हो, आपल्याच हातात आहे. म्हणूनच हा सारा अभ्यासच महत्वाचा असा आहे. या एका रेघेवर जीवाचे सारे भव्य-दिव्य अवलंबून आहे. ही वरची रेघ म्हणिजे छत्र. ते कसे मिळते-लाभते, यावर सारे अवलंबून आहे. छत्र म्हणजे श्रीतात-मात गृहे. कुळ-मुळ-भावंडे-आडनांव आदी. तर तळाची रेघ म्हणजे पाटाची रेघ. पाट म्हणिजे सोबत. ती जीवास कशी मिळते हे महत्वाचे. सोबत म्हणिजे, पत्नी-पति-पुत्र-पौत्र-श्वशुरगृह-जामातगृह आदी. या साऱ्यावर जीवाचे बिंदू ते सिंधू हे परिभ्रमण-परिक्रमा-परिचर्या, अवलंबून असते. म्हणिजे एकुणच जन्मापासून-तात-मातस्थाने, आप्त-इष्टस्थाने, इत्यादी जीवाचे ललाट दृष्टीने महत्वाचे ठरतात. या रेघा देखील एक विशिष्ट मर्यादा दाखवितात. या दोन रेघांवरुन काय ध्वनित होते. तर उखळ-डमरु-माप असे. या साऱ्यात जीवाचे स्थान मध्याशीच. याच मध्यसुत्राचे सोने करण्यासाठी, ते सुत्र बळकट करण्याकरीता श्रीमहाराज माघ वद्यसप्तमीस भर माध्याह्नी प्रगटले. श्रीसमर्थही चैत्रशुद्ध नवमीस माध्याह्नी प्रगटले. श्रीश्रीज्ञानेश्वर महाराजही भर मध्यानरात्री प्रगटले. श्रीराम-श्रीकृष्ण-श्रीद्रौपदी-श्रीदृष्टद्युम्न ही सारी माध्याह्नीची प्रगटीकरणे होत. आभाळाच्या मध्यात म्हणजेच आपल्या डोक्यावर, श्रीसूर्य-श्रीचंद्र भर १२ वाजता म्हणिजेच माध्याह्नी येतात. मुख्यसुत्र आहे हे. म्हणून जीवासही मध्येच ठेविले आहे. तात-मातांच्या मधे. कुळगोत्रामध्ये. पाळण्यामधे. आकाश-पृथ्वीच्या मधे. जन्म-मृत्युच्याही मधेच, काय काय श्रीसमर्थांचे सांगावे? श्रीसमर्थांविषयी सांगावे? तुझा दास मी व्यर्थ जन्मास आलो..किंवा तुझा मी टोणपा झालो.. हे तर म्हणावेच म्हणावे. परंतु, समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे..हे तर निश्चितीने म्हणावेच म्हणावे.

हिणाहून मी हिण जैसा भिकारी..दीनाहून मी दीन नाना विकारी..
पतितांसी रे आणि हाती धरावे..समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे..
जनी भक्ती नाही मनी भाव नाही..मला युक्ती ना बुद्धी काहीच नाही..
कृपाळुपणे राज्य रंकासी द्यावे..समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे..
बहुसाल अन्याय कोट्यानुकोटी..रघुनायके घातिले सर्व पोटी..

किती काय गुणांसी म्यां आठवावे..समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे.. हेच आपण वारंवार म्हणत राहिले पाहिजे. जेणेकरुन ते एवढ्या आत अगदी आर्ततेच्याजवळ पोहोचेल. नी तेथेच त्याचे प्रार्थनास्वरुप होऊन जीवाचा, त्या शिवबिंदुशी संयोग हाईल. नी घाट-काठ-माठ-ताट-लाट-वाट-पाठ सोडून जीवबिंदुचा त्या सिंधुरुपाशी संयोग होईल. एवढी शक्ती या संकेतचिन्हात आहे. हे स्कंधाखालील बगल भागाच्या थोडेखाली, दंडाशी वाकी बांधतो तीयेशी संलग्न असते. म्हणूनच दंडात वाकी-ताईत बांधावयाची, भस्म-विभुती-चंदन इत्यादी लेपन करण्याची, रुद्राक्ष इतर बांधण्याची आपली पद्धती आहे. या साऱ्याशक्ती या त्रिधा-मेधा-द्वीविधा या सुत्रांशी-अनुस्यूत रितीने बांधलेल्या परंतु गुप्त स्वरुपाच्या आहेत. हे सूत्र आपणांस श्रीसमर्थकृपेने उघड होत आहे. हे येथे आपण ध्यानात ठेवावयाचे आहे. तेच सुत्र कसे विस्तारले जाते-व्यापक होते हेच आपणास पाहावयाचे आहे. जे श्रीसमर्थ आपणास सांगत आहेत, सर्वेंद्रिये कर्णाठायी एकवटून हे आपण भक्तीच्या प्रथम पायरीवरुन-सोपानावरुन-चढणीवरुन-वृद्धीवरुन श्रवण करावयाचे आहे. चुकुनही शंकेने-अविश्वासाने-तर्काने खाली उतरावयाचे नाही..नाहीच. चंद्र-सुर्य-तारामंडले या दिव्यविभुती वर-उर्ध्व आहेत नां. तशाच स्तरावर रहावयाचे आपणही. झाडे-वेली-पाने-फुले-फळे-सारे उर्ध्व-उंचगतीचे पांथस्थ. अगदी सागरीच्या लाटाही आकाशीच्या चंद्राकडे झेपावितात. मग आपणच का निम्नस्तर घ्यावयाचा? निम्नस्तरावर रहावयाचे? कान-कर्ण-श्रवणेंद्रिय ही देखील किती उंचीवर आहेत बघा. नुसते कान हे अवयव धरुन चालणार नाही. तर ते स्थान-त्याची क्षमता-त्याची उच्चता नी त्यामुळे आपला उच्चयोग आपण लक्षात घ्यावा. आता श्रोते सावधान-संतकथेचे करा श्रवण-करोनिया एकाग्र मन-निजकल्याण व्हावया, कशासाठी तर स्वकल्याणार्थ. हे स्वकल्याणही जया न उमजे त्यासाठीही श्रीसमर्थांजवळ प्रार्थना आहे. प्रेम आहे. मतिमंद ते साधना योग्य करण्याची त्यांचीच तळमळ आहे. म्हणून जीवास हे सुंदर लट-पट म्हणजेच ललाटपटरुप श्रीसमर्थ देत आहेत. **हे ललाट, विराट चरणांवर टेकील्याशिवाय-ठेविल्याशिवाय-त्या चरणांशी ते लागल्याशिवाय याचा**

मध्य जागा होणे नाही. **श्रीसंत सहवास-सेवा-सान्निध्य यातूनच या ललाटाचा एक सुंदर जीवनपट उलगडणार आहे.** पाणी स्वच्छ असावे. जे सेवन करु ते अन्न स्वच्छ नी रुचकर असावे. वस्त्र स्वच्छ असावीत. घर स्वच्छ असावे. मग मन? मनाचे काय? नी अध्यात्म तेच तेवढे मागते. नी तेच तेवढे आपणांकडून होताना दिसत नाही. मनं शुद्ध तुझ गोष्ट आहे पृथ्वी मोलाची..,पण सारा कारभार आलस्याने नासतो. पुष्कळ वाटते पण होत नाही. कळते पण वळत नाही. या दुविधेतून सोडविणारी अशी ही द्विविधा आहे. **श्रीवेणीतील चतुर्थशक्ती-चतुर्थपेड.** आता चतुर्थ पेड. हे शित. शित म्हणिजे जीवाची जंतुरुप अवस्था. सुक्ष्मावस्था. प्रथमावस्था. बीजावस्था. रोपणावस्था. वृद्धिंगत होण्यापूर्वीची अवस्था. पुर्वीची अवस्था. आरंभावस्था होय.

**चतुर्थ पेड-कोन संधी**




४ ४ हे कोन नाथपंथीय जेथे वटबंधन करीत ते वक्ष ते नाभीच्या वरील जागा येथपर्यंत हे शक्ती प्रसारण करतात.

**शित**

प्रत्येक बीजांतून फळ व फळातून बीज अशी ही पुनरावृत्ती अवस्था होय. आरंभ नी अंत नक्की कसा? बीजातून फळ नी फळातून पुन्हा बीज. यापुढे बुद्धी जाताना दिसत नाही. तिथेच ती अडते. नी जीवाची अवस्था संभ्रमीत करते. परंतु ज्ञानियासी संभ्रम-शंका-तर्क यास वावच नसतो. पोळी लाटताना पोळपाटाला लागलेली पोळीची बाजू नी लाटण्याखालची पोळीची बाजू ओळखता येते. पोळी भाजताना, पोळीची लाटण्याखालची बाजू तव्यावर उलटी टाकावी लागते. नी पोलपाटावरची बाजू तव्याच्या वरती घ्यावी लागते. एक बाजू तव्यावर म्हणिजे ती अग्नीजवळ नी दुसरीबाजू वरती. अशी पोळी टाकली तरच फुगते. नी भाकरी मात्र थापताना ताटा लगतच्याच बाजुने तव्यावर टाकावी लागते. हातांनी थापलेला भाग वरच्यावरच टाकावा लागतो. तरच ती फुगते. तसाच हाही भाग आहे. हाही भाग समजावा. बीज पेरुन पुन्हा फळातून

बीज होणे म्हणिजे पुनरपी जननम्. म्हणून हा चतुर्थ पेड, शितस्वरुप हा भाग मुक्तीत्रयाकडे जातो. शलाकेपासुन ५ वा व आरंभापासुन ४ था असा इयेचा क्रम आहे. मुक्तीस्वरुपात हा भाग पेडाच्या संदर्भात स्कंध-कुस-बगल-वाकीच्याखाली-बरोबर वक्षमध्याच्या मागे येतो. मंदिरामध्ये जसे आपण देवाचे दर्शन करुन प्रदक्षिणेस जातो, त्यावेळी देवांच्या पाठीमागेच आपण आपण मस्तक टेकवितो, ती जागा. तसे बरोबर पाठीमागे हे पेड येतात. मुख पूर्व धरली तर हिस पश्चिम म्हणता येईल. अशी अवस्था. जीवास एकुणच सारी प्राप्ती-नूतनवस्त्र म्हणिजेच योनीप्राप्ती कर्मातून होते. म्हणून पश्चिम म्हटले आहे. नी यातही विशेष म्हणिजे अस्तातून पूर्व येते. तमातून ज्योतिपथ लाभतो. मृतातून अमृतपथ कसा तर, दक्षिण टाळून उत्तरेकडचा. श्रीयम मार्ग टाळून उत्तरप्राप्ती असा. पश्चिम टाळून पूर्व असा. उत्तरेचा गर्भ श्रीकृष्णांनी प्रतिपाळिलेला-शिकविलेला-सांभाळलेला-जगविलेला-कलीयुगाच्या प्रारंभीचा-जीव-जंतू-लघु-सूक्ष्म-अणु-शित-रेत-बिंदु काहीही म्हणा यास. तरुणपणी कर्तृत्वास आभाळ थिटे पडावे असे हे शित सूत्र आहे. ४+४=८ चे सुत्र म्हणजे बरोबर चैतन्याच्या जवळ. चैतन्यच जवळजवळ. फक्त स्वत:ची परिपूर्ण ओळख नसल्याकारणाने अंतर वाटते. नी अंतर वाटून दु:ख भोगावे लागते. श्रीमहाराजही या शितांसच सर्वप्रथम भेटते झाले. उष्ट्या पत्रावळीवरील हे शितच उचलून श्री भक्षण करीत होते. न्याहळीत-निरखित होते. निरीक्षण करीत होते. आपणांसही सांगत होते, अन्न हे पूर्णब्रह्म. यासर्वात, होते, म्हणण्याचा एवढाच उद्देश की ही घटना १८७८ माघवद्य सप्तमीची आहे. पण तिचे ज्ञान, तीतून मिळणारे ज्ञान मात्र अव्याहत आहे. म्हणून त्या घटने करीता ते होते, असे संबोधन येथे केले आहे. ज्ञानास-जाणिवेस-प्रेमास-विवेकास कधीच भूतकाळ नसतो. ते चिरंजीव संजिवनामृत आहे. आपण ते प्राशन कसे करावे, तर श्रीसद्गुरु मुखाने ऐकावे, नी कानाने भोजन करावे. तृप्ती मुखातून जशी, तशीच. कींबहुना त्याहीपेक्षा कर्णामधुन-श्रवणद्वारे अधिक तृप्ती आहे. अंतरीची तगमग-तडफड निववण्याकरता श्रीगुरु मुखातीलच शिते आपण वेचिली पाहिजेत. वेचून निरीक्षण करुन अभ्यासपुर्वक सेवन

केली पाहिजेत. कारण अनुपम ब्रह्मरस आहे त्यात. आपण गुळवण्याशीच मिटक्या मारीत बसतो. तसे होउ नये असेच श्रीमहाराज आपणास सांगत आहेत. एक शित म्हणिजे तरी काय? तर एक शित म्हणिजे एक अक्षर. जे जीवास त्याच्या जन्माच्या वेळी प्राप्त होते. जन्माक्षर म्हणून. त्या एका अक्षराचा केवढा मोठा ग्रंथ होईल. पुन्हा जीवाच्या अनंतअनंतजन्मांच्या स्मरणी जर उलगडल्या, समग्रच ग्रं जर उलगडला, तर कित्येक कोटी श्लोक जीवाच्याच कथनाचे होतील. काय शित आहे बघा. एक शित म्हणिजे जीवन. एक शित म्हणिजे बिंदु. एक शित म्हणिजे कण. एक शित म्हणिजे अमृत. एक शित म्हणिजे शुन्य. वाट्टेल तेवढा विस्तार करता येईल. एक शित म्हणिजे आधार. एक शित म्हणिजे पृथ्वी. एक शित म्हणिजे आशिर्वाद. एक शित म्हणिजे ब्रह्म. एक शित म्हणिजे मैत्र. एक शित म्हणिजे किती किती हे कळलं तर यात्रा पूर्णच. नाहीतर येणे जाणे चालूच. म्हणूनच या शितास श्रीरामपदांजवळ ठेवावे. या शिताचे संगोपन श्रीरामरायांनी करावे. त्यांना हवे तसे त्यांनी घडवावे.



जीवाची शित-जंतु अवस्था

तयांचे जवळून कधीच दूर मात्र करु नये. याचा कधी दगडही होऊ नयेच. झालाच तर त्यावरही श्रीरामनाम मुद्रा ही हवीच. दगडाला श्रीरामनाम देऊन त्यास तारण्याकरीताच, जन्मास आल्यावर जन्माक्षर द्यावयाचे असते. घाबरावयाचे-रागवावयाचे कारण नाही. दगड म्हणजे काही भयानक वस्तू कींवा आपला अवमान करणे नव्हे, तर याच दगडातून देवादिकांच्या मूर्ती घडतात. देवालये घडतात. बाण-तांदळे-खडे घडतात. दगड वाईट नाही, त्यास पार्थिव म्हणत नाहीत. दगडातील चैतन्य जीवास कळावे म्हणूनच श्रीरामनाम! खूप सुंदर नी परिपूर्णसूत्र आहे हे. जीवाला आपण जन्म घेण्यापूर्वी कसे होतो, ती अवस्था जर जाणून घ्यावयाची असेल, तर त्याने तांदळाचा दाणा पहावा. तेवढेच जीवाचे शित स्वरुप. तेवढाच जीवजंतु. नी त्यातुन किती अफाट कर्तृत्वे घडतात बघा. चित्रात दर्शविलेला असा हा तांदुळ. मस्तकावर चंद्रकोरी सारखाच बाक. बीजेची कोर असा आकार. अप्रतिम



जीवाचे शित स्वरुप

भाग्याची पौर्णिमा. परंतु अज्ञानवश अवस होते त्याची. अमावास्या. ललाटावर या जीवाचा उल्लेख कसा असतो ते कळण्या करीताच भाळावर, भ्रुमध्यास कुंकूम् लाविले जाते. ज्योत स्वरुपात हे कुंकुम लाविले जाते. शित स्वरुपच ते. तिलक स्वरुपातच कां? तर जीवीचे स्मरण जागावे हा हेतु त्यापाठी आहे. त्यास कळावे, आपण कोण ते. मग साहजिकच मनास प्रश्न पडतो की जर आपणच ब्रह्म-आपणच देव, तर मग आपली ही अशी बौद्धिक-केविलवाणी अवस्था कां? तर देहासच मी असे आपण समजून बसलो. देह म्हणिजेच मी असे संबोधल्यामुळे ही अवस्था होते. सारे बुद्धीकक्षेत घ्यावयाचे तर पिशवीतून काही मूल्यवान सामान आणल्यावर, ते काढून ठेवतो. नी पिशवी ठेवून देतो. आपणास पिशवीतील वस्तु महत्वाची असते. पिशवी थोडीच? तसेच देहास पिशवी समजा. नी मूल्यवान वस्तू म्हणिजे आत्मा समजा. पिशवीतील वस्तू मूल्यवान. तसाच देहातील आत्मा बहुमूल्य होय. त्याचीच तर ओळख होत नाही. हेच अज्ञान. नी अज्ञानवश केलेले कर्म, कोणते चिरकाल टिकणारे फळ देईल..देउ शकेल? याचा आपणच अभ्यास करावा. श्रीसमर्थांनाही हेच सांगावयाचे आहे. जे मिळाले ते आपलेच आहे. नी सारेच जर आपले आहे, तर मग धडपड कशाला-कशासाठी? एकदा ताटात वाढलेला पदार्थ आपल्यासच वाढलेला आहे असे जेव्हा कळते, तेव्हाच आपण घास-घास करुन सेवन करावयास सुरवात करतो नां. कारण आता हे आपलेच आहे हा विश्वासच आपली सारी धडपड थांबवितो. अजून जर थोडे बुद्धीकक्षेत येण्यासाठी सांगावयाचे तर एक गंमतीशीर उदाहरण घेता येईल. कसे ते बघा, की पूर्वी सिनेमाला तिकीट मिळायाचे, पण तिकीटावर क्रमांक-रांग इत्यादी तपशील नसायाचा. मग लवकर जाऊन जागा पकडून बसावे लागायाचे. नाटक-सिनेमा बघावयाचे म्हणजे चादर-सतरंजी घरुनच घेउन जावे लागायाचे. आपण नी आपले आप्त-इष्ट साऱ्यांची जागा कोणीतरी एक दोघांनी अगोदर जाउन पकडावी

लागायाची. मग तेव्हा फार धावपळ करावी लागे. आता कसे, रांग-आसन-क्रमांक तिकीटावरच दिले जात असल्यामुळे ही अशी धडपड थांबली. वेळेवर गेले तरी चालते. त्यामुळे जीवास शांतता असते. कारण खात्री असते. विश्वास असतो की तिकीटे काढलेली आहेत. तसेच देह हे तिकीट समजायाचे नी निवांत राहून, विश्वास ठेऊन हा सारा जीवनपट जाणून घ्यावयाचा आहे. मग या शितास गुळ लागणे-तिखट लागणे. साऱ्या चवींचे यथास्थित पोषण लाभणे, हा अभ्यास मग आपला आपण करावयाचा आहे. खारटही नको नी उष्णही नको. तिखटही नको नी बेचवही नको. अजीर्णही नको नी उपाशीही नको. सारे बेतशीर नी जेव्हा हवे तेव्हा प्राप्त होणे, या साठी एकाजन्मात लाभलेली बुद्धी तीही कर्म-भोग-प्रारब्ध-संचित-क्रियमाण-सत्व-रज-तम-अध्यात्मिक-अधिभैतिक-अधिदैविक-जन्म-जरा-मृत्यू-बाल्य-तारुण्य-वार्धक्य-ताप-पश्चाताप-अनुताप-संताप-क्रोध-भय-हास्य-खेद-आनंद-आप्त-इष्ट-सुष्ट-दुष्ट-तात-मात-कुळ-मुळ-धर्म-नेम-नियम-पालन-पोषण-ललाट-पाट-बैठक-आसन-भाग्योदय-साथ-सोबत-संगत-जन्म-पाळणा-झोळणा-खेळणा-लोळणा-चढणे-उतरणे-वाढणे-वाढवणे-तिथी-व्रत-मुहुर्त-सप्तवासर-३६नक्षत्रे-चंद्र-सूर्य-दिवस-रात्र-काळ-काम वेग-गती-प्रगती-अधोगती-उर्ध्वगती-पतन-पतित-स्वर्ग-मृत्यू-पाताळ-सौंदर्य-कुरुप-सरुप-स्वर-गोडवा-माधुर्य-कर्तृत्व-कार्य-दिशा-मार्ग आदी-अंत-पथ-पंथ-वाट-पायवाट-नागमोडीवळणाची वाट-सरळ-वेडी-वाकडी-लांबची-जवळची-चढणाची-घसरती-निसरडी-गाळाची-शेवाळाची-गटाराची-अस्वच्छ-चांगली-सुंदर वाट-देश-प्रदेश-समाज-शेजार-पाजार-आजार-द्वेष-निंदा-मत्सर-लोभ-मोह-क्रोध-काम-मद-ताठा-गर्व-अभिमान-अहंकार-सुड-प्रतिशोध-घात-अपघात-धक्का-चढणे-घडणे-मोडणे-आदळणे-आपटणे-खरचटणे-घटस्फोट-काडीमोड-भांडणे-द्वैत-संघर्ष-मैत्र-समज-ज्ञान-जाणिव-भूलोक-भूवः-स्वलोक-१४ भुवने-२१ नद्या-१३ समुद्र-तारे-तारांगणे-मंडल-ग्रह-गृहस्थी-ब्रह्मचर्य-गृहस्थ-वानप्रस्थ-संन्यास-निवृत्ती-ज्ञान-सोपान-

मुक्ता-शक्ती-मुक्ती-बुद्धी-मुक्तीयोग-सुयोग-मंगलकारक निर्माण-निर्मिती-न्याय-अन्याय-विचार-चिंतन-व्याप-पसारा-खटाटोप-नोकरी-व्यवसाय-पैसा-संचय-वित्त-धन-धान्य-समृद्धी-घबाड-लबाड-काबाड-कष्ट-यत्न-प्रयत्न-ध्येय-यश-अपयश-ठेवा-सोबत-करणारा लाभणे, बापरे.... नी या सर्वांच्या ओझ्यात ही बुद्धी, जी जीवास त्या त्या जन्मापुरतीच लाभलेली असते, ती काय नी कितीसे काम करणार? या साऱ्या पसाऱ्यात ती कशी प्रगती करणार? कारण ती किती किती ठिकाणी धावते आहे. झिजते आहे. विचार करते-गुंतते-तुटते-तोडली जाते-तोडावी लागते-दुखावली जाते आहे. कारण बुद्धी इतक्या ठिकाणी अडकल्यामुळे ती तिची ती मूळ शक्तीच विसरुन गेलेली आहे. नी परिणामी आपण सारेच अत्यंत नाजुक-कमकुवत नी दुबळे-अशक्त-आजारी असा अनुभव करावयास लागलो आहोत. याकडे आपण लक्ष द्यावयासच हवे. या साऱ्यामधे तरीही मन-देह-चित्त हे धरलेलेच नाही. ते या सर्वांवर कडी आहे. हव्यास-लालसा-पिपासा-योग्य-अयोग्य यांची तर भर भरपूरच आहे. म्हणून बुद्धी जर एवढी चालवावयाची-एवढ्या ठिकाणी तीस वापरावयाची तर तिचे हृदयाशी मैत्र हवेच ना? नी बुद्धीशीही मनाचे एकाग्र हवेच नां? या याऱ्यास विवेकाची किनार हवीच. प्रेमाची डूब ही हवीच. ज्ञान-वैराग्याचे आवरण हवे. नी श्रीसद्‌गुरु सेवेचे सारण तर हवेच हवे. असा हा मोदक हवा. तरच इच्छितफल प्राप्तिरस्तु: हा आशिष प्राप्त होईल. म्हणूनच या शिताची ठेवण हृदयाकडे विस्तारलेली नी बुद्धीकडे अग्र असलेली अशी श्रीभगवंतांनी ठेविलेली आहे. असे हे शित अष्टमीस चैतन्यस्वरुप लेते-घेते. म्हणिजे गर्भात चैतन्य प्रवेश आठव्या महिन्यात होतो. हे ध्यानी धरावे. नी हेच शित जीवस्वरुप धारण करुन नवमीस भूमी पादाक्रांत करावयास येते. पण कसे, तर 'श्रीस्वामिरामो' हे जाणून. नी येणारा दास कसा आहे? तर-मनोजवं मारुततुल्य वेगम्। जितेन्द्रीयं बुद्धीमतां वरिष्ठम्। वातात्मजं वानरम् यूथ मुख्यं। श्रीरामदूतम् शरणं प्रपद्ये।। असा आहे. आता बघा, एवढी या आपल्या शिताची झेप आहे का?होउ शकते का? पहा अभ्यासा-मनासी टाकीले मागे। गतिसी तुळणा नसे।। केवढे अफाट

कर्तृत्व आहे हे. कुठे गेले हे सारे? असे विचारल्यावर साहजिकच आपण म्हणतो, अहो, ते देव आहेत. मग बघा ते देव आहेत नी आपण दगड. कबूल केले नां, चला. येथे कबूल करुन घेण्यासाठी हा खटाटोप नाही केला तर, समजले नां नक्की काय-कसे-कोण ते, तर चला सुरवात करुया. आरंभ करुया. नी स्वत:च त्या श्रीदेवालयाचा कळस घडवू या. अहो, आपण हा कळस घडवावा म्हणून श्रीक्षेत्रपंढरपूरास एकाच पायरीवर श्रीनामदेवमहारांजांच्या पूर्ण कुटुंबाने आपले प्राण समर्पित केलेले आहेत. त्यांचे इथे आपणांस स्मरण झालेचि पाहिजे. तयांस येथे आपण साऱ्यांनीच चरणस्पर्श दंण्डवत प्रणाम करायलाचि हवेत. आपल्यासाठी ज्यांनी ज्यांनी जे जे केले ते ते न स्मरताच जगणे म्हणिजे पुढे जाणे नाहीच ठरणार कधी. नी जाताही येणार नाहीच कधी. हेच ४+४=८ चे ते त्रिधा-मेधा-द्विविधा-असे पेड. असे हे वेणीसूत्र आहे.

**श्रीवेणीतील पंचमशक्ती-भूगर्भा.** आता ५ वा पेड. भूगर्भा म्हणावी हीस. हा एक गर्भसंकेत आहे. यास दुर्वा-त्रिशूल-दर्भ-लव्हाळे-उर्ध्वा, असे काहीही म्हणता येईल. एकाच वेळी नजरेस-दृष्टीस-डोळ्यास तीन




दिसणे-तीन एकत्र दृष्टीस पडणे, हे महामहाभाग्याचे आहे. त्यातून सरळ-उभे-ताठ-उंच-उर्ध्व-नी अग्रज असे हे तीन दुर्वांस्वरुप बघणे तर फारच भाग्याचे होय. दुर्वातील त्रिदलानांही हे अग्र असते. एक विशिष्ट प्रकारीचे टोकही यांवर असते. आपल्या दृष्टीत एक विशिष्ट प्रकारची लवचिकता भरलेली असते. जीमुळे आपणास कुठलेही नी कितीही मोठे दृश्य चटकन उचलता येते.

उदाहरणार्थ आकाश-तारे-पर्वत-नद्या-जंगले-माणसांचा समुदाय-बाजार-दुकाने-कळप इत्यादी काहीही. पण तेवढीच कमकुवतता देखील आहे, की सुक्ष्मगोष्टी दिसत नाहीत. या सुक्ष्माकरीताच, या अत्यंत सुक्ष्मशक्तीच्या उत्थापनाकरीताच, या अग्र असलेल्या दुर्वांनी आपण पूजन करीत असतो. सर्व प्रकारीच्या पूजेत म्हणूनच नेहमी पूज्यभाव जीवाने ठेवावयास हवा. आपण सारे भावअंडज आहोत. म्हणिजेच एकाभावामधून उद्भवलेले आहोत. तद्नुषंगे आपण सारे भावंड आहोत. आपले जगणे-पोसणे-वाढणे हे भावावरच अवलंबून आहे. कोरडेपणा-तुटकपणा-आपल्याला सहन होणारा नाही. बघा, अगदी सुंदर-रुचकर स्वयंपाक बनविला, पण तो वाढणारेही कोणी नाही-नी बरोबर जेवणारेही कोणी नाही, मग ते अन्न गोड लागेल कां? सुंदर घर बांधले. छान सजवलेही. परंतु बघावयालाच कोणी आले नाही, त्या बांधल्या घराचे कोणी कौतुकच केले नाही तर? मोठ्या बांधलेल्या घरात एकट्यासच रहावयाची वेळ आली तर जीवास करमेल कां? कीती उदारणे घ्यावीत. आपणांस कोरडेपणा-तो पूर्णतः व्यवहारीपणा नकोच नको. श्रीगुरुंचे दर्शन झाले नी तळमळीचा भाव फुटलाच नाही, तर आपले कल्याण अंतरले नां? आपल्यात अतिउच्चीचे असे अष्टांगभाव आहेत. आठ प्रेमळ भाव आहेत. ते सारे जाणून त्यांचा विकास आपण करावयाचा आहे. हे असे भाव सारे अग्रावर-टोकावर असतात. म्हणजेच उंचावर असतात. नी हेच भाव आपणांसही उंचावरच नेतात, पाहोचवितात. जर कोणी आपला भाव जाणिला, तर त्याशी आपली सहजच मैत्री होते. घट्ट स्नेहबंध-ऋणानुबंध घडतात. नी नाही जाणिले कोणी आपल्यास, तर तिरस्कार-राग-मत्सर-संताप उफाळतो. हे सारे अभाव होत. या असल्या अभावांनी घातच होतो. अभाव म्हणिजे तरी काय, तर ज्यामध्ये आनंद-समज-जाणिव-उत्साह-चैतन्य इत्यादीची कमी असते. त्यामुळे क्रोध निवळला की प्रेम फुटते. ज्यावर क्रोध केला त्याबाबत करुणा येते. हा आपला अनुभव आहे. असे हे सारे भाव, एका आड एक दडलेले आहेत. सर्वात उच्चीचा भाव..तो दासभाव. रामदासी ऐक्यभाव..रामदास खूण दास..रामी राम तोचि दास. म्हणुन अग्र असलेल्या गोष्टी या भाव जागवितात.

जागता ठेवितात. अग्र म्हणिजे टोक. यात अग्रपुजेपासूनं नासाग्रापर्यंत सारेच अंतर्भूत आहे. नासाग्री दृष्टी। मुद्रा शांत। तपोबल अंगी झळकत।। कसे? तर प्राचीच्या बालरविवत. हे वर्णन श्रीश्रीगजाननमहाराजांचे आहे. अग्राने काय अंगी बाणिले आहे, तर तपोबल. ते ही हिर्मुजी रंगाचे. पूर्ण तेज नी शलाकायुक्त प्रचंड गतिमान असे तपोबल. हा केवळ बाहेरुन पांघरलेला वेष नाही. तर हा प्रत्यक्ष प्रवेश आहे. प्रागट्य आहे. प्रविष्ट-प्रविष्टी आहे. श्रीगणेश-श्रीगजाननांना याच अग्रजा म्हणजे दुर्वा आवडतात. कां? याचा शोध घ्यावयाचा-घ्यावयाला हवा. कुणी? हा प्रश्न सोडवावयाचा कुणी? हा ही एक प्रश्नच म्हणायाचा. २१ दुर्वांचे गणितही आपण सोडवून पहात नाही. पाहिले पाहिजे. फार महत्वाचे आहे ते. नी अत्यंत सुंदरही आहे ते. परंतु नुसत्या तयार दुर्वांच्या जुड्या आणून वहाण्याने काय जोड होणार? जीवास या साऱ्याची गोडी वाटली पाहिजे. नी आवडीने-आनंदाने-ओढीने त्याने स्व ग्रंथ वाचावयास प्रस्थान ठेविले पाहिजे, असे श्रीसमर्थांना सांगावयाचे आहे. एवढ्याच करीता तर त्यांची ही तगमग. आपल्या बाळांनी जाणते व्हावे, असे त्याना जर वाटते आहे, तर काय आहे या जाणतेपणात-जाणते होण्यात, हे नको का पाहावयाला? जगी जाणता भक्त होऊनी राहे..हे आपण आदेश म्हणून घ्यावयाचे. तयांचे आदेश झालेत आपणांस. त्या आदेशस्वरुपात हे घ्यावयाचे. तरच कर्तव्याभिमुख होता येईल. होउ शकू आपण. शाळेतील शिस्त नी लष्करातील शिस्त यात कर्तव्य परायणता-कर्तव्य कठोरता कुठे आढळेल? उत्तरासाठी लगेचच बुद्धीजवळ जाण्याचे काही कारण नाही. स्वाभाविकच लष्करातील शिस्त अधिक म्हणावी लागेल. कारण शालेय जीवनात तात-मात-खाऊ-घराचे छत्र असते. नी त्या वयात तशी काही जबाबदारीही नसते. नी जबाबदारीची जाणिवही नसते. म्हणून जरी श्रीसमर्थांनी आई-तिची वत्सलता-आपणांस पोर समजून, लेकरु या भावनेने जीवास हे सारे सांगितलेले असले, तरीही जीवाने हे सारे 'ज्ञानाधिष्ठीत लाड' पुरवून घेताघेताच कर्तव्यपरायणही व्हावयालाच हवे. त्या कर्तव्यपरायणाचेच नाव या पृथेवर राहणार आहे. त्याचेच नाव राहिल. हिच ती लष्करी शिस्त, जीत स्व सवलत घेता येत

नाही. परंतु त्यामुळेच 'घडतो' नी अशा घडणाऱ्यांचेच नाव पृथ्वीवर राहिल. त्याचेच नाव ही पृथा अभिमानाने घेईल. त्याचेच नाव या पृथेवर लागणार आहे. प्रातःस्मरणीय होणार आहे. म्हणून ध्येय नी ध्येयावरच नजर हवी. म्हणिजेच अग्र ठेवावयाचे आहे. भल्या पहाटे दुर्वा वेचणे-दवात भिजलेल्या दुर्वा वेचणे. हा एक सर्वांग सुंदर व्यायाम आहे. या दुर्वा स्वतः जाउन खुडून आणल्याने रक्ताभिसरणास मदत होते. रक्तातील गाठी-रक्ताच्या गाठी-अथवा रक्तात साखर-पाणी-जंतूसंसर्ग या साऱ्यांपासून या दवात भिजलेल्या दुर्वा जीवास सुरक्षित राखतात. तसेच कानाच्या दोन्ही पाळी, नी दृष्टी, यांवर या अग्रदर्शनाचा एक शक्तीयुक्त परिणाम होतो. अतिदूरचे संवेदन-श्रवण-चाहूल-दृश्य-दृश्यभान इत्यादी गोष्टीस याचा पुरवठा होतो. दुर्वास धारण करणाऱ्या देठाकडून म्हणजेच दुर्वांच्या देठाकडून आपणास चिकाटी-चिवटपणा नी सातत्य राखण्याची तैलबुद्धी प्राप्त होते. दुर्वा आडव्या-उभ्या यातही एक सुत्र आहे. दुर्वांची देठे पाण्यात बुडवून त्या देठांनी जर घरात शिंपण केले, तर कशाचीही भीती-बाधा राहत नाही. आजारी माणसाच्या डोक्याशी ताज्या दुर्वा आणून ठेवाव्यात, त्या जेवढ्या सुकतील तेवढा तो लवकर योग्य होतो. या साऱ्या गोष्टी जीवासाठी आहेत. या दुर्वा केवळ श्रीगणेशांना वाहण्या पुरत्याच नाहीत, याकडेही श्रीसमर्थ आपले लक्ष वेधीत आहेत.

**..सं कष्ट चतुर्थी म्हणिजे काय..**

१४ विद्या नी ६४ कलांचा जो स्वामी. जो सर्व गोसावीयांत मुख्य गोसावी. जो सर्व गणांत अग्रणी अशा श्रीगजाननांस जर दुर्वा आवडतात, तर तिचा शोध-विचार-संशोधन-अभ्यास व्हायलाच हवा. अभ्यास-अभ्यास नी अभ्यास व्हावयालाच च च च हवा. किती किती अंगांनी व्हायला हवा. प्रतिपदेतून द्वितीया नी तृतीया उमगून चतुर्थी. नी हे चतुर्थीचे श्रीगजाननरुप जीवाचे ते संकष्ट निवारण्याहेतु सिद्ध आहेती. उभे आहेती. शिवाय ही संकष्टी एका पक्ष पंधरवड्यानंतर दुसऱ्या पंधरवड्यात येण्याचे काय प्रयोजन? या साऱ्याचाच अभ्यास व्हावयास हवा. १३ प्रकारची सं कष्ट जीवास भोगावी लागतात. संकष्ट म्हणिजे कर्मातून-स्व कर्मातून

उद्‌भविलेली गती-भोग-जीवास कुठल्या ना कुठल्या प्रकारे याच पृथेवरती भोगावीच लागतात. हेच जीवाचे बद्धपण होय. हे बद्धपण वर्णन करतांना नी जीवास मुक्तावस्था किती किती बा महत्वाची, हे समजावून देण्याकरीता-जाणवून देण्याकरीता श्रीमहाराज सांगतात, संचित-प्रारब्ध-क्रियमाण।हे भोगल्यावाचून। या बद्ध जीवालागून। सुटका होणे नसे।। नी आपण कीती बाजूंनी ही मुक्तावस्था अनुभवू शकतो तर अ उ म स या चारही बाजूंनी. चहूदिशांनी. याच त्या च्यारीमुक्ती होत. हीच चतुर्थी. हाच चतुर्थ योग. बघा आपण कितीबाजूंनी मुक्त आहोत ते. नी ही मुक्तावस्था न जाणून बद्धावस्थाच भोगित बसलो आहोत ते ही बघाच बघा. तर या सान्यातून बाहेर येण्याकरीता-बाहेर पडण्याकरीता हा त्रिशूल-दिशादर्शक-मार्गदर्शक-दुर्वा-तृतीया-त्रयाग्रधारिणी-त्रिज्या-अग्रजा-हरळ-हरद्रु-शुभांगिणि-नवरत्ना-प्राप्या-दिव्या. एवढ्या नामाभिधानाच्या या दुर्वा किती महत्वाच्या आहेत बघा. **ही सारी आपण श्रीसमर्थांकडून आपलीच ग्रं रचना समजवून घेत आहोत. नी आपणांस एकदा का ती नीट नी व्यवस्थित उमगली की आपणांस कुठलेच कष्ट अथवा चिंता-दारिद्य-आजार उरणार नाहीत. पूर्ण आरोग्यं धनसंपदेनी नी सर्व ऐश्वर्याने आपण या पृथ्वीवरती वास्तव्य करणार आहोत.** हे ध्यानी धरावयाचे आहे. म्हणूनच आपण ही एकातून एक अशी ही उलगडत जाणारी सूत्ररचना, जसे जसे श्रीसमर्थ समजावित आहेत, तशीच समजून घ्यावयाची आहे. जसे एका दालनातून दुसऱ्या दालनात जावे तसेच येथे एका विषयातून दुसऱ्या विषयाकडे आपण जात आहोत. कारण तसाच 'श्रीसमर्थ मानस' आहे. मूळ विषय तर ग्रं हा आहेच, परंतु त्या ग्रं च्याच या शाखा उपशाखाही अत्यंत महत्वाच्या आहेत. नी त्या पुन्हा श्री उमजून देत आहेत. पक्षी जसा या फांदीवरुन त्या फांदीवर विहरतो तद्‌वतच आपण फक्त स्वैर विहरायाचे नी ते आनंद मुक्तीज्ञान घ्यावयाचे आहे.

श्रीसमर्थ सांगतात, ज्ञानमार्ग हा उलगडत जाणारा आहे. ती उलगड आहे. जसे आपण एखाद्या वस्त्राची घडी आपल्या हाताने उलगडावी, तसेच हे ज्ञानही आपणांस स्वतःचे स्वतःसच उलगडता येणार आहे. फक्त त्यासाठी

श्रीगुरुंवर अढळ विश्वास हवा. तर नी तस्च हे वस्त्र आपणांस जशी घडी घातिलेली आहे तसेच लाभणार आहे. नाहीतर आता हाती असेलेले वस्त्र, हे विस्कटलेले-विरलेले-जीर्ण झालेले-पूर्ण नसेलेले-तोकडे-अपुरे-कोणीतरी आधीच अर्धवटसे उलगडून ठेविलेले-गाठीचे-मलीन, असे आहे? काय श्रींचा अधिकार आहे बघा. आपणांस लाभलेल्या वस्त्राची काळजी आपल्यापेक्षा श्रींनाच किती आहे बघा.

**..प्रथम संकष्ट - संवरीष्ठ..**

आता थोडक्यात आपण ते संकष्ट निवारण हेतू त्या संकष्टांचा विचार करु या. एकुण १३ प्रकारीचे हे कष्ट जीवास पडतात. त्यातून सुटण्याकरीता हे संकष्टचतुर्थीव्रत आपण करतो. बघा, पहिले सं कष्ट. संकष्ट म्हणजे संकट नव्हे, तर जीवाने अज्ञानाने-भ्रांतिवश ओढवून घेतिलेल्या समस्या होत. पहिले संकष्ट ते संवरीष्ठ. सं म्हणजे आज्ञापालन करणे. थांबणे. स्थिर रहाणे. स्थिरता असणे. शेवटास नेणे. अथर्व असणे. शेवटास जाणे. स्थापिणे, अशा अर्थाने. अतिपूर्व गिर्वाणातील हा अर्थ श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. इतर ठिकाणी न म्हणजेच अनुस्वारात न ची लुप्तता कशी होते बघा, अंश-वंश-भ्रांति-सुंदर, या साऱ्या शब्दांमधे न हे अक्षर अनुस्वारातून आपणास भेटते. प्रत्यक्ष न हे अक्षर येथे दिसत नाही. परंतु येथे सं या अक्षराचा कसा उच्चार होतो बघा- सं म्हणिजे सम्-षं-वं-तं-कं-रं-अं-मं, या अक्षरांच्या उच्चारात न ऐवजी म चा उच्चार येतो. याचा अर्थ अनुस्वार हा एक वेगळाच अभ्यास आहे. परंतु या संवरिष्ठ या संकष्टात मात्र न लुप्त नसून म लुप्त आहे. नी म म्हणिजेच चैतन्यास न ओळखिल्यामुळे-म्हणिजेच स्व-जाण-स्व ओळखून-स्वाभ्यास न केल्यामुळे-ज्ञानमार्ग न धरिल्यामुळे जो त्रास होतो-ते सारे संकष्ट, त्यातीलच हे एक असे ते म्हणजे सं वरीष्ठ. म्हणिजेच तपःस्थानापासून च्युत होणे होय. सं जीवास लाभला, परंतु आपल्या मी ने, अहंकाराने-चुकीच्या मार्गाने-पद-पथभ्रष्टतेने-श्रीगुर्वाज्ञा न पाळील्याने-श्रीगुरुनिंदा ऐकील्याने-केल्याने होणारे कष्ट-पडणारे भोग या मार्गात येतात. साधना नष्ट होणे-शौच्य न पाळणे. आदी भागही यात

येतात. स्पष्ट मार्ग दाखवूनही पद-पथ-भ्रष्ट झालेल्यांस या मार्गातून भोग भोगावे लागतात. या भोगांस घोर अशी संज्ञा आहे. श्रीटेंबेस्वामींचे..घोरात् कष्टात् उद्धरात्..असे एक पदही आहे. हे अत्यंत घोर असे कष्ट असतात. हा गुंता सुटता सुटत नाही. उकल होणे अवघड होऊन बसते. बुद्धीदात्याने बुद्धी दिलीच हो..पण तिस चालविणारा हवा नां. मृत्तिकेची भींतही चालेल बघा ज्ञानाने. तसे पार्थिवाची ही बुद्धी ही जडभिंती? ही भींती चालविण्यास श्रीगजाननच हवेत. हे न जाणिल्याने यात कष्ट पडतात.

**..द्वितिय संकष्ट - संस्पष्ट..**

संस्पष्ट कष्ट. जीवास वाटत असूनही-मन सांगत असूनही वेगळ्याच मार्गाकडे जाउन, नसताना ओढवून घेतलेले संकट म्हणिजे सं स्पष्ट कष्ट होत. दैव देते नी कर्म नेते अशी अवस्था. या अवस्थेमधेही तो दयाळू परमेश्वर-असे करु नका, असे वागू नका, असे जीवास सांगणारे-जपणारे-तारणारेही भेटवितो. परंतु बुद्धीवर काय पडदा पडलेला असतो कुणास ठाऊक. तो काही केल्या दूरच होत नाही. नी परिणामी जीव शरीरवस्त्रास गमावून बसतो नी नंतरही त्यास अनंतजन्म उत्तमयोनी प्राप्ती होत नाही. अहो वर्गात गुरुजींचे ऐकीले नाही-अभ्यास केला नाही-परीक्षेत पास झाले नाही तर खालच्याच वर्गात रहावे लागते ना? येथे तर वरचा वर्ग-नराचा जन्म मिळूनही-लाभूनही पतन व्हावे? कुठून चांगली योनी घ्यावयाची? कसे नूतन वस्त्र घ्यावयाचे? वास्तविक सं चा अर्थ गति पावणे आहे. स्थिर होणे आहे. कुठलीही गोष्ट शेवटास म्हणजे मुक्कामास-थेटपर्यंत नेणे आहे. परंतु याची जाणच न होता, ओळखच न होता, कसेही आचरण करण्याने, काहीही घडते आहे. नाहीतर अकस्मात-अचानक-एकदम-एकाएकी-काहीच माहित नसताना-एकदम उद्भवणाऱ्या अशा व्याधी-आजार यापूर्वी नव्हते. हृदय बंद पडणे-रक्तदाब वाढणे-डोक्याच्या, कानाच्या नसा कमजोर होणे-साखर वाढणे-लवकर थकणे-श्रम होणे-फिट-भोवळ येणे-बुद्धीमांद्य-विस्मरण-आलस्य-अज्ञान या साऱ्यामुळे मन उदास राहाते. नी उदास मन रक्तात चैतन्य खेळवित नाही. परिणामी रक्त संथ होते. म्हणिजेच साचते. साचणे म्हणिजे घाण-नासणेच. गटार-

रोगराई-रोगजंतू-अस्वच्छ-याच दिशेने बोट दाखवून श्रीमहाराज श्रीपितांबरांस सांगतात, जा जाउनी ओढ्याप्रत। तुंबा भरुन आण पाणी।। त्यांस श्रीपितांबर उत्तर देतात की हे गुरुराया, ओढ्यास पाणी अल्प सदया। पाण्यात तुंबा बुडवावया। मुळी नाही अवसर।। इतुके असुनी ते पाणी। खराब केले गुरांनी। तेवी जाणाऱ्या येणाऱ्यांनी। नाही पिण्याच्या योग्य ते।। तेव्हा श्रीमहाराज वदले, दुसरे पाणी आम्हा नको। नाल्याचेच आण पाणी। आंत तुंबा बुडवोनी। उगीच ओंजळी ओंजळीनी। तुंब्यात पाणी भरु नको।। नाल्याचे पाणी श्रींनी प्यावयास मागितले. का तर वरवर ते घाण दिसते आहे. परंतु ज्ञानमार्गाने जर आपण पाहिले तर कुठेच-कुणातच ही मलीनता आढळणार नाही. सारीकडे स्वच्छच पवित्रच आहे. हे श्रींना या लिलेमधून जीवास सांगावयाचे आहे. ही श्रींची लीला श्रीगजानन विजय ग्रंथात आहे. पण ती केवळ वाचण्यापुरती-पारायणापुरतीच मर्यादीत राहिली तर कठीण आहे. दिव्यदेह धारण करुन, निर्गुण परमात्मा धरेवर येतो. मानवास काय काय शक्य आहे-साध्य आहे-ते सांगण्यास-दाखविण्यास हे अवतार होतात. अवतार काळातही ज्या लिला होतात-घडतात, त्याही मानवांस शक्य होतील अशाच दाविल्या जातात. त्या आपणास अमानवी-अतिंद्रिय वाटतात. कारण अज्ञान-अभ्यासाची उणिव. नी स्वजाणिवेचे पूर्ण विस्मरण. पण आपणास जे जमेल-जमू शकेल ते नी तेवढेच आई आपणास शिकवेल ना? नी आईच जर शिकवेल, तर काय एक ते न उमजेल? अतिंद्रीय.. परी भोगवीन इंद्रियांकरवी, अशी श्रीमाऊलींची ब्रिदावळी आहे. याच आनंदाच्या खाणीला आपण आंचवतो. नी उगाचच नष्ट-दुष्ट-संदेहाने दुःख भोगीत राहातो. तिच तर आपली अवस्था श्रीसमर्थांना पहावत नाही. नी ते मग हे सारे सांगण्यासाठी, आपल्या ग्रंथाची पाने आपल्याला उघडून दाखवितात. बोट धरुन वाचावयास शिकवितात. लिहावयास शिकवितात. श्रीची गाठ फोडायला शिकवितात. श्रीग्रंथी-श्रीगाठ-श्रीग्रं-ग्रं हेच मूळ. गायत्री-ग-सारीकडे ग अग्र. दिसामाजि काहीतरी ते लिहावे। प्रसंगी अखंडीत वाचीत जावे। गुणश्रेष्ठ उपास्य त्यांचे करावे। बरे बोलणे सत्य जीवी धरावे।। किती सोप्यातून-सहज-

सुंदरातून ही अप्रतिम घडण श्रीसमर्थ करीतात. हृदयात गाठी होऊन ते फुटण्यापर्यंत नी त्याची निर्धारीत गति थांबण्यापर्यंत जीव अंधारात राहातोच कसा? अरे जाग..जाग-स्वरुपी जाग. जाण स्वतःस. स्व ओळख करुन घे. या जागण्यासाठी जोडाक्षरांचा अभ्यास हवा. त्यांच्या उच्चारणाचा अभ्यास हवा. परिपाठ हवाच हवा. जसे, भीमरुपी महारुद्रा..वज्र हनुमान मारुती..,हे श्रीमन्मारुतीस्तोत्र ९ वेळा नीट-सुवाच्य-बिनचुक, ओळीत-अक्षरात एकसारीखे अंतर ठेवून, अक्षर मोकळे-सुंदर-दोन्ही बाजुंस समास सोडून-एका खाली एक नीट जाणून लिहीले-अभ्यासून लिहीले अथवा पुर्वाभिमुख होउन रोज म्हणिले तर आजही आपण प्रसन्नता-शुद्धता-उत्साह अनुभवू शकू. नी तीही पैसे न खर्चकरीता हे विशेषे ध्यानात ठेवा. नाहीतर नुसते तांबूगायीवरील निबंधासारीखे लिहीणे व्हावयाचे हे. लेखणी नी कागद. अक्षर, भैंस बराबर. नी मन? वो है कहांपर? अशापद्धतीने नाही लिहावयाचे. तर जाणून लिहीणे. नी असे लिहीण्याचा जर परिपाठ ठेविला, तर हृदयरोगातून सुटका. स्वच्छ-मोकळा नी भरपूर श्वास. नी तोही आपला हक्काचा घ्या. विकतचा नाही.

बघा, श्रीव्यास महाशयांनी श्रीगणेशांना जेव्हा श्रीमहाभारत रचनेत, लेखन साहाय्याची प्रार्थना केली, तेव्हा श्रीगजानन वदले, श्रीलेखनात सहाय्य करीन परंतु एक पथ्य आहे. तेव्हा त्या काळी अटी-तटी-शर्ती नव्हत्या. मानवाने या सोन्यासारख्या नरजन्माचा फार सारा खेळ करुन घेतिला आहे. पण अशाही अवस्थेतून आपणांस बाहेर काढणारे आहेत..आहेत आहेतच. कसे ते आपण श्रींच्या लिलेवरुन पाहिलेच आहे. श्रीगजाननमहाराज सांगतात, जा तुंबा बुडव. वरुन जरी घाण-अस्वच्छ वाटले तरी, आत-तळात चांगले-स्वच्छ-साधेसुधे स्वच्छ नाही तर, शुद्धतेतही स्फटीकासारखे शुद्ध, असे पाणी तुला गवसेल. म्हणजेच शुद्धआचरणच येथे श्री दाखवित आहेत नां. आपण आजही श्रीसद्गुरुंना ही शुद्धता देऊ शकतो. याचा अर्थ काय, तर आजही आपण शुद्धच आहोत. फक्त ती शुद्धता विसरलो आहोत एवढेच. स्फटीक या धातुचे गुणधर्म येथे पूर्णपणे देता येत नाहीत. तो एक वेगळा विषय ठरेल. पण खरा स्फटीक जर प्राप्त झाला तर त्याच्या

पूजनाचे फळ विशेषे आहे. माणूस फक्त पैसा-चैन-आरामच पाहतो. हे सारे मिळाले तरच त्यास फळ मिळाल्याचा आनंद होतो. परंतु या साऱ्यापुढे ते श्रीपरमफळ तो पाहत नाही. त्यास ते अज्ञानवश दिसतही नाही. हेच तर त्याचे दुर्दैव आहे. नी दुर्दैवानेच तर हे सं स्पष्ट-सं कष्ट आहेत नां. ज्ञानाने जीवास विवेक वर्धनाचे फळ प्राप्त होते. म्हणून श्रीमहाराज वदले, बघ, अरे तळवेही पदाचे भिजणार नाहीत. एवढेसे तर हे पाणी. त्यात अस्वच्छता तुज दिसते. मला तर मुळातले-तळातले दिसते आहे. तुझे पाहणे वरवरचे. उतर-उतर त्यात खोल. मुळात जा. आत जा. कर अभ्यास नी खोल बुंथी घेउनच ये. मग बघ तुझा तू राहाणार नाहीस. अरे अरे ज्ञाना झालासी पावन..तुझे तुज ध्यान कळो आले. फार आनंद..फार आनंद..पण वरवर पाहून नाही लाभणार हा आनंद. हेच श्रींना या लीलेतून सांगावयाचे आहे. नी श्रीमहाराजांना जसे सांगावयाचे आहे तसेच आपण घेतिले तर आपलाही तुंबा खोल बुंथी घेऊन स्वच्छ होईल. स्फटीकासारखा होईल बघा. तुंबा म्हणिजे मस्तकस्वरुप घ्यावयाचे येथे आपले. ते शिर्ष, ते अभ्यासात-मुळात-ज्ञानात-विवेकात-जाणिवेत घाला-तळाशी जा. आपणही हा तळच तर पाहतो आहोत नां. परावाणिची ही सुदर्शन अवस्थाच आपण पाहत आहोत नां. ही एक एक उलगड त्यातीलच तर श्री समजावित आहेत नां. मुळसूत्र ग्रं त्यातून फुटलेला हा धबधबा..कसा तर, धबाबा तोय आदळे..असे आपणास चिंब करणारे-धुवून काढणारे. आपले मलिनांग पवित्र करणारे श्रीसमर्थांचे हे वात्सल्य. हा वात्सल्यसिंधु नी आपला बालबिंदु. तान्हाबिंदु. होणार..मिलन नक्कीच होणार. बिंदु सिंधुसी मिळणारच. जो या ग्रंथी ठेविल भाव। तयासी पावेल स्वामीराव। संकटी त्याच्या घेईल धाव। रक्षण त्याचे करावया।। ठाम सांगणे. रोखठोक सांगणे. मागेपुढे नाहीच. स्पष्ट. सत्य. आपला भाव महत्वाचा. विश्वास महत्वाचा. 'भावा'शिवाय करणे म्हणिजे आपणच आपला घात करणे होय. नुसतीच धावाधाव करुन काय प्राप्ती होते आहे याकडे कोण बघणार..? भावबळे आकळे-एरव्ही ना कळे, हा सारा आत्मयाराम आहे. त्याचे दास्यत्व करण्याने-सेवाभावाने त्यास आपलासा करण्याने, जीवास बुद्धी-कल्पना-

अपेक्षा-स्वप्नापलीकडील प्राप्ती निःसंशय आहे. म्हणूनच अटी-शर्ती सोडून पथ्यपालन जेव्हा आपणांकडून होईल तेव्हा हे ज्ञान जीवास सुलभ होईल. पथ्य म्हणजेच मर्यादा. नी मर्यादा म्हणिजेच प्रभुश्रीराम. मर्यादापुरुषोत्तम भगवान होत.

तेव्हा श्रीव्यासमहर्षींना श्रीगजाननांनी सांगितले की, मी एकदा लेखणी हातात घेतिली की, ग्रंथ संपेपर्यंत तीस खाली ठेविणार नाही. नी मधे थांबणारही नाही. बघा आता इथे जरा आपला ग्रंथ-एखादे पोस्टकार्डसुद्धा पहिल्यापासून शेवटपर्यंत व्यवस्थित, एकसारखे एकावेळेस लिहीता येत नाही आपल्याला. मोकळे-सुंदर-अक्षरांवर रेघा-सुवाच्च-सुस्पष्ट-वाटोळे-मोकळे लेखन-जसे सुरवातीस तसेच शेवटपर्यंत अक्षर असे. नी पूर्णविराम देऊन लिहीलेले नव्हे, तर दंड।। योजून लिखाण केलेले. आपल्या भाषेतले हे महत्वाचे सूत्र आहे. दंडसूत्र. अक्षर, ज्यास क्षय नाही-ज्वर नाही-जरा नाही. ते अक्षर, अक्षरावरुनही स्वभाव सांगता येतो. पण तो फक्त स्वभावच सांगता येईल. स्वभाव असा कां? नी तो कशाने बदलेल किंवा चांगला होईल, हे सांगणे श्रीसमर्थांच्याच अखत्यारीतील आहे. श्रीगजाननांच्याच अखत्यारीतील आहे. केवळ लेखनानी आरोग्य विधीवत म्हणिजे चांगले राहते. हा शोध नव्हे तर हा बोध आहे. बाळबोध. तोही आपण घेतिलेला आहे पण विसरुन गेलो आहोत. पैसा खर्च करुन औषधांवर जगण्यापेक्षा रोज लिखाणाचा परिपाठ ठेवणे योग्य नव्हे काय?उत्तम नव्हे काय? विचार व्हावयास हवा नां. आत्ताच्या या संगणकयुगात आता कुठले लेखन होणार म्हणा?पण म्हणूनच हे नाना रोग नी दुर्बल मने-कमकुवत शरीरे नी जर्जर घरे झाली आहेत नां? यंत्रांनी आपली स्वतंत्रता पार खाउन टाकिली आहे. सोयी त्या त्या गैरसोयी झाल्या आहेत. किती परावलंबित्व आले आहे नां आपणांस. नी ते शरीरापासून मनापर्यंत सान्यासच आलेले आहे. आपले स्वावलंबन आटोपले, हेही कोणाच्या गावी आता नाही. काय करावयाचे..हेच उशिरा कळणार आहे. परंतु असे व्हायला नको, हीच श्रीसंतांची तडफड आहे, तगमग आहे. तेवढी कळो-समजो-उमगो-पाहोचो, आपल्यापर्यंत म्हणिजे झाले. बुडते हे जन देखवेना डोळा। म्हणूनी कळवळा

येतो अंतरी।। इतके सारे सोपे असून-समोर दिसत असूनही जीवाने ते अवघड करुन घेणे नी कष्ट भोगणे यासच सं स्पष्ट असे म्हणतात.

**..तृतीय संकष्ट-संत्वष्ट ..**

तृतीय कष्ट संत्वष्ट. म्हणिजे श्रीब्रह्मदेवांनी, विधींनी लिहीले ते नाकारणे-चेष्टा करणे-त्याविरुद्ध वर्तन ठेवणे-श्रीसंतांची निंदा-ग्रंथांचा अवमान-पुजा-इत्यादी विधी न करणे-नाकारणे-त्यांचा उपहास करणे-कुळधर्मांविषयी अनास्था-प्रसाद नाकारणे-याप्रकारातून-या संबंधीच्या कर्मामधून हे कष्ट उपजतात. त्वष्ट म्हणिजे श्रीब्रह्मदेव-श्रीविश्वकर्मा यांसाठी वापरले गेलेले नाम आहे. त्वष्ट्र म्हणिजे तांबे धातू होय. जे जे शक्तीवाहक आहे त्यास फार जपावे लागते. कुठेही विजेच्या प्रवाहास हात लागला की झटका बसणे स्वाभाविकच आहे. मग तो जाणून अथवा अजाणता कसा का लागेना. परिणाम गंभीर होणारच. या कारणे श्रीब्रह्मदेव-श्रीविश्वकर्मा यांसंबंधी ते वापरले गेले. चुका होणे-चुक करणे-चुकतच शिकणे या सवलती घेणे आहे. दोषांस पोसणे आहे. दोषांवर पांघरुण घालून त्यांसोबत आपणही निद्रा घेणे आहे. निंदकाचे घर असावे शेजारी..या पठडीत आपण कधी येणार? एवढेसे तेवढसेही ऐकून घेणे आताशा कुणाकडून होत नाही. सहनशक्तीच उठून गेल्यासारखी झाली आहे. आपल्या हिताचं आहे हे, हे ही जाणून घेताना कुणी दिसत नाही. राग सर्वात वर असतो. शत्रूत्व त्याहीवर. मान अपमान त्याहीवर. बोच-वेदना त्याहीवर. त्याहीवर अहंकार-स्वार्थ-आपलाच विचार. त्याहीवर प्रतिष्ठा. त्याहीवर यासर्व मुर्खलक्षणांचे, अवगुणांचे कौतुक करावे ही अपेक्षा. काय म्हणावे या निद्रेला? सर्व जाणण्याची बुद्धी देऊन सुद्धा जर तिस वापरलेच जर नाही नी नुकसान नुकसान म्हणून ओरडत बसलो तर काय होणार? अहो आपण रोप लाविले, तर त्यावर बहराच्या कळ्या देण्याचे श्रीभगवंतांचे काम. ते तर ते देणारच हो. पण इथे रोप तर लांबच-दूरच-अंतरावरच. अजून रोपासाठी लागणारी ती मातीही गोळा होताना दिसत नाही. तो विचारही नाही. रोप लावावयाचे म्हणिजे ते आधी कुठल्या मातीत लागते, हा विचार, हा शोध करावा लागतो. तशी माती तयार करावी लागते.

मातीसाठी शोध घेणारी मति हवी. मति म्हणजे तपःश्चर्येसाठीची स्थलनिश्चिती. तद्नंतर माती. तीस कसदार बनविण्यासाठी तुडविणे-धोपटणे-फोडणे-भाजणे-जाळणे-नांगरणे-वाफे करणे-चर खणणे-बिज निवडणे-बिज पेरणे-पेरणी-मशागत करणे, या साऱ्याच गोष्टी हव्यात. आवश्यक आहेत त्या. म्हणिजे किती उच्चअर्थाने घ्यायला हवे हे सारे आपण. माती तुडविणे म्हणिजे मनास सर्व बाजूंनी जननिंदा सहन करण्यास तयार करणे-सक्षम करणे. कारण लोक पायीही चालू देत नाही नी घोड्यावरही बसू देत नाहीत. असे आपले वाडवडील एका वाक्यात या जनमनांची ओळख करुन देताना सांगत. ऐकावे जनाचे करावे मनाचे. हे असे मनाचे ऐकणे त्या काळी शक्य होते. त्यावेळी मनं खूप पक्क असे. टि.व्ही.-निरनिराळ्या यंत्रांमुळे आलेली गुलामगिरी-मनाची दुर्बलता-जाणिवेचा अभाव-व्यवहाराचे प्राबल्य, असल्या घातक नी मन-बुद्धी-आरोग्यावर परिणाम करणारे काहीही त्याकाळी नव्हते. म्हणून ते पक्क होते. आता मन हे गुलाम आहे. नी गुलाम म्हणिजे दुबळा-अशक्त-कमकुवत असाच असणार. तो काय तग धरणार? बरे सत्य बोला..यथातथ्य चाला..बहु मानिती लोक येणे तुम्हाला..,हे देखील आता बुद्धीच्या, सामान्यपातळीवरही कळेनासे झाले आहे. समजत नाही हे एवढेसेही. ग्रहणशक्तीच कमी करुन घेतिली आहे आपण आपली. कारण ग्रहणात खायचे नाही. स्थिर रहावयाचे. काही अध्यात्मिक बैठक करावयाची असते. काही सात्विक-सत्संग-ग्रंथवाचन-मनन-पठण-जप-अनुष्ठान-लेखन करावयाचे असते. असे पटले नाही नां. पटत नाही नां..म्हणून आले हे बुद्धीमांद्य. नी हे आज नाही घडत आहे. किती दिवसांचे हे असेच चालू आहे. नी परिणाम आपण पाहतच आहोत. मुळचं आपली कुसरीकडे रुजवली नां आपण, तेव्हापासून आले आहे हे पेच. बघु या ग्रहणात खाऊन काय होते ते, का..ही होत नाही. उगाचच नावे लावलाय आपल्या काही न् काही. हे असे बोलणे म्हणिजे काही संशोधन नव्हे आपले. हे आपल्याच पुर्वजांना नाकारणे झाले. पुर्वज वेडे नव्हते आपले. त्यांनी या साऱ्याचा परिणाम पाहिला होता. तो जाणून त्यांनी प्रयत्नपूर्वक तो नोंदवून ठेविला. नी

आता आपण फक्त तसे वागून आपले हित करुन घ्यावयाचे आहे. पुन्हा आता याचा शोध घेत बसावयाचे नाही, तर या शोधापासून पुढे जात ते मुळ गाठावयाचे आहे. तो ग्रं उलगडून घ्यावयाचा आहे. थेट पोहोचून कुळ उद्धरावयाचे आहे. तसेही खावयाचे-जेवावयाचे तर आहेच हो आपल्याला. अन्न हे पूर्णब्रह्मच आहे. पण ते ब्रह्मच जर आपणांस सांगते आहे की आत्ता या क्षणी माझे सेवन केल्यास काही विपरीत घडेल असे. नी तरीही बघू काय घडते, म्हणून जर ते आपण सेवन केले, तर त्यात नुकसान कोणाचे? नी जर या गोष्टी श्रद्धा किंवा नैतिकबंधन कींवा आवश्यक नियम म्हणून पटल्या नाहीत, तर संशोधन करावे-अभ्यास करावा. म्हणिजे मग उमज पडेल साऱ्याची. आपले पूर्वज़ खूप हुशार होते, यावर विश्वास ठेवा. बरे त्यांनाच जर आपण वेड्यात काढत असू-मूर्ख म्हणत असू तर आपण त्यांचीच बाळे नां? मग आपणही ते मु...नको, हा धोका न पत्करण्याएवढे आपण लबाड या अर्थी-हुशार आहोत. हे असे का म्हणावयाचे, तर स्वत:बाबत न्याय नी दुसऱ्याबाबत अन्याय अशावृत्तीने आपले भले नाही व्हायाचे. जगसे चाहे भागले कोई..मनसे भाग न पाए..तोरा मन दर्पण कहलाए..भले बुरे सारे कर्मोंको..देखे और दिखाए..आता? अगदी आत्ताआत्ताचं आहे हे पद. ऐकिले तर गाणे. जाणिले तर अभ्यास. जाणिवेतूनच-जाणण्याच्या उत्सुकतेतूनच अभ्यास सुरु होतो. तो तरी या साऱ्या संदर्भात करावा. नुसतेच नाकारत नी त्यामुळे काहीही स्विकारत सुट्र नये. घात आपलाच होणार आहे-होत आहे-झालाही आहेच. आपल्या या अशा वागण्यामुळे त्या श्रीपरमचैतन्यात त्या कोमलहृदयात खंत मात्र वाटणार आहे. वाटते आहेच. अरे, न जाणता हे करु नका. विनाशकाले विपरीत बुद्धी. म्हणी.. हा एक पूर्वजांनी शोधिलेला सुंदर वाङ्मयप्रकार आहे. थोडक्यात पण महान आशय व्यक्त करणारी सुंदरसूत्री म्हणिजे म्हणी. श्रीसमर्थांचे मनाचे श्लोक तर तत्वज्ञानाचेही तत्वज्ञान आहेत-जिवा श्रेष्ठ ते स्पष्ट सांगोनि गेले। परी जिव अज्ञान तैसेचि ठेले। देहेबुद्धीचे कर्म खोटे टळेना। जुने ठेवणे मी पणे आकळेना।। समजले तर हित. नाहीतर, अहित तर आता उघडचं दिसते आहे. शुद्धता हरवली. दवाखाने

वाढले. कशानेही-कशापासूनही रोग व्हायला लागले. पुर्वी आठवत असेल तर बघा, घरोघरीचं चाटण-मात्रांचे ज्ञान होते. कशाने काय होईल-होऊ शकेल याबाबत माहीतीही होती. मुळात अन्नपदार्थांमधून-शेतिपोतितील आनंदातून-कष्टमार्गातून-घामामधून-मनमोकळ्या वातावरणातून-मनमोकळ जगण्यातून-निसर्गाच्या भरपूर सान्निध्यातून-सर्वांच एकत्र असणं-राहणं-एकत्र येणं, इत्यादी साऱ्यांमधून एक वेगळ्या प्रकारीचे जीवाचे पोषण होत असे. आजही शेतात-खेड्यात राहणारे नी शहरात राहणाऱ्यांमधे शरीर-बल-बुद्धी यातील फरक स्पष्ट जाणवतो. ती माणसे अधिक कडक नी सक्षम असतात. एवढेच काय तर शहरी जीवनास कंटाळल्यानंतर आपणांसही गावाकडे कुठेतरी अशाच ठिकाणी जावेसे वाटणे, हे काय आहे..तर ही मुळाकडे धाव घेणारी माती आहे. जाणिले तर सारे आपले. या उंबरठ्यावर उभे असलेले मनं, त्याने शेवटी कुठे धाव घ्यावी? परत धडपडीकडे की तुळशीकडे? म्हणिजेच परमशांतिकडे धाव घ्यावी की पुन्हा धडपडीकडे धाव घ्यावी? अभ्यास करावा लागेल. हे सारे अज्ञान निर्शनाकरीता श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. आपण हे सारे, आपणांस समजावे म्हणून, श्रीसमर्थांच्या सांगण्यानुसार यत्न तोचि देव जाणावा.. या मार्गाने हे जाणून घेतिले पाहिजे. मना गूज रे तूज हे प्राप्त जाले। परी अंतरी पाहिजे यत्न केले। सदा श्रवणे पाविजे निश्चयासी। धरी सज्जन संगती धन्य होसी।। असे जाणून-असे म्हणून ही माती-ही मति तुडविली पाहिजे. तुडवून काय होते तर, कोमलवेली-सुंदरफळे, रुजविण्यास ती माती सक्षम होते. उगेचच मंडपा वेली गेली, असे घडणार नाही. भोपळ्यासारख्या जड-वजनदार गोष्टीही या वेलाचीच देणी आहेत. अभ्यास व्हायलाच हवा या सुत्राचा. जाई-जुईचे मांडव अभ्यासायलाच हवेत. वजनानी हलके म्हणून जर विचार करायचा तर जाई-जुई-रातराणी योग्य. पण ज्ञानानी? ज्ञानानी-ध्यानानी. जडत्वाचा-बद्धत्वाचा-अंधत्वाचा-मंदत्वाचा नाश करुन अलवार हलकेपणा प्राप्त करुन घेतिला आहे, तो या भोपळ्याने. श्रीसमर्थ यास 'ज्ञानानुज' असे म्हणितात. अशी ती अलवार..जडत्व संपलेली वेला गगनावेरी जाणार आहे. त्यादृष्टीने वेलीवर येणारा भोपळा

याचा जर विचार करायचा तर? तर मग भोपळा श्रेष्ठ आहे. अहो केवढा वजनदार तरी वेलीवर, कसा काय? जमिनीपासून एवढ्या वर-उंचीवर त्यास वाढविण्याची श्रीईश्वरी प्रयोजना काय? परंतु दुर्दैव असे की भोपळा हा हृदयरोगावर पथ्य-औषध म्हणून खावयाला सांगितला नी म्हणून भोपळा आवडावयाला लागला. आत्ता त्याचे महत्व कळले. म्हणिजे आता हा शून्य 0 भोपळाच नां. पुस्तक लाभूनही अभ्यास न करणेच नां. यास काय म्हणावे दुजे? म्हणून निंदक आमुचा धोबी..कपडे धुतो फुकाफुकी..,असे पूर्वज म्हणावयाचे. घ्या धूवून. स्वच्छ होणे हे जर त्या श्रीईश्वरास आपल्या बाबतीत हवे आहे, तर मधे आपली आडकाठी कां-कशाकरीता? म्हणूनच पूर्वी या साऱ्या आरोग्याचा विचार हा घरे बांधिण्यापासून झाडे लाविण्यापर्यंत केला जात असे. तेव्हाची आर्युमर्यादाही १०० च्या पुढे जात असे..आता? त्यावेळचे कचरा नियोजनही व्यवस्थित असावयाचे. थोडे तिकडे डोकाविले तर कळेल की, त्यावेळी गायींच्या शेणाच्या गवऱ्या थापायाच्या. त्याचाच सरपण म्हणून उपयोग करावयाचा. त्याच धुरानी केरकचरा निघून जावयाचा. चिलटे-डास कधी होत नसत. आरोग्य यामुळे सुरक्षित राहत असे. त्या गवऱ्यांपासून मिळणाऱ्या राखेनेच भांडी घासावयाची. कचरा शून्य. किती सुंदर नी बुद्धीयुक्त सारे. स्वत:च्या शेतात-मालकीच्या शेतात सारं कुटुंब राबायचं. कोणीही कोणापासून दूर नाही. लांब-गावास, घरदार सोडून नोकरी-व्यवसायानिमित्त जाणे नाही. सारे एकाच वेळी कामास. सारे एकाच वेळी घरात. शिवाय नोकरी-चाकरी-गुलामी नाही ही. सारेच मालक. शिवाय जगाचा अन्नदाता म्हणून मान. त्या शेतात राबताना श्रीसरस्वती कशी प्रसन्न असावयाची. निरनिराळे काव्य शेतातून फुलायाचे. मातीतून राबताना मातीचे मनोगत कळायाचे. तिथेच मति घडायाची. आता? आता मातीतल्या त्या वाळूचा आभास निर्माण करणाऱ्या चपला घालावयाच्या. रक्तदाबावर नियंत्रण म्हणून. हरे राम..असेल ते सोडवा नी नसेल ते भेटवा. अरे जरा थांबा. थोडी ही पळापळ थांबवा. शांतपणे विचार करा. उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म..उदर-बदर-कदर-सदर-अदर-पदर जाणा. जाणिले पाहिजे. भरपूर पगार मिळतो हो नोकरीत, पण गुलामीच ना? मेंदूची

किंमतच नां ती? आपण त्यांना दिलेल्या आपल्या वेळाचे पैसे-म्हणिजे पगार. एवढाच हलका हिशोब नाही का हा? बरे एवढा मेंदू विकूनही न त्यांना समाधान न आपल्याला न आपल्या बरोबरीच्यांना. सतत सल-बोच-वरची जागा मिळविण्यासाठी धडपड. आहे तिथे-त्यात समाधान नाहीच. कुठे चालले आहे हे सारे, कुठे नेणार आहे हे सारे? आपणांस शांतीप्रदेशी तर नक्कीच नेणार नाही. नी वरची जागा म्हणिजे तरी कितीवरची? इंद्रीये जिंकीली ज्याने..त्याची प्रज्ञा स्थिरावली, एवढी शक्ती-एवढी वरची जागा..? की अनंतकोटी ब्रह्मांडनायक महाराजाधिराज योगिराज परब्रह्म सच्चिदानंद भक्तप्रतिपालक हृदयनिवासी समर्थ सद्गुरु..एवढी वरची जागा? की, अती जिर्ण विस्तीर्ण ते रुप आहे । तेथे तर्क संपर्क तोही न साहे । अति गूढ ते दृश्य तत्काळ सोपे। दुजेविण जे खूण स्वामीप्रतापे ।। बघा, इथेही कदाचित आपण असू शकतो. नव्हे आहोतच. शोधा-स्मरा-आठवा-जोडा, त्या धाग्याशी हा धागा जोडा. तो अखंड-चिरंजीव-सातत्यात अनुस्यूत असा. नी हा खंडीत-गाठीचा-ग्रंथीचा-तुटलेला-कमकुवत-झोळ पडलेला आपला धागा. पण संधी आहे आपल्याला. तिथे तर्कानी संपर्क नाही करता यावयाचा. ती विश्वासाने प्राप्ती आहे. विश्वासाची प्राप्ती आहे. बरे श्रीसमर्थांना आपणांकडून जाणिव विवेकाशिवाय काहीच नको आहे हो. श्रीगजाननमहाराजांची श्रीबच्चुलालांनी त्या वेळच्या श्रीमंतीनुसार नी श्रीबच्चुलालांच्या प्रतिष्ठेनुसार कशी पूजा केली बघा, प्रथमत: घातीले मंगलस्नान। नानाविध उटणी लावून । षोडषोपचारे चालिले पूजन। मग करविले परिधान वस्त्र पितांबर जरीचा ।। शालजोडी अंगावरी। बहुमोल घातिली काश्मीरी । एक जरीचा रुमाल शिरी। अभ्रेस्मी आणूनी बांधिला ।। गोफ घातिला गळ्यात। सलकडी ती हातात। करांच्या दाही बोटात। मुद्रीका घातिल्या नानापरी ।। बहुमोल हिऱ्याची वामकरी घातिली पौची। रत्नजडीत कंठ्याची । कंठी शोभा विशेष ।। जिलेबी राघवदास पेढे। नेवैद्यास ठेविले पुढे । त्रयोदश गुणी ठेविले विडे । एक्या लहान तबकात।। अष्टगंध अर्गजा अत्तर । सुवासिक लाविले फार । त्याने अवघ्या अंगभर। गुलाबपाणी शिंपडीले ।। एका सुवर्णाच्या ताटी । दक्षिणा ठेविली शेवटी ।

ती होती फार मोठी । रुपये होन मोहोरांची ।। बेरीज करता दहा हजार । येईल ती साचार ।। त्यावेळचे १०,००० बरे. १८ व्या शतकातले दहाहजार हे. नी हे एवढे पाहिल्यावर श्रीमहाराज काय वदले त्या बच्चूलालांस तर, मी न बैल पोळ्याचा । अथवा घोडा दसऱ्याचा । मला या दागदागिन्यांचा काय सांग उपयोग? अरे हे अवघे विष । मला नको त्याचा स्पर्श । या नसत्या उपाधिस माझ्या मागे लावू नको ।। अथवा तू मोठा श्रीमान । हे दाखवाया कारण। केलेस का हे प्रदर्शन । सांग मसी बच्चुलाला ।। जे आवडते जयासी । तेच द्यावे तयासी ।। एवढे सांगून, श्रीमहाराजांनी हे सारे दागदागिने चहूबाजूस फेकून दिले. नी निघून गेले. त्यांना आपणांकडून नक्की काय हवे आहे..याचा अभ्यास येथे होणे गरजेचे आहे. ते आपल्याच बहु हिताचे ठरेल. आपल्याला जे जे हवे ते ते तर आपण मागून घेतोच हो. ग्रंथ म्हणिजे किराणामालाचे दुकान असल्यासारिखे आपण वाचतो. हे द्या..ते द्या. अमुक एक ते होउ द्या. हे असे नी असेच झाले तर तुम्ही खरे. मुलीचे लग्न-मुलाचा अभ्यास-ह्यांचे-हिंचे-आपले आजारपण. कोर्ट-खटले-समृद्धी-नोकरी-चिंता-नवस-व्याधि-उपाधि, काय एक ते नाही मागत. यांस पारायण कसे म्हणावयाचे? विचार करा. आपण म्हणू हो म्हणावयाचे पारायण. पण किराणामालाच्या दुकानातून आणलेल्या श्रीफळास आपण प्रसाद समजू का? नाही नां.. कारण तो व्यवहार आहे. तीथे पुज्यभाव गुप्त आहे. आता बघा पारायणाकडे. ज्या पारायणात आपण व्यवहार साधितो.तीथे पुज्यभाव? नी सारेच श्रीसंत सांगतात, अरे हे तर घ्याच..पण मागणेच संपू दे-कृपा होऊ दे..हे मागा. मजवीण तू मज देरे राम ।। काय मागावयाचे श्रीरामरायांपासी याबाबत श्रीसमर्थांचे फार सुंदर आर्त आहे हे. हे जरुर सर्वांनी अभ्यासावे.

कोमल वाचा दे रे राम । विमल करणी दे रे राम ।
प्रसंग वोळखी दे रे राम । धूर्तकळा मज दे रे राम ।
हितकारक मज दे रे राम । जनसुखकारक दे रे राम ।
अंतरपारख दे रे राम । बहुजन मैत्री दे रे राम ।
विद्यावैभव दे रे राम । उदासिनता दे रे राम ।

मागो नेणे ते दे रे राम । मज न कळे ते दे रे राम ।
तुझी आवडी दे रे राम । दास म्हणे मज दे रे राम ।
संगीत गायन दे रे राम । आलाप गोडी दे रे राम ।
धात मात मज  दे रे राम । अनेक धाटी दे रे राम ।
रसाळ मुद्रा दे रे राम । जाड कथा मज दे रे राम ।
दस्तक टाळी दे रे राम । नृत्यकळा मज दे रे राम ।
प्रबंध सरळी दे रे राम । शब्द मनोहर दे रे राम ।
सावधपण मज दे रे राम । बहुत पाठांतर दे रे राम ।
दास म्हणे मज दे रे राम ।
पावन भिक्षा दे रे राम । दीनदया मज दे रे राम ।
अभेदभक्ती दे रे राम । आत्मनिवेदन दे रे राम ।
तद्रुपता मज दे रे राम । अर्थारोहण दे रे राम ।
सज्जनसंगती दे रे राम । अलिप्तपण मज दे रे राम ।
बह्मानुभव दे रे राम । अनन्यसेवा दे रे राम ।
मजविणे तू मज दे रे राम । दास म्हणे मज दे रे राम । ।

श्रीसमर्थांच्या झोळीत देखील श्रीछत्रपतींनी आपले राज्य दिले, घातिले होते. श्रीछत्रपतीही निरीच्छ नी श्रीसमर्थ तर, निरीच्छ- निस्पृह अशा सर्व लक्षण-गुणांनी वरिष्ठ. चरणी लागावे-लोळण घ्यावी अशी विभूती. या द्वयींमुळे-या निस्पृहांमुळे आपणास हे सारे स्वातंत्र्य आहे बरे. मागचे नाही काही कर्म-धर्म-वर्म स्मरले तरी एकवेळ चालेल. पण या त्यागमूर्ति तरी स्मरिल्याच पाहिजेती. ध्यानात ठेविल्याच पाहिजेती. यांच्या सर्वस्व त्यागावरच तर आपली ही इमारती. जी अजून खरी फळास येईल असे उभे राहणेही जाणित नसलेली. नव्हे उभी, पण डगडगती-डळमळीत अशी. पायाच भक्कम नाही. त्याच मातीचा तर विचार-अभ्यास-शोध हवा नां. तोच करतो आहोत आपण या ग्रं मधून. ज्ञानदेवे रचिला पाया-म्हणिजे काय तर म्हणे, प्रत्यक्ष श्रीज्ञानदेवांनी स्लॅब घातिला..आत्ताची बुद्धी ही. कधी-काय-कुठून-कसा अर्थ काढेल देवा देवा..हा हंत हंत. कारण मूळं दुसरीकडे नेऊन रुजवली नां. छान छान रहायाचे, छान छान दिसायाचे,

मग छान छान असायाचे? तेच तेवढे का वर्ज्य. तेच तेवढे कळत कसे नाही. फॅशन तर अफवेपेक्षाही लवकर पसरते. समजते. लगेच आचरणातही येते. तशाप्रमाणे राहता नाही आले तर, हट्टाने सारे पुरवूनही घेतले जाते. मग त्या सात्विक विचारांबाबतच हा हट्ट, हा झपाटा का नसतो? हा वेग-आवेग-हट्ट का नसतो. मग ते का एका विशिष्ट वर्गापुरतेच का? चुकते कुठे, तर सर्वत्रच, असेच दुर्दैवाने म्हणावे लागेल. मग नुसत्या चर्तुथ्या करुन भागेल का? मीठाच्या चतुर्थ्या. अळणी चतुर्थ्या. निर्जल चतुर्थ्या. जुळणीच्या-तळणीच्या-भाजणीच्या-मिळणीच्या-मसाल्याच्या-गोडाच्या-आंबटाच्या-फोडणीच्या-पानाच्या-फळाच्या-दुधाच्या, कीती कीती चतुर्थ्या आहेत बघा. अर्थात त्या त्या व्रताप्रमाणे मात्र यांची फले जीवास प्राप्त होतात हे निश्चितच आहे. परंतु हे मग फक्त खाण्यापुरतेच पाहील्या सारखे होते नां. खाण्यातून-खाण्यासाठी नी शेवटी खाण्यामुळे सारे..सारेच. नी तरीही शेवटी खाण्याकरीताच पुन्हा पितृपक्षातील जेवणे-घास देणे, हेच सूत्र चालू. दुसरे काय? इथून तिथे नी तिथून इथे..हेच हेच. पुन्हा पुन्हा हेच. इथून तिथे नी तिथून पुढे..व्हावे-जावे, ही तळमळ श्रीसमर्थांची. पाचवी पूर्वीची चतुर्थी आहे ही. याचा काही शोध अभ्यास व्हावयास नको का? चंद्र का बघावयाचा..तर कथा आहेच हजर. श्रीगणेश-सभा-मूषकांवर श्रीबैसिले-पडले-चंद्र हसला. मग अनंतचर्तुदशी-शाप-उःशाप-संकष्टीला तुला बघतील-तुझे दर्शन घेतील. बस, एवढेच. यापुढे अभ्यास काही नाही. केवळ कथा स्वरुप. हे ते नाही, हे असे एवढेच फक्त नाही. फार वेगळे..फार वेगळे-आपण शोधिले नाही या कथारुपातून त्या मुळास. त्या मुळारंभास. नुसत्या कथाच ऐकीत राहिलो. व्यथा दूर करणाऱ्या कथा आहेत हो या. संकष्ट दूरी करणाऱ्या कथा. त्यांचा स्वतः अभ्यासच केला पाहिजे. खरे मुक्ताफळ हवे, साऱ्या संकष्टातून सोडविणारे मुक्ताफळ जर हवे तर..नुसते कंठी शोभे माळ मुक्ताफळांची..असे केवळ म्हणून भागेल का? त्या शोभणाऱ्या माळेचा शोध नको का घ्यावयाला? आधी श्रीगणपतींची आरती करावयाची असंते, हे परंपरेने ठाउक. चुकून कोणी दुसरीच आरती अगोदर केली तर, त्यावर अडाणी-बावळट काहीच माहिती नाही यांना,

आम्हाला बघा केवढे-ज्ञान-कुठेही आधी गणपतींचीच आरती असते, असे आपले बोलणे चालते. ही आपली मुक्ताफळे. रोज म्हणावयाचे कंठी शोभे माळ मुक्ताफळांची..दासरामाचा वाट पाहे सदना..परंतु काही अभ्यास हवा यामागे-यापुढे. जर ज्ञानाचे अधिष्ठाते असे ते श्रीगजानन त्यांची आरती जर प्रथम करावयाची तर ते अग्र, या ग्रं मधूनच समजून घ्यांवयाला हवे. आपण पाळतो तो फक्त परिपाठ-क्रम. ती फक्त परंपरा. म्हणून तर अज्ञान शिल्लक राहाते. अज्ञानातून ज्ञानाकडे असाच क्रम मग क्रमप्राप्त. परंतु चुका होतातच कशा, अशा प्रश्नमार्गात स्वतःस उभे केले-स्वतःच्या दोषांवर जर पांघरुण नाही घातले, तर पाहताक्षणीच ज्ञान होणे आहे. नी नाही तर मग ही केलेली आरती कळलीच नाही म्हणायची. खोटी-फसवी-दांभिक ठरेल ती. नी दांभिकांच्या घरी संत न होती तृप्त कदा..हे ध्यानात ठेवावयाचे. मागितलेले तर मिळेलच हो. **परंतु न मागता लाभणे ही खरी पूजा होय.** आपण काय करतो? तर यंत्रवत करीत राहातो फक्त. कोणीतरी सांगितले आहे म्हणून. करावे लागते म्हणून. ओढ आवड ज्ञान नाहीच घेत त्यातून. त्या करण्यातून. आयुष्यभर तेच ते करीत राहतो. सासुबाई करायच्या म्हणून मी करते. आम्ही कधी त्यांना विचारले नाही. नी त्यांनी कधी आम्हास सांगितले नाही. विचारले तर त्या म्हणायच्या, आमच्या सासूबाई करायच्या म्हणून आम्ही करतो. दोन्हीकडे हीच उत्तर मालिका, बदल काहीच नाही. नी परिणामी पुढे पिढ्या न् पिढ्यांपर्यंत हे कोणी कोणास कधी विचारीलेच नाही. मग हे जे चालले आहे ते काय आहे. ज्ञानाची का अज्ञानाची आरती? का अज्ञानाने ज्ञानाची केलेली आरती? सारे ज्ञान गुप्त. घेतिलेच नाही-घ्यायाचेही नाही. अहो असे हे ज्ञान जर घेत बसलो, तर मालिका नाही का बुडायाची आमची. आम्हांस मालिकांबरोबरच-मालिकांमधेही बुडायाचे आहे. हे भवाब्धिचे तारु थोर..वगैरे आम्हास नकाच ऐकवू. बुडू द्या आम्हाला. आम्ही बी घडलो..तुम्ही बी घडा नां..हे आम्ही वेगळ्या अर्थाने घेतलेलेच आहे. नी पूर्ण बिघडल्यावर तुम्हीच आम्हास घडवायाचेही आहे. मग तुम्ही आहात कशासाठी..? पाहिलात नां हा शिरजोरपणा. आहे की नाही हे किराणामालाच्या दुकानासारिखे. जे

पाहिजे ते द्या. जेव्हा पाहिजे तेव्हा द्या. नी इकडे हा टाहो चालिला आहे. नव्हे ते चि जाले नसे ते चि आले । कळो लागले सज्जनाचेनि बोले । अनुर्वाच्य ते वाच्य वाचे वदावे । मना संत आनंत शोधित जावे ।। ही श्रीसंतहृदये आपल्याला कळायालाच हवीत. श्रीगजाननांची ही आरती सदनातच जर चालू आहे तर, श्रीसमर्थ अजून कुठले सदन म्हणत आहेत या आरतीत? याचा अंतर्यामी शोध घ्यावयाला हवाच. श्रीग्रंथराजदासबोध- हेच सांगत आहे. या साऱ्या गोष्टी न जाणिल्यामुळे हे सं त्वष्ट पडतात. हे कर्म नी पुढे कर्मभोग निर्माण होतात. शास्त्र अभ्यास सूक्ष्म नाही. हे उघड आहे. भल्या थोरल्या आकाशात भला थोरला टळटळीत श्रीसूर्य झाकिलेला नाही. श्रीयाज्ञवल्क्यऋषींनी या श्रीसूर्यनारायणांकडूनच ज्ञान घेतले नी यजुर्वेद आपणास प्राप्त झाला. आज साऱ्या पूजा श्रीयाज्ञवल्क्यांकडूनच त्यांच्या शास्त्राप्रमाणेच घडत आहेत. मग रोज पूर्वेस उघडणारे हे पुस्तक, या पुस्तकापासून आपण कुठला धडा घेतला आजपर्यंत. घेणार या पुढे? सारे पुस्तकच वाया घालवितो आहोत नां आपण. नी रोजचे रोज हे धडेही वाया जात आहेत बघा. कधी जागणार? की सं त्वष्ट चालूच. करायला हवा नं अभ्यास आपण?

## ..चतुर्थ संकष्ट - संप्रज्ञ ..

चौथे संकष्ट संप्रज्ञ. एखाद्याचा विश्वासघात करणे. अतिप्रेम करणाऱ्यास फसविणे. यात सर्वप्रकारीचे प्रेम म्हणिजे, वात्सल्य-करुणा- दया-क्षमा, साऱ्याबाबतचे प्रेम, यांसी उघड अथवा गुप्त दोन्ही प्रकारे केलेल्या प्रतारणेने हे कर्म उद्भविते. या कर्मातून निवृत्ती मिळणे अवघड आहे. कारण वृत्तींमधूनच हे घडलेले आहे. वृत्तींमधूनच तर हे आलेले असते. वृत्ती लय हे ज्ञान आहे. नी ज्ञानाकरता अभ्यासाची आवड होणे हीच मूळवृत्ती. तिचाच इथे लोप जर झाला, तर पुढे साऱ्या वाटा अडल्या नां. या साऱ्या गोष्टींचा-कर्मांचा उद्भव जाणून घेतिला पाहिजे. जर सारेच श्रीसंत आपणास सांगत आहेत की एक ब्रह्म जगदांतरी । ओतप्रोत भरले असे ।। ऐसे परब्रह्म कोंदाटले । ठाव रिता नाहीची कोठे ।। असे जर सारे हे गच्च आहे. घनदाट-काठोकाठ-ओथंबलेले-पुरेपूर-भरपूर आहे. तर

मग आपल्या साध्या हात इकडे तिकडे हालविण्यानेही, या रिता नसलेल्या नी ओतप्रोत असलेल्याचा स्पर्श आपणास होतच असणार नां. जाणवत फक्त नाही. त्याचे ज्ञान इंद्रीयांकरवी घेता येत नाही. इंद्रीयांपलीकडील या अतिंद्रीयशक्तीही आपल्यातच आहेत नां?पण निंदा-प्रतारणा अशा निंदनीय गोष्टींमुळे मग योग्यता असूनही हा उच्चस्तर प्राप्त केला जात नाही. जनी निंद्य ते सर्व सोडोनि द्यावे । जनी वंद्य ते सर्व भावे करावे ।। बघा जमले तर, असे श्रीसमर्थ सांगत नाहीत हो, तर ते तसे कसे-कशाने घडेल, ते ही लगेचच सांगत आहेत. प्रभाते मनी राम चिंतीत जावा।पुढे वैखरी राम आधी वदावा। सदाचार हा थोर सांडू नये तो। जनी तोचि तो मानवी धन्य होतो।। परंतु मनाचे श्लोक हे लहान मुलांनी वाचावयाचे पुस्तक आहे हा आपला समज. किंवा जेवणाच्या पंक्तीत म्हणावयाचे हे श्लोक, एवढीच ज्यांची ओळख उरली आहे, ज्यांनी तेवढीच ती ठेविली आहे त्यांस काय म्हणावे? नी परदेशातून जेव्हा यावर संशोधन होईल नां, नी मनाचा शोध-मनाची धाव-मनाची गती ते जेव्हा यातून शोधतील नां, तेव्हा आपण फक्त म्हणावयाचे, की हे आमचेच तर आहे. तेवढा तरी आपलेपणा-पुढील काळानी नी झालेल्या सार्वत्रिक आक्रमणांनी राहीला तर भाग्यच म्हणावयाचे. संस्कृती-संस्कार-कुळधर्म-परंपरा-नेम-नियम-उपवास हे तर जवळजवळ दुरावलेच. संपलेच. अत्यंत सुधारणा या नावाखाली आळस-कंटाळा-चैन-ऋणकाढून चैन-पार्ट्या-बेगडी चकचकीतपणा-पोषाखी संस्कृती या साऱ्यात झाकोळून गेलेले आपुले मुळ शोधावे लागेल. पण आता पोषाखी संस्कृती असेही म्हणता येत नाही हो. कारण पोषाख म्हणावा असे काही राहिले आहे का आता..जरा विचार करुन बघा. आत्ताच्या पोषाखांना पेहराव म्हणता येईल कां? फाडलेले-मुद्दाम फाडून घेतिलेले-न धुतिलेले-धुवायाचे नसतातच मुळी-जाडेभरडे-नाड्या लोंबलेले असे हे कपडे. इस्त्री करायचीच नसते. उलट चुरगाळूनच कपडे दिलेले असतात. तिच तर फॅशन नां. त्या चुरगाळण्याचेच तर २-५ हजार दिलेले असतात नां. ठिगळाचे-शिवण दिसणारे हे असले कपडे. नउवार-सहावार-धोतर तर केव्हाच संपले. जसा वेश तसा प्रवेश. नाटक सारं. सुखी

माणसाचा सदरा..उरला आहे का बघा. सारी असत्याची जोड नी सोबत. परंतु हवे नां सत्य शोधायाला. पटते आहे हे सर्वांनाच. पण सुरवात कोणी करावयाची? नी कायम दुसऱ्या कोणीतरी करावयाची हाच विचार किंवा हिच वाट बघावयाची. श्रीसमर्थ सांगतात, जो दुसऱ्यावरी विसंबला त्याचा कार्यभाग बुडाला..जो स्वये कष्टतची गेला, तोचि धन्य..हे फक्त वाचत राहावयाचे. नी कशातच नसावयाचे. याच तफावतीने उद्‌भवणारे कर्म हे सं प्रश्न कष्ट होत. पढत्‌मुर्ख लक्षणांमधून उद्‌भविणारे कर्म जीवास सतत अस्वस्थ ठेविते. सतत बेचैनी नी त्यामुळे सारे लाभूनही समाधान नाही. अशी बिकट अवस्था याने जीवाची होते. नी त्यास मग कुठेही करमेनासेच होते. परिणामी त्यास नैराश्य घेरते नी तो मानसिक दुबळा ठरुन व्याधिग्रस्त होतो. काहींना तर दुसऱ्याच्या दुखण्याचे वर्णन ऐकून तसेच दुखणे होते. अहो, इथे जर एवढे एकरुप होता येते, या असल्या ठिकाणी जर कान देउन श्रवण करीता येते, तर त्या भगवतांशी का नाही एकरुप होत. त्याचे का नाही एकत असे कान देउन. हित होईल नां त्याने. सतत निसर्गाच्या सान्निध्यात राहणे. वाहते पाणी पाहणे. शुक म्हणिजे पोपट या पक्षाचे कुजन ऐकणे. पहाटेच्या वाऱ्यात बसणे-फीरणे, हे उपाय यांवर करावे लागतात.

**..पंचम संकष्ट - संतिष्ठ ..**

आता पाचवे कष्ट संतिष्ठ. कलीयुगात जन्म घेउन आपण श्री कार्य करावे. दोन घास जेवणापुरती उपजिवीका बघून बाकी सर्ववेळ हा श्रीईश्वर चिंतनात व्यतित करावा. असे खरे तर श्रीवेदोनारायणांचे सांगणे. आता हे चित्र उरले नाही. अनंत आक्रमणानंतर वेगवेगळ्या गोष्टींच्या सरमिसळींमुळे संस्कृतिचे मुल्यच-मूळच हरविले आपल्या. पुन्हा ते मूल्य शोधून, ज्याचे त्यास देण्याच्या-सारे लागी लाविण्याच्या जाणिवा जिथे जागल्या, त्यांची बूज-चाड-जाणिव-जतन-सांभाळ-जपणूक कुणी केली नाही. आपल्या संस्कृतिस पूर्णपणे जाणून न घेताच दुसरे स्वीकारल्या मुळे आपला साराच गोंधळ झाला आहे नी या गोंधळातूनच हे कष्ट उद्‌भवितात.. सुधारणा म्हणून काही गोष्टी स्वीकारल्यानंतर कळते आहे

की हे घातक आहे म्हणून. अंतिमक्षणी जे स्मरणसूत्र आपण धरु त्याच स्मरणसूत्रा प्रमाणे जीवास पुढील जन्म प्राप्त होतो. नूतनवस्त्र प्राप्ती जीवास होते. परंतु अंती जर एखादी वासना-एखादा विकार-संघर्ष-सूड-क्रोध बळावला तर..? अशा अशांत नी तप्त वातावरणात जीवाला कुठला आला आहे आराम मग. स्मशानापर्यंत जाण्याची उत्तम सोय झाली या सुधारणांनी आपली. शेवटीसुद्धा आराम नाहीच जीवाला. विद्युतदहन होते आता. काष्ठात काष्ठ मिसळणे संपले. कारण त्या विधीचा अर्थ आपण जाणिला नाही म्हणून. लाकडाची चिता रचून काष्ठ काष्ठात मिसळावे तर ती सोयही ठेवलेली नाही-उरलीच नाही. बरे रक्षा, ती तरी तिर्थात टाकावी तर, तिर्थेही कुठे उरलीत? ठिकठिकाणी पाणी अडवून-सिमेंटच्या अडसरी करुन-पाण्यात गटारे-रसायने सोडून तीर्थत्व संपविले आपण. पुन्हा साऱ्या सोयी माणसाकरीताच. एवढे करुनही तो कृतज्ञ नाहीच. पुर्वीही कारंजी उडत असत. पण विजेच्या वापरावर नव्हती उडत. मग आत्ताच हा एवढा विजवापर? हातानी काम करावयाचे नाही. नी बुद्धीचाही वापर नाही. सारेच यंत्रावरचे. त्यामुळेच खरेतर विजेचा वापर वाढला. नी एवढा वापर वाढल्यावर उमगते आहे की आता एवढी वीज पुरविणे शक्य नाही. या आता या 'स्वयंशक्तीवर' पुन्हा. काय करणार..? ८४ लक्षवेळा हेच भटकणे झाले, म्हणून तेच अंगवळण पडीयेले. नळातून येणाऱ्या पाण्यापेक्षा पृथ्वीच्या पोटातील पाण्याचा उपयोग आरोग्यास अधिक पोषक होता. वाहत्या पाण्याचे साह्निध्य-वाहत्या पाण्यात स्नान, सारे संपले. नी परिणामी बुद्धी गंजत गेली. चालवायाचीही नाहीच तिला. याच तर सोयी हव्यात नां. साऱ्या आरामदायी सोयी. दिवाणावर बसायाचे, बाज-खाट-लाकडी पलंग-शिसम आटोपलेच आता. रिमोट हातात घ्यावयाचा. टि.व्ही. सोबत भोजन. जेवायाचेही तिथेच. खावयाचे की बसावयाचे. खाऊन झाले की झोपावयाचे-झोपून उठले की खावयाचे. एकमेकांना समजून घेणे. सत्संगावर चर्चा करीत भोजन करणे. अथवा मौन भोजन. काव्य-शास्त्र-विनोद नाहीच. मोबाईलवर बोलतच जेवण. आईने कसा स्वयंपाक केला आहे त्या विषयी काही अवाक्षर नाही. जेवणात लक्ष नाही. कसे अंगी लागावयाचे. नी

एवढाले पैसे खर्च करुनही मुल पुढे जात नाही. पाहिजे तसे यश त्यास प्राप्त होत नाही ही तक्रार कायमच राहाते. दुसऱ्यास दुषणे दिल्याशिवाय आजही दिवस सरत नाही. कितीही भारी सामान गोळा केले तरी झोप हातची नाही. स्व पलिकडे विचार नाही. आपल्या मुळ गोष्टी सरळ सरळ धुळीस मिळाल्या. पण पाहत राहायाचे..जी या साऱ्यातून बाहेर काढतील, बाहेर येतील, अशी मनगटं-अशी पोलादी मनगटं प्रयत्नपूर्वक जन्मास घालावी लागतात. उगाच काढीव मुहूर्तावर लग्न लावून श्रीसत्यनारायण पूजन न करताच-हळद उतरवून-तोरण सजवून-गुळ रांधून-सुप दर्शन करुन-उंबरा उतरवून, हे असे काहीही न करता तिकीट काढून आप्त-इष्टांपासून दूर पळणे-हा काय तपोनिष्ठ संस्कार म्हणावयाचा? यातून काय नी कोणती संतती प्राप्त होईल? ते चित्र तर आता पूर्णपणे आपल्या डोळ्यांसमोरच आहे. या साऱ्यातूनच आपले डोळे उघडविणारे हवेत. म्हणिजे कोणीतरी हवे, जो ही निद्रा योग्य नाही हे सांगेल. या घोर निद्रेतून जाग आणिल. अशा अर्थाने उघडणारे, हा शब्द घेतिला आहे. नाहीतर..डोळे उघडणारी बाहुली कां? असे विचारण्यासारखी गत व्हायची. कीती दूर जाउन पुन्हा, आपण जिथून दूर गेलो, त्याच ठिकाणी-त्याच स्थानी जर परतणार आहोत. हे असेच आहे तर मग जायचेच का दूरी? ज्ञानही सर्व टक्केटोणपे खाउनच घ्यावयाचे का? निरिक्षण-परीक्षण ही बुद्धी कुठे आहे? कुठे दडी मारली आहे तिने? आई प्रेमाने सांगते आहे, सांभाळते आहे, तर ते नाही कळत. नको त्या गोष्टींमधेच जीव अडकून पडतो. ज्ञान ही गोष्ट तत्काळ घेण्यासारखी आहे. तोच तत्काळ कधी-केव्हा येईल हेच समजणे कठीण. नी त्याकरीताच श्रीगुरु साक्षिध्य लागते. श्रीगुरुसेवा लागते. कलीयुग आहे हे. असेच चालायाचे, म्हणून आपणही हात धुवून घ्यावयाचे. कींवा तापल्या तव्यावर पोळी भाजून घ्यावयाची. इत्यादी सारी कर्मे ही या सं त्वष्ट प्रकारात मोडतात. नी या कर्मामुळे फार मोठा फटका ऐनवेळी बसतो. कुठल्या कर्माचे काय फळ, याचेच जीवाला ज्ञान नसल्यामुळे, आपण दुःख का भोगित आहोत हेच त्यास उमगत नसते. नी अज्ञानाने पुन्हा या कर्मात नको त्याचीच भर पडते. पडतच राहाते. म्हणून

या साऱ्यातून मुक्ती प्राप्त करण्यासाठी त्या श्रीगजाननांची आराधना करावी लागते. कृष्णपक्षात श्रीचंद्रांच्या दोन्ही कोरींची एक विशिष्ट दिशा असते. ती आकाशातील एका अशा मार्गाची निर्देशक असते की त्या मार्गावरील चंद्रदर्शन जीवास कीतीतरी गोष्टी उलगडवून देणारे ठरते. अतिरात्री म्हणजेच अतिनिशाकाळी-अति अंधारी-अति तमातून एका विशिष्ट प्रकारच्या प्रकाशाचे वहन होत असते. असा प्रकाश संकष्टीवेळी चंद्रदर्शन करण्याने-चंद्र अवलोकीण्याने-असा प्रकाश पाहील्याने जीवाच्या रक्तसंवर्धनास-रक्तातील तांबडेपणा वाढण्याचे दृष्टीने तसेच ग्रंथींमधील स्मरणस्थान चेतविण्याकरीता अत्यंत सहाय्यभूत ठरतो. सध्या, असे ऐकले जाते की रक्तातील पांढऱ्या पेशी कमी होत आहेत. त्या कमी करणारे जंतू वाढले आहेत. ती एक व्याधिच होऊन बसली आहे आता. याकरीता देखील हे कृष्णपक्षातील चंद्रदर्शन फार उपयुक्त आहे. तसेच त्यावेळी नेत्रांच्या त्या पटलांपर्यंत प्रकाशाचा असा एक प्रवाह वहन करीत असतो की तो प्रकाश जीवाची सूक्ष्मातिसूक्ष्म गोष्टी पाहण्याची शक्ती जागवितो. अगदी घडलेली कर्मे-त्यांची कारणे नी पुढील कर्मांची येणारी चाल, हे ही त्यास उमगू शकते. म्हणिजे एखादे संकष्ट कधी पायरी गाठेल, नी कधी पायरी चढून ते सदनात येईल. तसेच भाग्यही कधी सदनी येईल हे ही आपण याच सूक्ष्मशक्तीच्या आधारे जाणू शकतो. अशा तमातून वहन करणारा प्रकाश डोळ्यांनी अवलोकील्या नंतर आपल्या डोळ्यांस बुद्धीतील गहन-गूढ असे ते पाहण्याची शक्ती प्राप्त होत असते. कारण अंधारात डोळे विस्तारले जातात. नी इतर वेळी आपले पाहणे हे अगदी साधे असते ज्यात डोळ्यांची फारशी हालचालही होत नसते. म्हणून डोळ्यांचा विस्तार करणारी थोडक्यात दृष्टीचाच अंर्तबाह्य विस्तार करणारी अशी ही चतुर्थी असते. जीवाने एका वेगळ्या अर्थाने, तमातून ज्योतिकडे..अशा या परमवाक्याचा गहन अर्थ यातून घ्यावा. एकच एक अर्थ धरुन दुसरीकडे कधीच न वळणारे मन हे आपल्याला इकडे वळवावयाचे आहे. केवळ ही आपली परंपरा आहे, एवढेच हे समजू नये. या पलीकडेही काही अभ्यास करावा. आपल्याच हाती ही मौक्तिके गवसणार आहेत. लागणार आहेत.

या साऱ्यातच तर खूप अर्थ दडला आहे. म्हणूनच श्रीसमर्थांनी त्यां ग्रं शक्तीच्या आवाहनार्थच येथे ग्रं हे अक्षर प्रारंभीचे घेउन आपणांस त्या ग्रं आरंभाचे-ग्रंथारंभाचे दालन मोकळे करुन दिले आहे. आता या दालनात जर आपण विश्वासाने फिरलो तर सारे आपलेच आहे. शंकेने फिरलो तर असूनही आपले नाहीच. आपणांस प्राप्ती नाहीच. असे सारे होईल. ही सारी शक्ती केवळ कृष्णपक्षातील त्या चतुर्थीतच आहे. मुक्ताफळ धारण करणारे-मुक्ताफळांची माळ कंठी असणारे हे श्रीगजानन, यांचे आराधन करताना कसे करावे. उपवास म्हणिजे खऱ्या अर्थानी उपवास ये दिनी हवा. सत्संग-नामस्मरण-पवित्रता-शुचिता-शुद्धता-जिव्हेचा योग्य वापर असावा. अतिक्रोध-अति मोह-अति हव्यास नसावा. परावाणिमधे जेवढे शुद्ध, तेवढेच वैखरीवरही असावे. आत एक बाहेर एक असा व्यवहार नसावा. त्यानेच तर सारे नासते. बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊले, हे सूत्र काय दर्शविते. संसार-प्रपंच याविषयी गप्पा, निंदायुक्त बोल-मत्सर-ईर्षा-व्याधिंविषयी चर्चा टाळाव्यात. करुच नयेत. नाहीतर सरळ श्रीधेनुंच्या म्हणिजेच गायींच्या सान्निध्यात रहावे. शांतस्थळी वसावे. कोलाहल-गडबड-गोंधळ-अतिव्यवहाराच्या जागा-स्पर्धेच्या जागा या उपवासाचे दिवशी टाळाव्याच. ज्यादिवशी उपवास करावयाचा त्या दिवशी आपले सदन-आपले घर गोमयाने-शेणाने सारवावे.

आज आपण ज्यांच्या 'उपवासात' बसणार आहोत असे ते श्रीगजानन आज आपल्या सदनात येणार आहेत, असा भाव मनी असावा. भाव मनी असणे म्हणिजेच जीवाचे ताजेपण होय. नी ताजेपणा म्हणिजेच जीवंतपणा-चैतन्य स्पर्श. नी अशा चैतन्याने केलेला-धरीलेला उपवास. कुणासाठी-कशासाठी तर त्या परमचैतन्याने या अंश चैतन्याच्या खोडास स्पर्श करुन त्यात ते दुर्वांकुर रुजवावे. नी मग हे अंकुर ते ज्ञानाग्र घेऊन, अज्ञान फोडून बाहेर येतील-अंकुरतील. नी त्यातून 'ह' रव-निघेल. **ह** रव म्हणिजेच हरळ-दुर्वा. या कर्णरंध्रांस सजग करतील नी ती सौभाग्य चाहूल देतील. आपण एखादी गोष्ट समजली अशा अर्थाने जेव्हा दुसऱ्यास सांगतो तेव्हा याच ह चा उच्चार करतो. किंवा संभाषण चालू ठेविण्याकरीता

देखील याच ह चा उच्चार करतो. तोच हा ह रव होय. ह रवाने श्रीगजानन आपल्या सदनात येतात. ह रव म्हणिजेच तथास्तु असाही याचा अर्थ आहेच. हा होईल दान पसावो..बघा.

**..विविध प्रकारीचे रव व त्यांचे ज्ञान..**

येथे रव या नादाविषयी थोडे समजून घेउ या. जसे आपण म्हणतो अगदी नीरव शांतता आहे. कुणाचा पायरव होउ नये. असे हे रव कसे आहेत ते आपण पाहू. **अ** रवाने मध्यान्हरात्र उषःकालाकडे वाटचाल करते. **आ** रवाने कुक्कुटांचे कंठ फुटतात. **इ** रवाने आपले केस-कुंतले सजग होतो. **ई** रवाने हृदयातील स्पंदनांची शक्ती वाढते. **उ** रवाने आपल्या पायाच्या टाचा-अधरांगुष्ठ चेततात. **ऊ** रवाने विचार-अविचार मंथनात, विचार जिंकणारे मंथन होते. **ए** या रवाने शरीरातील रंध्र चेततात. जसे काटा येणे. **ऐ** या रवाने नखास तजेला येतो. **ओ** रवाने अग्निप्रदीप्त होतो. **औ** रवाने आपली चित्‌शक्ती जागी होते. याचाच अपभ्रंश, आवर-पटपट आवर, अशाअर्थी आपण केलेला आहे. **अं** रवाने पृथ्वीवरील अंकुरांस जाग येते. **अः** रवाने सर्व समुद्रां मधील खारेपणा हलतो. हलतो म्हणजे सर्वत्र सारखा पसरतो. एकजागी साचत नाही. **क** रवाने हंस येतात. जसे कलरव तसे. **ख** रवाने खुरं असलेल्यांस भान प्राप्त होते. खुरं म्हणिजे बोटे. मानवांसारखी प्राण्यांस बोटे नसतात. एकात एक अशी ती शक्ती गुंफलेली असते. दोन खुरं पुढे नी एकच बोट मागे अशी ती शक्ती विभागलेली असते. **ग** रवाने ज्ञानप्राप्ती होते. ज्ञान आपल्या सदनात येते म्हणिजेच ८४ लक्ष्ययोनी मार्गपथ ओलांडून मुळात म्हणिजेच जन्मे न कोणी मरे न कोणी या मार्गात ज्ञान प्रवेश करते होते. हाच तो श्रीसमर्थांचा ग्रं-श्रीमहाराजांचा ङ.होय. **घ** रवातून धान्यांमधे रस परिपोष होतो. म्हणिजेच धान्यांमधे रस भरीला जातो. **ङ** रव हा पड्जिभेत अमृतवृद्धी करतो. **च** रवाने आपल्या जिव्हेच्या अग्रास शक्ती प्राप्त होते. ज्या अग्रास उल्लेखून श्रीसमर्थांनी आपणांस पुढे वैखरी राम आधी वदावा, असे निर्देश केले आहेत. आपण आताही ही सारी अग्राचीच तर लिला पाहतो आहोत नां. सर्वांचे अग्रज असे श्रीगजानन. अग्रजा-दुर्वा. या रवा पासूनच श्रीरुद्रातील

च म क आपणांस प्राप्त झाले आहे. **छ** रव. या छ रवाचा आपणांस फार फार उपयोग आहे. पण हा छ रवच आपल्या परिचयाचा नाही. तो श्रीसमर्थांमुळे आपल्या परिचयात येत आहे. त्याचे आपण येथे निश्चितच मनःपूर्वक स्वागत करुया..त्यास दंडवत प्रणाम करुया..नी आम्ही श्रीसमर्थांचे अनन्यसेवक होऊन राहू. श्रीसमर्थांना आवडणाऱ्या ज्ञानमार्गाचे-यत्न तो देव जाणावा या मार्गाचे आम्ही स्वाभिमानी होऊ. प्रणेते होउ. सार्थ ब्रह्मांडाभिमानी असू, असे या छ रवास आपण आश्वासनही देउ. बघा-काय असते हे आश्वासन? तर खात्री-ठामपण-एक अतुट विश्वास. परंतु हे एवढेच नाही. यापुढेही किती आहे बघा. आपणांस ही सारी संकष्ट निवारुन त्या चतुर्थीकडून हीच तर सूक्ष्मदृष्टी मिळवावयाची आहे नां. श्रीसमर्थांची कशी कृपा बघा आपल्यावर-श्रीकपिवरमहाबली कसे प्रसन्न बघा आपल्यावर-श्रीगजानन कसे आनंदीत बघा आपल्या सदनात..कसे सारे भरच घालीत आहेत आपल्या ज्ञानपात्रात. विस्तारा..विस्तारा..व्यापक व्हा. व्हा व्यापक..आकाशा एवढे..व्हा. जा तेही भेदून..ब्रह्मांडही भेदा..आपण भेदू शकतो. छेदन जर करु शकतो तर भेदन का नाही. अनंतजन्मांचे वस्त्र छेदन करुनच आलो आहोत आपण. अभेद आहोत आपण. तर हे अश्वासन-ठाम अशा-ज्ञानी अशा अश्वशक्तीस दिलेले हे 'अश्व आसन'. 'अ शवासन'. कधीच जे प्रेतवत नाही-नसेल-नसणार-शिवणारच नाही ते. ज्ञानियांस स्पर्शच नाही या शवाचा. पूर्ण चैतन्य असे जे ते ज्ञान. असा तो ज्ञानगभस्ती. तो ज्ञानगभस्ती जर सदनात आहे, तर बिशाद कुणाची..? समर्थाचिया सेवका वक्र पाहे..असा सर्व भूमंडळी कोण आहे..? श्रीसमर्थांची ही गर्जना म्हणजे सिंहलिका आहे ही. व्याघ्रा:पिका आहे ही. भवानिका आहे ही. जगन्नायिका आहे ही. श्रीसमर्थांची आरोळी आहे ही. **श्रीसमर्थांचा आरव...असे ते अ शवासन-अश्वासन..आश्वासन होय.** पुरुषोत्तमाचे आसन-पूर्णपुरुषाचे आसन-अश्वासन, ते देऊन आपण या छ रवाचे ऋणी होऊ या. कारण या छ रवाने आपल्या अनंतजन्मींच्या विचित्र गोष्टींना-त्रासदायक-जीवघेण्या गोष्टींना-अज्ञानरुपदारिद्र्यास-पापास-कर्म-भोगास-ज्ञानमार्गात आपल्या आड येणाऱ्या सर्व मुर्ख-अजाण गोष्टींना-

श्रीगुरुंपासून तोडणाऱ्या-नको तिथे जोड करणाऱ्या, अशा सर्व गोष्टींना या छ रवाने आपण झटकून टाकू शकतो. ज्या योनी आपणांस नरजन्मापासून वंचित ठेवतात, अशा अनंतयोनींसही आपण झटकू शकतो. बहु उपयोगी असा हा छ रव आहे. आज श्रीसमर्थांमुळे आपणांस हे सारे उमगत आहे. समर्था..श्रीसमर्था..तुझे काय उत्तीर्ण व्हावे..हेच आपण वारंवार म्हणत राहावयाचे नी ती श्रीपदे सेवित राहावयाचे. ज रवाने सर्व बीजांचे सिंचन होत असते. म्हणिजे जे जे या पृथेमधे बीजरुप धारणेत आहेत त्या साऱ्यांचे या रवाने सिंचन होते. याच ज रवात झ नी ज चेच दुसरे ञ रुप अंर्तभूत असते. नी त्या अंर्तभूत रुपातून घशातील घरघर मोकळी होते. ट रवाने नाभिमधील कमल विकसीत होण्यास सहाय्य होते. कमल म्हणिजे अशी जागा-असा घटक की ज्याचे वाढी-वृद्धी करीता पंचमहाभूतांची आवश्यकता नसते. कमल म्हणजे फुल या अर्थाने येथे घेउ नये. मल नसलेले कपाट, म्हणिजेच कपाळ-म्हणिजेच ज्ञान, अशा अर्थाने हे घ्यावे. टकटक करुन कसे आपण दार उघडायला लावतो. एखाद्याचे लक्ष वेधून घेण्याकरीता हा टकटक नाद करतो. त्याचप्रमाणे हा ट रव आहे. ठ रव.. कीती रव ऐकावयाचे आपण? आपला मुळ विषय बाजूलाच राहिला या रव मात्रेने. परंतु श्रीसमर्थांची श्रीइच्छा की आपणांस हे सारे कळावे. आपल्यापाशीचे गाठोडे अजून आपण सोडून पाहिलेच आहे कुठे? तेच तर गाठोडे-मोठे घबाड आपण या ग्रं द्वारे उघडीत-उकलित आहोत नां. काय आहे ही ग्रं रचना. विलक्षण-खूपच विलक्षण अशी ही आपली साऱ्यांची ग्रं रचना आहे. श्रीसमर्थांमुळे ती आपणास कळते आहे. नी आपण ठरविलेच आहे की या साऱ्या ज्ञानवस्त्र उलगडीतून आपणही जसे श्रीसमर्थ नेत आहेत तसेच जावयाचे आहे. तशानेच ते समजणार आहे. वाटेल गुंतागुंतीचे पण यातूनच उकलणार आहे खरे. गुंता सुटणार आहे सारा. ठ रवाने परावाणितील एका विशिष्ट जागी धक्का बसतो-स्पंदन होते नी जीवाचे अजपामुख उघडते. श्रीमाउलींनी यासच अजपाजपणे उलट प्राणाचा..किंवा ज्ञानदेव मौन..जपमाळ अंतरी, असे जे सांगितले आहे, तो भागही याचेच द्योतक आहे. याचाच निर्देश आहे, याचेच वर्णन हरीपाठात केलेले आहे. श्रीकपिवरांचे बल वर्णितांना

श्रीसमर्थांनी याच ठ रवा बद्दल, ठ कारे पर्वता ऐसा..असे आपल्या श्रीमारुतीस्तोत्रात सांगितले आहे. असे हे परेचे बलवर्धन हेतू हा ठ रव उपयुक्त आहे. ड रवाने आपले कर्णेंद्रिय स्वच्छ होतात. त्यांमधील शक्ती जागी होते. जसे डमरुचा नाद. कडकडाट. धडधडाट असे. हा रव फार वेगळा आहे. याविषयी आपण पुढील पुस्तकात पाहू. ढ रवाने आपल्या उदरशक्तीस पुष्टी-तुष्टी प्राप्त होते. पोटातील पोकळी या रवाने जाणवते. जसे ढुमके वाजायाला लागल्यावर आपल्या पोटात खड्डा पडणे, पोटातच ढोल वाजत आहेत असे वाटणे तसे. या रवाने पोटातील पोकळी वाताकडे झुकत नाही. नी परिणामी उदरयज्ञ म्हणिजेच उदराग्नि सतत तेजःपुंज राहतो. उदराग्निमधे तेज असावे. तो तेजःपुंज असण्याकरीता आपणांस फार वेगळ्या प्रकारीचे अन्नसेवन करावे लागते. केवळ जीभेला आवडणाऱ्या चवीचेच ते अन्न नसते. साऱ्या रोगांचे मुळ तर हे उदरच आहे. तेच हा ढ रव स्वच्छ ठेविते. ण रवाने उच्चतम नादाशी आपला संयोग-संपर्क होऊ शकतो. उच्चतम नाद म्हणजे श्रीमहानंदीचे रुजन-श्रीमहादेवांच्या शिंगीचा नाद म्हणजेच भुजन-तयांचे करातील श्रीडम रवाचा रव-श्रीभवानींच्या पैजणांचा नाद म्हणिजेच कुजन-तयांचे वाहन श्रीव्याघ्र यांच्या श्वासोच्छ्श्वासाचा नाद म्हणिजेच योजन. ढग ही एक अशी पोकळी आहे की तीचे भेदन करता येणे जीवास अवघड आहे. परंतु नाद मात्र कुठूनही-कसाही-कुठेही-कशाचेही भेदन करु शकतो. फक्त तो नाद ऐकण्यासाठीच श्रीसमर्थ जीवास सर्वप्रथम ती श्रवणभक्ती कर-जाण-शिक, असे आपल्या नवविध भक्तीतंत्रात सांगत आहेत. त्याचा स्वतंत्र विचार-अभ्यास त्या समासाचे वेळी आपण करणार आहोतच. श्रीश्रीगजाननमहाराजांच्या श्रीगजाननविजय ग्रंथात असा एक प्रसंग आहे की, श्रींची पूजा एका भक्ताचे सदनात आरंभिलेली असते. एक जोडपे नामे श्रीगणेश, उपनाम अप्पा व त्याची पत्नी असे, त्या पुजेस उपस्थित असतात. ती पूजा-तो आनंद पाहून त्यांची पत्नी पतिस वदते, आपण या साधूंस आपुल्या सदनी नेऊया. तेव्हा तिचे पतिदेव तिस वदतात, बाई गो, हे साधूचरण सदनी येणे अवघड आहे. आपुल्यापाशी तो पुण्यसाठा-ती पुण्यजोड नाही. शिवाय

पदरी गरीबी. तरीही पत्नी विश्वासाने वदते, नाही हो, सांगे माझी मनोदेवता सदनी साधू येतील हो..गरीबावरी असते प्रिती संतांची ती विशेष. हे तयांचे संभाषण सुरु असतांनाच श्रीमहाराज त्या श्रीगणेशअप्पांचा कर धरुन त्यांस विचारीते होतात, तुझे आहे कीती सदन दूर..ते मजला सांगावे. अरे मनी असेल ते बोलावे भीड न धरीता कवणाची. बाकी पुढचे आपण दहाव्या अध्यायात वाचू शकतो. म्हणून ही घटना आपण येथपर्यंतच घेऊ या. कारण या लिलेमधून श्रींना हेच जाणवून द्यावयाचे आहे की श्रीमहाराजांपासून-श्रीसमर्थांपासून-श्रीकपिवरांपासून आपले सदन म्हणिजेच आपले हृदय दूर नाही. फक्त नेली लाज धीट केले देवा, असा या पार्थिवास तो चैतन्य स्पर्श होणे बाकी आहे. त्या चैतन्याच्या वाटेवर हे पार्थिव आडवे येउ नये. त्यास दूर करण्याचे बळ त्या चैतन्याने आपणांस द्यावे. नी पार्थिव म्हणिजे लाज-संकोच-पाप-लपविणे-लबाडी-आत एक बाहेर एक, हे आपण पाहिलेलेच आहे. श्रीसंतांच्या लिला, या आपल्या बुद्धीचा तो कठीण कक्ष संशय-अविश्वास-तर्क हा कठीण कक्ष, फोडून ज्या क्षणी एखाद्या कारंज्याप्रमाणे बाहेर उसळतील त्या क्षणी जीव खरोखरच आनंद वन भुवनी..आनंदाचे डोही आनंद तरंग..अनुभव करेल. त रवाने जेथल्या तेथेच ज्ञान गवसते-सापडते-लाभते. म्हणजे जसे त वरुन तपेले तसे. तत्काळ ज्ञान होते. खूप समजावून सांगावे लागत नाही. त या अक्षराची रचना फार वेगळी नी एका वेगळ्या कारणासाठी श्रीभगवंतांनी केलेली आहे. थ रव हा पक्षांचा रव समजला जातो. कारण पक्षांस अथर्व या योगाचे ज्ञान झालेले असते. हा रव जीवास फारसा लाभत नाही. कारण जीवास स्थिरतेचे गांभीर्यच अजून उमगलेले नाही. जीव फार चंचल आहे. म्हणूनच श्रीसमर्थही आपणांस सांगत आहेत, आपले लक्ष याचकडे वळवित आहेत, सुरेंद्रचंद्र शेखरु अखंड ध्यातसे हरु..जनांस सांगतो खुणा..श्रीराम राम हे म्हणा. श्रीमाऊली देखील जीवाचे लक्ष इकडेच वळवित आहेत, की ठायीच बैसोनि करा एकचित्त. परंतु तो ठावच अजून जीवास दुर्गम-दुर्लभ आहे. जीवाने हे गांभीर्य गांभीर्याने घेतिले नाही म्हणूनच दुर्लभ-दुर्गम झाले आहे सारे. जीवाने या साऱ्याचा विचार जरुर करावा. द रवाने आपले जडत्व

नासते. आजारी पडण्यापूर्वी जसे जडजीवास थोडा अशक्तपणा-थकवा जाणवतो नी नंतर ताप चढतो तसे. परंतु हे झाले जडत्वाचे जडलक्षण. द रव मात्र हेच जडत्व नासवून जीवास लगेचच व्याधिमुक्त करतो. या द रवाचीही आपणावर बहुकृपाच आहे. कारण प्रकृतिअस्वास्थ्य असले की जीवास काहीच करावेसे वाटत नाही. सत्संग-ग्रंथवाचन-पूजा, एवढेच नव्हे तर कोणाशी बोलण्याचेही बळ त्याजवळ नसते, अशावेळी जर हा द रव ऐकू आला तर..तर जीव व्याधिमुक्त होऊ शकतो. पण सारे गांभीर्यच घालवून बसल्यामुळे आता हे दुरापास्तच आहे. या द रवाचा थोडासा धागा बघावयाचा तर पानांची एकमेकांना लागून होणारी सळसळ. हा द रव होय. ध रवाने आपली क्षुधा प्रज्वलित होते. उदरकुंड धगधगायमान होते. या समयी जर उत्तम नी पूर्णपक्व अशा पदार्थांचे जर जीवाकडून सेवन झाले तर त्यास सात विद्या नी दोन कला अवगत होतात. कला म्हणजे असे ज्ञान की ज्यात इंद्रीयांच्या मदतिची आवशकता नसते. इंद्रीयांपलीकडीलच हे ज्ञान असते. आपण असे कथांमधून ऐकीले आहे की श्रीइंद्र येतात. तःपश्चर्यारत अशा त्या जीवाची ते परीक्षा करीतात. त्यांना वाटते की आपले राज्य हा घेईल. आपले पद मागेल. वगैरे. तो कथाभाग सोडला तर हिच ती पायरी. हिच ती कला होय. परंतु पूर्णपक्व अन्न म्हणिजे माती-बीज-कृषिवल, म्हणिजे शेतकरी-सिंचन-बहर-उभारणी-पिक-कापणी-मळणी-पाखडणी-दळणी-रांधणी-रांधणारी-रांधलेले-नी ते सेवन करणारा, सारेच परिपूर्णपक्व हवेत. पूर्ण जाणते हवेत. तरच हे शक्य आहे. अवघड काही नाही. पूर्वी फार सहज नी आपल्या घरातीलच होते हे सारे. आता हे सर्व अधुनिकतेमुळे दूर गेले-दुःष्प्राप्य स्तरावर गेले. न रव जीवास अतिंद्रियांपलीकडील शक्तींना म्हणिजे भाव-भावातील शक्तींना उद्दीपीत करतो. हेच ते भावबळ ज्या भावबळाने श्रीसमर्थ आपणांस आकळणार आहेत. जेथे तर्क पांगुळतो-प्रयत्न थांबतात. ज्ञान मौन धारण करते. श्रीसरस्वती मुग्धतेकडे झुकतात. जाणिव कक्षा सोडते. प्रेम पुढे पाऊल टाकते होते. विवेक आपले बोट धरीतो. नी भाव जे दाखवितो-जे दर्शन करवितो ते ते श्रीपरमदर्शन-त्या परमश्रीदर्शनाचा कारक म्हणिजे हा

न रव होय. भाव जे दाखवितो-यावरुन श्रीसमर्थ श्रीछत्रपतींना काही दाखवित असल्याचे स्वरुप बऱ्याचवेळा चित्रात आपण पाहिले असेल. त्यावेळी श्रीसमर्थ आपली तर्जनी उंचावून हे भावचित्रच-हा न रवच श्रीछत्रपतींना स्पर्शवित आहेत. फार उच्च अर्थ आहे या साऱ्यात दडलेला. **प** रव हे सारे रव आहेत. स्वर म्हंटले की आपणांस सा रे ग म प ध नि सा..असा जो मर्यादीत बोध होतो तसे यांस काही मर्यादा-बंधन नाही. स्वरांस गेयतेची-उच्चाराची आवश्यकता भासते तर रवास मुग्धतेची-मौनाची. प रव या रवाने ज्वारी-बाजरी-मका-हरबरा-शेंगदाणे यांवर अग्र प्रसव होतो. या धान्यांवर एक बारीकसे बाहेर आलेले टोक असते. ज्यास नाक म्हटले तरी चालेल, त्याने कळेल असे. त्या अग्राचा प्रसव होतो. हाच प्रसव कडधान्यांमधे ही होतोच. कडधान्ये पाण्याच्या संपर्कात आल्यानंतर म्हणजेच कडधान्ये भिजविल्यानंतर मोड-कोंब असा अग्र स्वरुपात हा रव प्रसवतो. प रव हा अग्र प्रसव आहे. म्हणून हे अक्षर बहुतांशी अंती लागते आरंभी कमी. कारण याची सुरवातच मागून आहे. धान्य उपजल्यानंतर अग्र, असे. जसे तप-जप-गप-लप-असे. **फ** रव हा आपण फुंकर या स्वतंत्र प्रकरणात पुढे बघणारच आहोत. किती-कसा-कुठल्या प्रकारे तो कार्य करतो ते. हा रव अग्निचा कारक असल्यामुळे एखादे काम जमले नाही-झाले नाही-की आपण त्यास फजीती म्हणतो. म्हणिजे आपण हरलो असे. म्हणिजे काय तर बुद्धी हरली, नी हा फ जिंकला. फ जीती अशाअर्थाने. खूप खूप गूढ गंमती आहेत या साऱ्या. आपणांस श्रीसमर्थकृपेचे देणे, की हे कळते आहे सारे. नी आपले ज्ञानपात्रही समृद्ध होत आहे अशाने. **ब** रवाने आपणांस आपल्या वामशक्तीस जागविता येते. ही शक्ती प्रचंड परंतु सुप्त अशा अवस्थेत असते. ती या ब रवाने जागी होते. जसे बरं-बरे-बरे आहे. म्हणिजे आपण आपल्या संपूर्ण प्रकृतिचे वर्णन बरे आहे या एका शब्दाने करु शकतो. एवढा त्यात अर्थ गर्भित आहे. या अर्थाने हे घेतिले तर अधिक उमजेल. चांगले याअर्थी हा बरे शब्द आपण योजितो. श्रीगजाननमहाराजांनी देखील श्रीटेंबेस्वामींशी केलेल्या संभाषणामधे 'फार बरे', याच शब्दाची योजना केली आहे. गुढ आहे हे. **भ**

खास आशिर्वाद स्वरुप घेतिले तरी चालेल. हा ख आपल्या भाग्यशक्तीचा द्योतक आहे. जर जीव हा ख ऐकू शकला तर त्यास संधीची चाहूल लागेल नी त्याचा त्यास आपल्या आयुष्यात उपयोग करुन घेता येईल. म खाने जीवाचे भ्रूमध्य सिंचित होते. स्पंदन करीते. जसे आपले दोन डोळे आपण पाहू शकतो. नी त्याच डोळ्यांस ही सारी सृष्टीही दिसते. तसेच भ्रूमध्यावरही एक नेत्र-एक डोळा आपणांस आहे. मात्र आपल्या डोळ्यांसारखे याचे पापणी-भिवई-बुबुळ-पटल इत्यादी काहीच बाह्यतः दिसत नाहीत. ते सारे या भ्रूमध्याच्या आतच अंर्तभूत असते. म्हणिजेच ललाट-कपाळ यांचे मध्यस्थानी हा डोळा अर्विभूत असतो. ब़ाहेर काहीही दिसत नाही कपाळा शिवाय. नी या न दिसणाऱ्या परंतु असणाऱ्या, नेत्रांच्या पापण्यांची उघडझाप म्हणजेच हा म ख होय. या नेत्राने आपले अनंतजन्म पाहीलेले आहेत. निरनिराळ्या श्रीसाधू-संतांच्या भेटी-अनंत भाग्यकाल-हरवलेले संधीकाल-त:पश्चर्या-पतन-उर्ध्वगती-ब्रह्मलोक-अमृत सरोवरेही या नेत्रांनी पाहीलेली आहेत. म्हणूनच तो आपली तृषा-आपली क्षुधा पूर्ण करीत नाही. ती संतत जागी ठेवतो. या योगेच आपणांस वारंवार भूक लागणे-तहान लागणे या क्रीया घडत असतात. परंतु या क्रीया ज्याकडे निर्देश करीत असतात तिकडे आपण केवळ या उपलब्ध दोन डोळ्यांनी पाहू शकत नसल्याकारणाने आपणांस या गोष्टी दिसत असूनही अदृश्य या सदरात घ्याव्या लागतात. घेतिल्या जातात. आपण जेव्हा डोळयांनी कुठलेही दृश्य पाहतो, तेव्हा आपल्या डोळयातून त्या वस्तूवर सर्वप्रथम काळीकिरणे पडतात. नी तद्नंतर ती वस्तू आपणांस जसा रंग आहे त्याप्रमाणे दिसते. हे सारे क्षणापेक्षाही कमी कालावधीत घडते. हा कालावधी जर समजून घ्यावयाचा तर बघा-की आपणांस काही लागले किंवा चटका बसला तर काही लागल्याची-भाजल्याची आपणांस असेच काही क्षणानंतर जाणिव होते. काही क्षणानंतर ती भावना जागृत होते नी आपणांस ती व्यथा जाणवते. तसेच या काळ्या किरणांबाबत होते. म्हणूनच ही काळी किरणे सर्वप्रथम कुठल्याही वस्तूवर पडत असल्याकारणाने आपल्या डोळ्यांस अंधारातले दिसत नाही. आपण या काळया किरणांमुळे फक्त प्रकाशातच

व्यवस्थित पाहू शकतो. भ्रूमध्यातील या गुप्तनेत्रातून मात्र धवल किरणे उद्दीपीत होत असल्याकारणाने अतिधवलतेतील सारी दृश्येही ही किरणे आपणांस दाखवू शकतात. तसे धवल प्रकाशाकडे आपण फार वेळ याच काळ्या किरणांमुळे पाहू शकत नाही. आता आपणांस जसे ढगांपलिकडले काहीही दिसत नाही. म्हणजे काळ्या किरणांमधून परावर्तीत दृश्ये तसे आपण रोजच पाहत असतो. फक्त धवल किरणांची शक्ती मात्र अत्यंत सात्विकतेने विकसित होते. जसे आकाशभेदन होय. य हा रव आपल्या पायांच्या टाचांमधून आपणांस कळतो. कधी कधी टाचांस कंड सुटणे हे त्याचेच लक्षण होय. कारण टाचांना सहसा कंड सुटत नाही. या रवाने आपणामधे असलेली एक अशी शक्ती जागृत होते की जी आपणांस अनुतापापर्यंत घेऊन जाते. आपणास अधिक विस्ताराने हे समजून घ्यावयाचे असल्यास बघा-श्रीयमुनेमधे अत्यंत पहाटे म्हणिजे ब्रह्मकमल विकसित होण्याचे वेळेस जर स्नान केले तर हा रव आपणांस ऐकू येतो. ही वेला म्हणिजे साधारण आपल्या घड्याळानुसार रात्री १.४५ ते पहाटे २.४५ अशी. पाण्यातूनच हा रव आपणांस ऐकावा लागतो. कारण याचा स्वभावच स्वच्छ-शुद्ध करण्याचा असल्याकारणाने हा नेहमी पाण्याच्या आश्रयासच राहतो. नी बहुत करुन तो श्रीयमुनेमधेच वास्तव्यास असतो. कारण श्रीयमुना या श्रीयमाजीभास्करांच्या म्हणजे श्रीयम, यांच्या भगिनी होत. नी साऱ्या काळ्या गोष्टींचा 'शुद्धीकरणप्रकल्प' श्रीयमांच्या अख्त्यारीत. म्हणून हा रव बहुतांश श्रीयमुनेमधेच जाणवतो. नद्यांमधे पापे धुऊन निघतात म्हणिजे काय तर त्या तीर्थांमधे पवित्रता-शुद्धता उद्धीपित करणारे असे काही प्रवाह असतात की तेथे माणूस खोटा-नकली राहूच शकत नाही. पृथ्वीवरील सर्व तीर्थांमधेच ही पवित्रता त्यामुळेच विद्यमान आहे. फक्त आता तीही तितकीशी आपण माणसांनी ठेविलेली नाही. पापानी काळी झालेली माणसे नदीमधे स्नान करुन दिव्यदेह धारण करीते झाल्याच्या कथा आपण ऐकील्या आहेत. त्या सत्य आहेत. तेवढी पवित्रता आता आपण ठेविलेली नाही. श्रीगजाननमहाराजांबरोबर असणाऱ्या पाचही जणांचे श्रीनर्मदामातांनी प्रत्यक्ष येऊन प्राण वाचविल्याची लिला आपण

श्रीगजाननविजय ग्रंथाच्या १४ व्या अध्यायात वाचू शकतो. ही तर घटना आत्ताची म्हणिजेच १९ व्या शतकातील आहे. काहीच खोटे नाही सारेच सत्य आहे. फक्त आपण त्या परमसत्यापासून दूर गेल्यामुळे आता यावर आपला विश्वास बसणे कठीण झाले आहे. नी त्यात पुन्हा नुकसान आपलेच आहे. र रवाने आपला तो तळ ढवळून निघतो ज्या तळामधे आपली अनंतजन्मींची निषिद्ध अशी कर्मे पडून असतात. नी फळावयाची वाट पाहत असतात. यासच दुसरे नाव रवरव किंवा रौरव असे आहे. रौरव हा नरक आहे. नी हाच तो नरक. ज्यामधे जीवाला अनंत अशा दारुण यातना भोगाव्या लागतात. नी त्यातून त्यास कधीच सुटका नसते. म्हणिजे प्रत्येक जीवाला त्याच्या त्याच्या कर्मस्वरुप त्या यातना प्राप्त होतातच. कुठल्या कर्माचा काय परिणाम होतो याबाबतचा जीवाचा काहीच अभ्यास नसल्याने त्यास असे वाटते की मी काहीही केले तरी असे काय होणार आहे? परंतु जीवाला कुठल्याच कर्मातून सुटका नाही. चांगले व वाईट अशी दोन्हीही कर्मे त्यास भोगावीच लागतात. कारण हा कर्माचा जो भाग आहे तो एका जन्माचा नसतो. जीवाचे अनंतजन्म, त्या अनंतजन्मांच्या बरोबरीने येणारे स्मरण या साऱ्याचा भाग यात धरीला जातो. यासच भोग म्हटले जाते. जिवंतपणी म्हणूया किंवा एका जन्मात म्हणूया, जीवाकडून ज्या ज्या कर्मांची परतफेड करुन घेतली जाते त्यास संचित-प्रारब्ध व क्रियमाण असे संबोधन आहे. म्हणिजे त्यास आपल्या आयुष्यामधे सवडीने काही भोग भोगण्याकरीता दिले जातात-आर्युमर्यादा पाहून, तो त्या आयुष्यात कीती कर्मांना परतवू शकेल-फेडू शकेल, याचा अभ्यास करुन, त्यास ती नी तेवढीच कर्मे एका जन्माकरीता दिली जातात. आपल्याला आयुष्यात अनुग्रह झाला, आपल्या श्रीसद्गुरुंची नी आपली जर भेट झाली तर श्रीसद्गुरु कृपेमुळे जीवास काही भोग हे सवडीने भोगण्याचे स्वातंत्र्य प्राप्त होते. श्रीसद्गुरुसान्निध्य व त्यांच्या सेवेने जीवास महाभयानक असे भोगही सहज भोगता येतात. अर्थात ही शक्ती श्रीसद्गुरुंची होय. श्रीसद्गुरुंच्या कृपाकृशाने सर्वकर्मांचा म्हणजे अनंतजन्माच्या अनंतकर्मांचा नाश आपण करु शकतो. परंतु यासाठी श्रीसद्गुरुचरणी अनन्यता असली

पाहीजे. याचा उल्लेखही श्रीगजाननविजय ग्रंथामधे आलेला आहेच. की श्रीसद्गुरुसान्निध्य केवढे प्रबल असते म्हणून. कशी ही लिला आहे बघा- संसारास कंटाळून नी बायका पोरे मरुन गेल्यावर एक माधव नावाचा माणूस श्रीमहारांजाचे पायाशी लागला. नी या श्रीमाधवाने श्रींचे पायाशी बसून मला यमलोकास नका धाडू, मला वैकुंठात धाडा, असे सांगतिले. नी श्रींनी त्यास एका रात्री भयानक असे श्रीयमांचे रुप घेउन, काळ माणसाची काय गत करतो ते दाखविले. तेव्हा श्रीमाधव पळावया लागले. त्यांची वाचा बंद झाली. छाती धडधडा उडायाला लागली. म्हणजे प्राण जाताना जी जीवाची भयानक अशी अवस्था होते, तीच माधवांची प्रत्यक्ष श्रीयमांना पाहून झाली. त्यांची ती भयानक घाबरलेली अवस्था पाहून श्रीगजाननमहाराजांनी पुन्हा सौम्यरुप धारण केले नी ते वदले, हेच का तुझे धीटपण । तू काळाचे भक्ष जाण । असाच खाईल काळ तुला । त्याची चुणुक दाखविली। पुढची स्थिती जाणविली।तेथे पळाया नाही उरली। यमलोकात जागा तुला।। तेव्हा माधवाने सांगितले की महाराज तेवढी माझी यमलोकाची वार्ता टाळा. यमलोंकी जे दिसणार होते। ते तुम्ही दाविले येथे । आता या लेकराते । यमलोकी धाडू नका । माझ्या पातकांच्या राशी। आहेत जरी बहुवशी। परी त्या जाळणे तुम्हांसी । नाही मुळी अशक्य। काही सुकृत पदरी होते । म्हणून पाहिले तुम्हांते। संतभेटी ज्याला होते । यमलोक ना तयाला ।। नी श्रींनी त्यास सरळ वैकुंठात धाडीले. नी त्याचे जन्म-मरण चुकविले. या सर्व गोष्टीतून आपण शिकायाचे हेच की हे सारे श्रीसद्गुरुकृपेचे देणे आहे. नी आपण त्या शक्तीसच अजून-आतापर्यंत ओळंखिलेले नाही. नी म्हणूनच जो या शक्तीस न ओळखताच नावे ठेवितो त्या जीवाचे या रवरव अशा नरकात पतन होते. साडेसाती हा जो जीवाच्या कर्माचा अतिकठीण नी अनिवार्य असा भाग त्यास जीवंतपणी भोगावाच लागतो, ती साडेसातीही या र रवाची या रौरवाची केवळ एक झलक म्हणून म्हणूया अशी असते. ल हा रव जीवाची बाल्यावस्थेमधून सक्षम अशा अवस्थेप्रत जोड करीतो. नी जीवाला स्वतःच्या पायांवर उभे करुन एक निश्चित असे भान देतो. या रवाने जीवाचे संगोपन

होते. लहाल मुलास खेळवितांना या खातूनच आपण त्याच्याशी संवाद करतो. थोडक्यात आपण जे बोबडे बोल त्याच्याशी बोलता ते म्हणजे हा ख समजावा. कारण त्या बोबड्या बोलात आपण बरेचसे शब्द उकारार्थी वापरतो. शोनुल..बबड्डुल..अडगुल मडगुल..सोन्याच कडबुल..रुप्याचा वाळा..तान्ह्या बाळाला न्हाउ घालूया, अशापद्धतीने आपण त्या बालजीवाचे या ल खाने संगोपन करीत असतो. असे का, तर बाळास या ल खाची गर्भातच ओळख झालेली असते. आपली शालेय अभ्यासाची बाराखडी जशी अ आ ते क ख ग अशी सुरु होऊन स श ह ळ क्ष ज्ञ अशी संपते. तशी जीवाची बाराखडी ही म पासून सुरु होते. म्हणिजेच तो शेवटून सुरवात करतो. लृलृ लृलृ अशापद्धतीने जीभेची हालचाल करीत, असे बोल काढीत आपण त्यास खेळवितही असतो. या ल खाने जीवास आपण पृथ्वीवर आलो आहोत हे भान येते. म या अक्षराचा उच्चार जीवाकडून सर्वप्रथम होत असतो. या म उच्चाराने तो स्मरणशक्तीशी संबध जोडीत राहतो. कारण हा उच्चार करताना त्याचे शरीर तो पुढेपुढे सरकविण्याचा प्रयत्न करीत असतो. या ल खाने त्यास उमगते की आपण आता पृथेवर आलो आहोत. म्हणिजे येथे आता पाय हा अवयव महत्वाचा आहे. येथे आपणांस उभे राहिले पाहिजे. नी मग पुढच्या क्रीया त्याच्या तशापद्धतीने सुरु होतात. जसे पाय हलविणे-पालथे पडणे, असे. हा ल ख त्यास झोळीत कींवा पाळण्यात अथवा मांडीवर ऐकावयास येत नसल्याकारणाने तो पाळण्यात अथवा मांडीवर घेतल्यास चटकन झोपतो. नी खाली टाकले की खेळायला लागतो. कीत्येक वेळा बाळाची आई म्हणते सुद्धा, की याला खाली टाकले नां की लागतो खेळायला. हा सारा या ल ख ज्ञानाचाच एक भाग आहे. कारण झोळीत तो हा ल ख ऐकू शकत नसल्याकारणाने त्याची जाग, निद्रेत परावर्तीत होते. जाग नी निद्रा या दोनच अवस्थांमधून जीवाचे संक्रमण-वाढ-वृद्धी-अभ्यास-आगम-निगम होत असल्याकारणाने जीवाला दुसऱ्या कुठल्याच अवस्थांबाबत जाणिव कींवा माहीतीही नाही. परंतु जागृति ही अशी अवस्था आहे की ज्यात निद्रा संभवतच नाही. येथे झोप हा सामान्य अर्थ घ्यावयाचा नाही. एकदा

ज्ञानकक्षा जागृत झाल्यानंतर पुन्हा कधीही अज्ञान अंधःकार येत नाही असा अर्थ येथे घ्यावा. हा सारा बाळाच्या विकासाचा भाग आहे. नी तो या ल रवाशी संलग्न आहे. व रवाने आपणास हास्य प्राप्त होते. म्हणिजे हास्याचा जो आरंभ तो या रवाने होतो. म्हणिजे काहीजण गालातल्या गालात हसतात. काहीजण स्मितहास्य करीतात. तर काही जण खो खो करुन हसतात. त्या सर्व हास्यांचा आरंभ हा या व रवाने होतो. बरेचवेळा आपण हसताहसताही हे अक्षर उच्चारतो. जसे वा..वा असे. या व रवाने जीवाच्या पोटात एक पोकळी तयार होते. नी त्यात बासरीचे जसे स्वर फिरतात तशी वायुरुप पोकळी हलते नी त्यास हास्य फुटते. हास्य हा वायु आहे. म्हणून माणसाचे हास्य हे एखाद्या स्वरासारखे असते. थोडे तुटक असते. एकसंध असे नसते. जसे..खी खी खी..हो हो हो..खो खो खो..हा हा हा असे. श रव नी ष रव हे एकाच प्रकारीचे रव आहेत. फरक एवढाच की श रव हा मौनाशी संबधीत आहे. नी ष रव हा मौनातील मौनाशी. शब्दही न बोलणे म्हणजे मौन. नी न बोलता फक्त श्रवण करणे म्हणिजे मौनाचे ही मौन होय. मनन, या प्रकारात हे दोन्हीही रव येतात. आपण जसे कोणी गडबड करु नये अशा अर्थांने सार्‍यांना शांत बसवितो. तेव्हा तोंडावर बोट ठेउन श्शश्श असा आवाज करतो तोच हा रव होय. माणसास खूप गरम होत असले नी उकाडा जाणवत असला की तो तोंडाने हा असाच श्शश्श असा अक्षर उच्चार करीत हवा आत घेण्याचा प्रयत्न करीत असतो. या शब्दांनी त्यास गारवा जाणवतो. हुश्श या अक्षर उच्चाराने देखील त्यास हलकेपणा जाणवतो. स हा रव जीवाला कधीही ऐकावयास येत नाही. कारण कानाच्यापाळी मागे एक खोलगट असा भाग असतो त्या भागाशी हा रव संलग्न असतो. कान या स्वरश्रवणासाठीच खरेतर टोचले जातात. परंतु जीवाची ही एवढी उच्चश्रवण क्षमता नाही. त्याचा त्यास अभ्यास नाही. म्हणूनच श्रीसंत या कानाच्या पाळीस चंदन-गोपीचंदन-अष्टगंध-बुक्का असे लावितात. कानात कुड्या घालणे-कुंडल घालणे-बिगबाळी घालणे हे याच कारणाकरीता आहे. ह रवाने जीवाची भिती नाहीशी होते. भिती का वाटते तर, गोष्टी अज्ञात आहेत म्हणून. ज्या

गोष्टींविषयी काही ठाउक नसते त्या गोष्टींविषयी थोडी भिती असते. जसे भविष्य-मृत्यू-आरोग्य-नोकरी-शिक्षण-विवाह आदी. या ह खासच आपण आशा-आशावादी दृष्टीकोन असे संबोधितो. ह हे संवाद सूत्राचे माध्यम आहे. ळ हा ख जीवाचा मित्र आहे. ळ हे अक्षर प्रारंभी कधीच लागत नाही. ळ ने सुरु होणारे नाव इत्यादी असे काहीच नाही. हे अक्षर मधे किंवा अंती लागते. जसे पळा-मळा-तळण-पळापळ, असे. परंतु या ळ चा उच्चार मात्र जिव्हेवर सर्वात पुढे असतो. ळ उच्चारुन बघावा. जिभेच्या अगदी टोकावर-अग्रावर याचा उच्चार येतो बघा. याचाच अर्थ असा की जीवास या ळ अक्षराने प्रारंभीचे-मधले व अंतीचे ज्ञान होणे सुलभ जाते. जीवाचे भूत-वर्तमान-भविष्य हे या ळ खाने जीवास अंकीत होते. क्ष ख जीवाचे काही प्रश्न सोडविता होतो. काही वेळा आपण खूप डोके चालवूनही-बुद्धीचा खूप वापर करुनही उत्तरे सुचत नाहीत नी एखाद्या वेळेस ते पटकन सुचून जाते. नी आपणच आपल्याशी हसतो. काय आपण? एवढेही आपल्याला सुचू नये, अशा अर्थाने. तेव्हा हा क्ष ख त्या जाणिवेजवळ आपणांस नेत असतो. हे ध्यानात ठेवावे. यक्षप्रश्न हे याच सदरात मोडतात. हे क्ष नावाचे एक दालन-एक सदनच आपल्या बुद्धीत असते. ज्ञ ख सर्वात सुंदर नी जलद चालणारा-धावणारा-गतिमान-गतिशील असा हा ख आहे. आपल्याच डोक्यात एखादी गोष्ट जेवढ्या झटकन येते तेवढ्याच झटकन कींबहूना त्याहीपेक्षा जलद ती विसरलीही जाते. असे बुद्धीपटलावर येऊन एकदम दूर जाणे-न स्मरणे. नी नंतर त्या संदर्भातील काही आठवणी जाग्या केल्या. कींवा जेथे हे विस्मरण झाले, त्या स्थळावर आपण परत गेलो तर पुनश्च त्या विस्मरणात गेलेल्या गोष्टींचे स्मरण देणारा. स्मृती जागृत करणारा हा ज्ञ ख आहे. जसे आपण बऱ्याचवेळा म्हणतो, आत्ता..आत्ता आठवले होते बघ, तू मधेच काहीतरी बोललीस नी मी विसरले. नी नंतर पुन्हा ते आठवत नाही तोपर्यंत आपण अस्वस्थ असतो तसे. असा हा ख अत्यंत गतिमान आहे. त्याबरोबरीने जर आपली स्मृतिपाने राहिली, तर आयुष्यात सारेच स्मरणात राहिल. कधीच-कशाचेच-कीतीही जन्म झाले-कितीही योनी प्राप्त झाल्या तरी आपणांस

विस्मरण होणार नाही. श्रीमाऊलींनी याच ज्ञ रवाशी त्या श्रीमहिषांचा, महिष म्हणिजे रेडा. वेदोच्चारण प्रसंगी धागा जोडीला होता. अशा ज्या आत्मसदनात या साऱ्या जाणिवा हे सारे रव उद्दीपीत झालेले आहेत, अशा त्या निवृत्त सदनात श्रीसमर्थ सांगताहेत श्रीगजानना या..मी वाट पहात आहे. दास रामाचा वाट पाहे सदना. समजून घेतिले पाहिजे. अभ्यास झाला पाहिजे. आपण याचा कधी अभ्यास करणार? श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत की हे सारे जर का आपण म्हणिजेच जीवाने अभ्यासिले तर जीवाला कधीच दुःख-संकट-समस्या-व्याधि एवढेच नाही तर, जन्म-मरणरहित मुक्तावस्थेचा आनंदही तो घेउ शकेल.

गव्हाचे बी पेरले की गहू येतो. बाजरी-ज्वारी-तांदूळ सारे जसे पेरु तसे उगवते. नी मग याच पेरणी न्यायाने जर बघावयाचे तर, जीवास दुःख आहे, म्हणिजे त्यानेच दुःखाचे बीज लावले, असेच नव्हे का? दुःखाचीच बीजे पेरली असेच नव्हे का? बरे, आपण होऊन कोण हो दुःखाचे बी लावेल? फसविले गेलो असू कदाचित. यासच तर माया म्हणतात. की जी दृश्यात पकडते नी नंतर सत्य दाखविते. नी आपणास दृश्यापलिकडे बघण्याचा अभ्यासच नसल्याकारणाने आपणही दृश्यात पडल्यानंतर अदृश्यात लपलेले ते दुःख आपणांस दिसते नी आपण म्हणतो फसगत झाली. फ जीती. कसे हे सारे घडते याची सुचना-सावधानता जीवास करुन देताना श्रीसमर्थ सांगतात, सुख सुख म्हणता हे दुःख ठाकूनी आले.., असे तर झाले नसेल नां आपल्याबाबत? की जे सुखाचे वाटे स्थान तेच दुःखाचे निकेतन? मग त्या सुखामागे जर दुःख लपले होते, तर मग आपणांस ते का नाही शोधिता आले. नी अशाप्रकारचे फसवणे कां-कशासाठी? कुठे झोप लागली नेमकी. मळा पिकल्यावर लागली की-बी पेरतांना लागली? अभ्यास कुठे नक्की करावा? नी कशाचा करावा? कोण सांगेल? वारंवार पडणाऱ्या या प्रश्नांचीच तर श्रीसमर्थांनी ग्रंथराजात उत्तरे दिली आहेत. श्रीगुरुंनी शिष्यांसी साधिलेला तो संवाद आहे. श्रीसमर्थ त्या प्रत्येक अक्षराअक्षरात आहेत. आत्मस्वरुपाने विराजमान आहेत. ते प्रत्येक अक्षर आपल्याला श्रीरुपानेच भेटणार आहे.

अर्थात आपण त्या प्रत्येक अक्षरातील श्रीसमर्थांजवळ बसून संवादच करणार आहोत. तो संवादच आपणांस करावयाचा आहे. तो करता येण्यापर्यंत आपण हुशार नी जाणिवेचे व्हावयाचे आहे. त्याचीच तर तयारी श्रीसमर्थ या ग्रं मधून करुन घेत आहेत नां. **श्रीसमर्थच आपला, आपल्या ग्रंथाचा मुळारंभ आरंभ करणार आहेत. आपण आपली कोरी पाटी घेउन श्रीसमर्थांपुढे बसावयाचे. नी श्रीसमर्थ आपणास सांगतील, ग्रं लक्षात घे. तुझ्या ग्रंथाच्या पानातील पहिले अक्षर-अद्याक्षर-प्रारंभाक्षर-मुळाक्षर-ज्ञानाक्षर-आत्माक्षर-आत्मस्वरुपाक्षर हे श्रीसदगुरुंच्या मुखातील आहे. तू श्रवणार्थी आहेस. तू ऐकणारा आहेस. सर्वार्थांनी ऐकणारा हो. कुणाचे ऐकणारा?तर ज्याने ग्रं दिला नी त्यास अर्थ दिला, असा सार्थ ग्रंथ सांगणाऱ्यांचे तू ऐक. त्या रामदासांकडून तू या दासभावाचा-या अनुपम्य ठेव्याचा बोध घे.** तो सांगणारा तू ऐकणारा. तो १ नी तू १-असे दोघेही १ नी १ अ करा आहेत. अ कर्मी आहेत. अकरा म्हणिजे कर नाही ज्यास ते. कर म्हणिजे हात नाही, म्हणिजे थोटे या अर्थाने नव्हे, तर अकर-कर्म नाही ज्यास उरले तो. सरले कर्म भोग..झाली वाचा शुद्ध..काया वाचा मने..दिधली नामस्मरणे..आता ऐका गुरुदेवा.. प्रिय शिष्याची प्रार्थना..कृपा करा, म्हणा आपुला..दुजी आस नां या मना. असे हे अकर्म. असा हा अकर्ता होय. असे हे जन्म सुफळ संपूर्ण झाल्याचा भाव. अशी ही भक्ति, जियेने श्रीभगवंत पूर्ण जाणिला आहे. श्रीरामकर्ता म्हणता पावसी..यश कीर्ती प्रताप. हेच ते..हेच ते ११ होय. बरे या अकरात नुसते ११ नाही घ्यावयाचे तर बघा-१ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १० ११ अशी ही १ ते १० अक्षरे-संख्या-अंक, या अकरात गुप्त आहेत. म्हणूनच श्रीसमर्थ सांगतात-अ करा..अकरा..अक्रा..बहुअक्रा..काये अक्रा कळेचिना. ते कळेचिना हे आपल्यासाठी आहे बरे. श्रीसमर्थांना ते कळलेलेच आहे हो. ते आपल्यालाही कळावे म्हणून तर ते सांगत आहेत नां हा ग्रं उलगडून. आता एकाला जर अ करा करावयाचे आहे, त्या एकाला जर हे अकरा-अक्रा जाणून घ्यावयाचे आहेत, तर त्यास म्हणिजे त्या एकास २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १० कळले पाहिजेत नां? त्याने हे सुत्र समजून घेतिले पाहिजे

नां? पुन्हा आपल्याला घडविण्यासाठीच तर हे सारे आहे. हे जाणिले पाहिजे नां. नाहीतर पुन्हा अविश्वास-दंभ-गर्व ताठा आलाच. नी पुन्हा आपले आपणच नुकसान करुन घेणे म्हणिजे चुकीचे बीज लावणेच नां. चुकीची बीज पेरणीच नां ही? हेच ते जन्मदुःखमूळ होय. सरळ सरळ अर्थ घेण्याऐवजी वाकडेपणात शिरले की काय हाती लागणार? खळांची व्यंकटी सांडो, म्हणिजे खल-कपटी अशी वृत्ती येताच ती वृत्ती त्यजावी. याचा अर्थ, वाकडेपणा त्यजावा. मग तो कोणाशी का असेना, अगदी आपण आपल्याशी जरी धरीलेला असेल. कींवा अन्य कुणाशी जरी धरीलेला असेल. अन्य कुणाचा आपल्याशी जरी असेल तरी, अशी ती सारी व्यंकटी सांडायाला नको का? असा तो सारा वाकुडेपणा गळायाला नको का? आता ती व्यंकटी सांडणे, म्हणजे ती द्रवरुप आहे असा सुमार अर्थ करायाला नको. तर ती व्यंकटी आपण म्हणिजे पात्र. पात्र म्हणिजे भांडे. नीं पात्र म्हणिजे योग्य देखील. तर आपण योग्य असूनही, कुठल्या तरी कर्मांचे फळस्वरुप, निंदा करणारे-ऐकणारे झालो आहोत. म्हणून जो हा वाकूडपणा आणतो, त्या पात्राने, म्हणिजेच आपण हा वाकूडपणा सोडून दिला पाहिजे. दिवस अन् दिवस-आयुष्यभरही हा असं बोलला, तो तसं बोलला-ही असं म्हणाली, मग मी काय गप्प राहावयाचे का? ही अशीच निरर्थक भांडणे चालू ठेवतील. त्यात वेळ घालवतील. पण आयुष्यभर राग-मत्सर-द्वेष-निंदा यातील काहीही विसरणार मात्र नाहीत. वाकुडेपणा धरुन राहतील. धरुनच जातील. त्याचसाठी परत जन्मास येतील. परत परत येतील. याचसाठी श्रीगुरु सांगत आहेत, जाणते व्हा. अजाणते राहू नका. नेणते राहू नका. हुशार व्हा. या १ ते ११ ची फोड नंतर सविस्तर अशी आपणांस बघावी लागेलच. कारण आपणांस अकर्ता करणारे-मकर्ता ठेविणारे-उकर्ता व्हावयास शिकविणारे, या एका-या १ पूर्वीही कुणीतरी आहे. आता बी पेरणे आपणास जमले नाही, म्हणून शेतच दुसऱ्याला देऊन टाकावे का? नाही, तसे नाही, तर ही माती का दिली हे जाणिले पाहीजे. याचे जाणते व्हावयाचे आहे आपण. एकदा मातीची प्रतवारी झाली की संपले. मग प्रत कळल्यावर प्रेत होईल का? म्हणून श्रीरामकर्ता. तू

अकर्ता हो. अ करा होऊन त्या श्रीरामकरांस तू जाणून घे. श्रीरामकर जाण. बाकी तुला काहीही दुसरे जाणावयाचे नाही. उलगड तेव्हाच होईल जेव्हा तो दिप श्रीरामराय लावतील. नी तुझी ती दुष्ट लंका जळेल. मुक्तीरुप आईजानकी मुक्त होईल. जाणून घ्यावयाच्या गोष्टी फार वेगळ्या आहेत. त्यापर्यंत आपण पोहोचतच नाही. तेथेच श्रीसमर्थ आपणास नेत आहेत. जर आपण हा ग्रंथ जाणिला-हा ग्रं जाणिला तर श्रीराम आपणास श्रीअंकावर खेळविणार आहेत. नी आधीच विलंब झालेला आहे, आता अधिक विलंब नकोच नको. नी हे जर आपण आत्ताच, श्रीसमर्थ सांगत आहेत तोवरच जर जाणिले नाही नां, तर आपले वर्णन कसे होईल बघा-तू नाशिवंतामध्ये आलासी । आपणासी का रे चोरीतोसी । नाशिवंत देता कचकतोसी । फट् रे पढतमुर्खा ।। आपण मुळी अशाश्वतं. पुन्हा पडीला-जोडीला-मांडीला संबंध, अशाश्वताशीच. नी त्या अशाश्वतातील नश्वर असे त्या शाश्वतास देतानाही कचरतोस? मग काय शिकलास? श्रीसमर्थांनाही राज्य नको आहे. नी श्रीगजाननमहांराजांनाही ती श्रीमान पूजा नको आहे. श्रीतुकाराम महाराज तर सांगतात, म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखी । व्रत करा एकादशी ।। तुमचे येर वित्त-धन । आम्हा मृत्तिकेसमान ।। मग काय हवे आहे या साऱ्यांना..या श्रीसंतांना? त्यांना काय हवे आहे. तर आपण जाणता होणे हवे आहे. ज़ाणते होणे-हुशार होणे-कुणी फसविणार नाही एवढे हुशार असणे त्यांस हवे आहे. कोणी म्हणजे अगदी काळ-वेळ संधी ते जन्म-मृत्यूपर्यंतही कोणी आपणास फसवू शकले नाही पाहिजे. कोण हे प्रेम-किती हे प्रेम श्रीसमर्थांचे आपल्यावर. आपलेही एवढे नसेल हो आपल्यावर. दीनाचा दयाळु मनाचा मवाळु । स्नेहाळु कृपाळु जनी दासपाळु । तया अंतरी क्रोध संताप कैचा । जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा ।। म्हणून श्रीस्वामिराम हेच ते सत्य. श्रीरामकर्ता हेच सत्य. ११ ही संख्या कुठल्या पाढ्यांमधेही सापडत नाही. इतर सर्व संख्या पाढ्यांमधे येतात. गंमत आहे सारी. आपली गंमत होउ नये म्हणून ही शिकायाची. नउपासून एकापर्यंत थोडक्यात पाहावयाचे तर, नवमीचा सोहळा-हा सोहळा, जीव जन्मास आल्यानंतर आपण साजरा करीतो. अष्टमीचा पिठोळा-म्हणजे जीवात

त्या श्रीपरमअंशाचा श्रीअंशरुपी प्रवेश. जीव पिठातून स्वतंत्रपिंड स्थापना करीतो. सप्तमीचा डोहळा-म्हणिजे जीवाची तगमग. तो श्रीगर्भधर्त्या अशा आपल्या माऊलीस ही तगमग याच डोहळ्यातून देतो. षष्ठीचा कोहळा-जीव यावेळी म्हणिजे श्रीगर्भात असताना आपणांस काय काय करावयाचे आहे याचे स्मरणसूत्र मस्तकी धरीत असतो. पंचमीचा पोळा-म्हणिजे आपणांस जोजविणारा पाळणा कसा आहे, हे जीवास या पंचमीस उमगते. चतुर्थीचा तोळा-म्हणिजे जीव यावेळी हो-नाहीचे उंबरठ्यावर असतो. तृतियेचा आवळा-म्हणिजे जीव गर्भात प्रवेशून पृथेचा अंदाज घेत असतो. श्रीमातेच्या श्रीगर्भआवरणात जे रसायन असते त्यावरुन तो हा अंदाज गर्भात करीत असतो. द्वितियेचा सावळा-म्हणिजे जीव यावेळी पूर्ण अंधारातही नसतो नी पूर्णसा प्रकाशातही नसतो. नी प्रतिपदेचा काळा-म्हणिजे जीव बिंदुरुप श्रीगर्भात प्रवेशतो त्यावेळी तो या अवतारात अवतीर्ण होतो. तत्पूर्वीचा पवळा. तत्पूर्वीचा धवळा. म्हणिजे शुद्ध. असा जो नवमीपर्यंत जीव आला, तो हा दशमीस म्हणिजेच जन्मास आल्यानंतर त्या श्रीकर्ताराम यांस भेटला. नी तो ११ ला म्हणिजेच एकादशीस अ करा-अक्रा झाला. श्रीरामांपायी सर्व समर्पित करीता झाला. नी मग ती द्वादश त्याने पाहिली. म्हणजे १०+१० दोन दश साजरा करीता झाला. कसे, तर एकाने ९ महीने गर्भवास करुन दशइंद्रीये प्राप्त करुन घेतिली. नी एक असा की त्याने या जीवास एकादशी दिली. म्हणिजेच श्रीभगवंतांनी ही एकादशी दिली. असे हे दोनदश. द्विदश साजरा करणारा कोण, तर १-१० चा म्हणिजे एक दहाचा, १-११ म्हणिजे एक अकराचा. जसा पुन्हा अक्रा. बहु आहे या अक्राची उलगड. आपण थोडे येथे घेतिले. यातूनही नुसत्या आकडेमोडीतून केवळ गणित कळेल. परंतु यातील संकेताक्षरे उमगायाची नाहीत. म्हणूनच या साऱ्यासाठीच तर ती श्रीगुरुकृपा हवीच हवी. श्रीगुरुअंजनेवीण ते आकळेना. त्याच श्रीगुरुंना न मानिल्याने जीवास हे कष्ट पडतात.

..षष्ठम् संकष्ट - संभूती..

आता सहावे कष्ट संभूती. घडून गेलेल्या गोष्टींचा नंतर पश्चाताप

करावयाला लावणारे कर्म या भागात येते. आयुष्यभर पश्चातापाची वेळ येते. नी लक्षात येउनही उपयोग नसतो अशी विचित्र भीरभीर अवस्था होते. मागचे स्मरत नाही. पुढचे दिसत नाही. आहे तिथे करमत नाही. अशी विचित्र ही भिरभिर-भटकंती अवस्था. पुन्हा मुळ ठिकाणी येण्याकरीता सुरवात तरी आठविली पाहिजे. ती ही आठवत नाही. नी मग चिडचिड-राग-संताप-यातूनच सारा प्रवास मग होत राहतो. यासाऱ्यातून सुटण्यासाठी पुण्यकर्म करावे म्हणून भजावे, कोणास? तर त्या, सरळसोंड वक्रतुंड त्रियना, अशा श्रीगजाननास भजावे. नाहीतर ही कर्मे बाराव्यापर्यंत पुरतात. पुन्हा पंधराव्यात येतात. पंधराव्यात म्हणिजे पितृपक्षात. पितृ पंधरवड्यात. म्हणून कर्म करताना सावधगिरी बाळगिली पाहिजे. हातांनी कर्म. मुखानी कर्म. कानातून-मनातून ही सारी कर्मेंद्रियेच आहेत सगळी. श्रीपरमेश्वराने आपणांस या साऱ्या विचित्र गोष्टीतून तरुन जाण्यासाठी विवेक नावाचा सखा-बंधु दिला. पण त्याला शोधाण्याचाच विवेक जागत नाही. दुसऱ्याच्या चुका काढून त्यावर टिका टीपणे करणाऱ्यास हुशार म्हणावयाचे, असे चित्र जर असेल तर पश्चाताप आलाच. अशातच तर तो ठेविलेला आहे. अशानेच तर तो करावा लागतो नां. एक संताप तर आहेच आहे अत्यंत त्रासदायक असा. तापच ताप आहे हा. तो शरीर मनावर तर सहजची चढतोच. स्वार होतो-नासवून टाकतो सारे. त्यानेच तर मग कुठे चित्त लागत नाही. त्यावर त्रिविध तापांचा डोंगर. त्यावर १६ कलांनी तापणारे श्रीसूर्यदेव. पूर्ण तप्त असे. खाली धरणी तप्त. कारण हिरवळ आम्ही ठेविलेलीच नाही. अजून अंतःकरण तप्त. याउपरी मस्तक तप्त. आपण नोकर म्हणून संतप्त. मालकावरही संतप्त. घरीदारी सारेच संतप्त. गर्वाने तप्त. आपल्याला कोणी विचारीत नाही-जाणित नाही, याभावनेने अधिकच संतप्त. चला एवढ्या सगळ्या बाजूंनी जर या तप्त भट्ट्या पेटल्या आहेत, तर भाजून घेऊ स्वतःला. मडके पक्के करुन घेउ स्वतःचे. काय हरकत आहे? बलदंड होऊ-कडक होऊ-समर्थ होऊ-सोने होऊ-तेजाळून जाऊ या आपण. पण नक्की आपला धातु कोणता? काय नी कोणता पदार्थ आहोत आपण, काही ओळख आहे का आपणांस आपली? कुठे-कशाने नी कशी परीक्षा

करावयाची आपुली? प्रल्हाद भक्त करण्या खरा..स्तंभी प्रगटलास जगदोध्दारा. कसे आहेत हे श्रीप्रल्हाद तर, त्यांच्या पिताश्रींनीच त्यांचा छळ केला. उकळत्या तेलात श्रीप्रल्हादांस टाकीले तरी ते श्रीनामस्मरणाने-श्रीभगवत्प्रेमाने सुरक्षित राहिले. उंचावरुन त्यांस फेकीले तरी ते सुरक्षितच राहिले. पाण्यात तयांस टाकीले तरी ते या साऱ्यामुळे अतुट विश्वास बळावर सुरक्षित राहिले. नी आपण? सुरक्षिततेचा सारा, अगदी मनासारखा, खर्चिक बंदोबस्त करुनही असुरक्षितताच अनुभवितो. सतत भिती. सततच्या शंका. विश्वास कधीच बसत नाही. त्यामुळे पुढे बळकटी वगैरे विचारच करावयाला नको. आपण जरा आपला धातू-आपली घडण तपासू या. बघा-आपण जर शेंगदाणा असू तर एवढ्या प्रचंड अशा भट्टीमधे भाजल्या नंतर खरपूस होऊ. स्नेह जागेल आपल्यामधील. कणीस असू तर पीठ होउन मिसळून जाउ आपण. फुटाणे असू तर चविष्ट होउ. बुद्धीमांद्य हटेल-घटेल आपले. कंद असू तर हलके होउ. उपवासे पूर्ण होऊन जाउ. पोळी असू तर पक्व होउ. पूर्ण होउ. पौर्णिमा पाहू. भात असू तर गोळा होउ. पिंडोत्पत्ती जाणून घेउ. दगड असू तर फुटून जाउ. वाळू होउ चंद्रभागेची. करा परीक्षा आता या सर्वातून आपली. धडे वाचावे-धडे घ्यावे. कीती शिकवायाचे नी काय काय शिकायाचे. पुन्हा खरेतर-वास्तवात सांगावयाचे तर आपला म्हणिजेच जीवाचा हा सारा अभ्यास झालेला आहे. स्मरत नाही त्यास तो एवढेच. वेदांपासून श्रीसंतांपर्यंत केवढ्या समृद्ध परंपरा आपल्या. केवळ जीवाच्या कल्याणासाठीच्या. तेवढे कल्याण घ्यावे. तो कल्याणाचा अर्थ घ्यावा. बाकी कशाला लक्ष घालायाचे. माती जर नीट नसेल तर मडके घडणार कसे? माती तुडवूनही जर घट घडला नाही, तर त्या मातीचा सतत गोळा होत राहिल. चिखल होत राहिल. नी तो गोळा मग आऱ्यावरुन सारखा उतरत राहिल. नी मग तर असा चिखल कुंभारही फेकून देतात. त्या चिखलात मग गाढवे लोळतात. पण जर का आऱ्यावर हा गोळा चढला की घडलेच मडके. मग भराभर आकारास येतात, एकापाठोपाठ एक असे. पूर्ण समृद्ध असे. एक आवा रचावा एवढी मडकी घडतात एकावेळेस. मग काय विचारीता..श्रीसदाशिवाने कृपा केली ही. कारण आऱ्यावर, म्हणिजेच

श्रीकुंभारांच्या त्या चाकावर श्रीसदाशिवांचा-सांबसदाशिवांचा म्हणिजेच श्रीशंकरांचा डोळा असतो. आरी म्हणजे धावे असलेले चक्र. त्या चक्रामधे एक गोलाकार भाग असतो. त्यास श्रीकुंभारजन श्रीशंकरांचा डोळा मानतात. त्याची ते पूजा करीतात. नी मगच त्यावर घट चढवितात. म्हणिजे हे घट श्रींच्या डोळ्यांसमोर घडतात. घटविले जातात. नाहीतर घटच सारी. घडीने घडी काळ आयुष्य नेतो, ही ती घट. हा तो व्यय. ही ती व्यर्थता होय. म्हणून जाणा-जागा-जागवा-जाणते व्हा. नाहीतर कुंभारही टाकून-फेकून देईल या असल्या मातीस-मतिस. मग त्या तसल्या मातीत गाढवे लोळतील. गाढव म्हणिजे अंधार-अज्ञान. ज्याचा ग हा ढ आहे. लाभूनही 'व' जाणिला नाही असा तो म्हणिजे गाढव होय. म्हणूनच जर मडकी श्रीकुंभारांस जशी पाहिजे तशीच घडली तर मग काही काळजी नाही. मग त्यात ती कोवळीक-ती कठोरता नक्कीच येणार. आगित ठेवा नाहीतर पाण्यात ठेवा. सर्व ठीकाणी ती पक्कच. अशी घडावयाला मात्र हवीत सारी मडकी. सात प्रकारीची कोवळीक श्रीसांब रक्षण करीतात. ती सात प्रकारीची कोवळीक म्हणिजेच 'वासर' होय. वासरमणि म्हणिजे दिनमान. म्हणिजेच श्रीसूर्य. या श्रीसूर्यांच्या आवरणांस दिवस-वार असे म्हणण्याची आपली पद्धती. वार म्हणिजे आवरण. सोमवासरे-मंगलवासरे-बुधवासरे-गुरुवासरे-शुक्रवासरे-शनिवासरे-रविवासरे, असे आपणावर म्हणिजेच या यच्चयावत् श्रीसूर्य प्रांतांवर या वासरांचे आवरण असते. आवरण म्हणिजे कवच असते. जसे 'उ वच' म्हणिजे बोलणे. श्रीगीतेतील संवाद सुरु होतो तेव्हा, 'अर्जुन उ वच, असे येते. तसेच हे क वच. वच म्हणिजे बोलिणे. श्रीआदित्यनारायण म्हणिजेच श्रीसूर्य, ज्या वाचेने जीवाशी तद्वतच या साऱ्या चर-अचर सृष्टीशी बोलतात-संवादितात, ते हे शलाकासूत्र. ते किरणांच्या माध्यमातून बोलतात. हे क वच जे बोलत असते ते समजण्याची-उमजण्याची-ग्रहण करण्याची जीवाची क्षमता निश्चित आहे. त्याशिवाय कां त्यास या श्रीसूर्यशासित प्रदेशात ठेविले आहे. फक्त निरनिराळ्या व्यवधानात नी मुख्यत: उदर-द्रव्य यामधेच अधिकांश अडकल्याने-अडकवून घेतिल्याने-नी त्यापलीकडे काही जग आहे याकडे बघण्याची

तयारीच नाकारल्याने-त्यापलिकडे काही असेल हे समजूनच न घेतिल्याने-तसा विचारही करण्याची इच्छा, धाडस नसल्याने, ही खरी समृद्धता-हिचा अनन्यस्त्रोत-अव्याहतस्त्रोत रोज लाभूनही-येउनही-दिसूनही आपण भोगू-अनुभवू शकत नाही. साठवू-प्राप्त करुन घेउ शकत नाही. श्रीसमर्थ तिकडेच आपले लक्ष वेधित आहेत. अमृत टाकून विष प्याया कोणी जावे? पण काय आहे की, विषाचा पूर्ण अनुभव घेऊन झाल्यावरच आपणास हे अमृत स्मरते आहे. आठवते आहे. हेच तर दुर्दैव-दैवर्दुविलास-धक्कातंत्राली समजणे. नी एखादा धक्का बसून होणारे ज्ञान, म्हणिजे का अनुभव म्हणावयाचे? अहो तो तर धडा. अनुभव फार वेगळा. हे एवढे सुंदर आवरण, हे 'कवच' श्रीअंगराज कर्ण-श्रीसूर्यपुत्र यांस प्राप्त झाले होते. ते प्रत्यक्ष या धरेवरती या कवचाने व ती श्रीसूर्यशक्ती घेउनच म्हणिजे कवच-कुंडलयुक्त असेच धरेवरी आले. अशाप्रकारचे कवच म्हणिजेच कांती. परंतु या कांतिस साधे खरचटणे-ओरखडा-काटा-वाळू-रेती-बोच याचा कधीच अनुभव नव्हता. श्रीकर्णांनी कवच असेतो कधीच स्वत:चे रक्त पाहिलेले नव्हते. कवच काय हे उमजण्याकरीता हे सांगणे. म्हणिजे श्रीसूर्यदेवांच्या त्या किरणांमधील ताकद ग्रहण करण्याएवढी क्षमता जीवास आता या वातावरणातील-ऋतुमानातील-परंपरा-संस्कृतीतील भेसळीमुळे राहिली नाही. कारण हे कवच बुधवारी गर्भास घातिले जाते. श्रीगर्भात गर्भाचा पहिला बुधवार म्हणजे सप्त. श्रीसूर्यांचे हे सप्ताश्व म्हणिजेच आपले वार होत. अशी ही सप्ताश्वशक्ती, त्यास प्रथम बुधवारीच देण्यात येते. जर गर्भवतीने स्वत:चा नी या वासरमणिंचा थोडा जरी अभ्यास केला, तरी तिस हे वातावरण कळून येईल. पण त्यासाठी केवळ शरीरास विश्रांती-शांतता लाभून चालणार नाही. आत्मिक प्रदेशही तृप्त नी ज्ञानाने जाणता व शांत व्हावयास-असावयास हवा. तरच ही वातावरणातील मुग्धता तिस कळून येईल. वातावरणातील मुग्धता म्हणिजे, जाणून वैखरी शांतली-वाचा मौनावली-बुद्धीपैसावली. अर्थव असे श्रीगणेश नी अग्नी या साऱ्यांची शांत अवस्था म्हणजे 'मुग्ध'ता होय. बोलणे खुंटले-नेति नेति इति. अशा श्रीचंद्र-श्रीसूर्य मितीत वाढणारा जीव म्हणिजे 'नर'. नी श्रीचंद्र-श्रीसूर्य

भेदून वाढणारा जीव म्हणिजे वा..नर-वानर होत. आत्ता पृथ्वीवरील अस्तित्वात असलेल्या वानरांच्या रुपाकडे पाहून आपल्याला हा अंदाज येणार नाही. श्रीकपिवर ते सारे भेदून गेलेत. ही वानर मंडळी कधीही घरे बांधित नाहीत. घरे बांधून राहत नाहीत. कारण हे जीवनमुक्तांचे रुप आहे. नाहीतर पृथ्वीवरचे यच्चयावत सजीव जीव घरे बांधूनच मुलाबाळांचे-पिल्लांचे संगोपन-पालनपोषण करीतात. आरक्त देखिले डोळा। गिळीले सूर्यमंडळा । वाढता वाढता वाढे। भेदिले शून्यमंडळा ।। श्रीकपिवरांचेश्रीहनुमतांचे हे अफाट असे बल आहे. श्रीसमर्थ हे स्वत:विषयीचेच वर्णन करीत आहेत. देह धरुन  वानरी । अखंड दास्य मी करी । विमुक्त राज्य रावणा । श्रीराम राम हे म्हणा ।। श्रीसमर्थ-श्रीगजाननमहाराज-श्रीहनुमंतरुपात आजही अखंड आहेत-चिरंजीव आहेत. आपणास असे हृदयपूर्वक वाटते की, हे कपिवरा-हे महाबली-हे प्राणदाता-हे प्राणनाथा-हे पुरातना-हे पावना-हे परतोषका-हे महारुद्रा-हे वज्रा-हे अंजनीसूत त्रिभूवना-हे हे ब्रह्मांडनायका-हे जग्ज्जीवना रामदासा । एकदा या हो या । या आतूरनेत्रा भेटी द्या हो । भेटी द्या हो । नेत्री प्रतिक्षा..हृदयात आशा । विवेके जाणिल्या या सर्व दिशा । जगदिशा तववरुनी ओवाळील्या पंचज्योति। कपिवरा कै मज भेटी देसी ।। आर्त झाले, की तिकडे प्रार्थ प्राप्त होते. नी आर्त-प्रार्थनेतच जीवब्रह्म त्या परब्रह्माशी एकरुप होऊन आयुष्य सार्थकी लागते. श्रीसूर्यनारायण हे सारे पाहतात नां. त्यांनी सारेच पाहिलेले आहे. त्यांना श्रीकपिवरांविषयी तर पूर्ण जाण आहे. याच रविमंडळास त्यांच्या सर्व लीला आवरणांसहीत श्रीकपिवरांनी गिळीले नां. तो दिन चैत्र शु.पौर्णिमा-पहाट-उषःकाल-ब्राह्ममुहूर्त. आपल्या घड्याळ्यानुसार ५.४५ या सुमुर्हूती. श्रीकपिवरांचे अनुसार ही 'मधुवेला' आहे. मधुसिंचन वेला आहे. श्रीसूर्यनारायणांधून या समयी अत्यंत गोड-मधुर असा रस-मधुपर्क प्रसवत असतो. जसे फूल उमलते. उमलल्याबरोबर पाकळी-पराग-सुगंध-मधु-मकरंद-स्नेह ओसंडून वाहतो. भृंगांस-फुलपाखरांस-मधमाशीस तो मधुगंध कळतो. जीव हे फुल फक्त पाहू शकतो. फुलाची स्वतःजवळ उपलब्धी असूनही त्यातील मधु जीवास लाभू शकत नाही.

का? की त्यास त्या मधुपर्कास कसे प्राप्त करुन घ्यावे याचे ज्ञान नसते. म्हणूनच जीव हे सारे पाहू शकतो पण तो हा रस सेवू शकत नाही. तसेच हे सूर्यफूल उमलते. म्हणिजे रात्रीतून दिवस आकारास येतो. उगवतो तसे. कळी अवस्था टाकून दिवसाचे उमलणे. नी ती मधूसिंचनवेला म्हणिजे आपली पहाट होय. ज्यास आपण साखरझोप असे म्हणतो. बघा ज्यावेळेस श्रीकपिवरमहाबलीश्रीहनुमंत श्रीसूर्यास धरण्यास उड्डाण करीते जाहले, त्यावेळी आपण सारे याच साखरझोपेत असतो. किती दूर..कीती लांब..कीती अंतर हे आपल्यातले नी त्यांच्यातले. उषः-म्हणिजे गोरसवेला. श्रीसूर्यभानू पाहताच, तो वासरमणि पाहताच गोधनास फुटलेला पान्हा. असा तो गोरस-अशी ती गोरसवेला. त्या मधुवेळेस श्रीश्रीकपिवरांनी, गिळिले सूर्यमंडळा..नी पुन्हा आपुल्याच श्रीमुखारविंदातून श्रीआदित्यांस त्यांनी पुनश्च जन्म दिला. आपण आत्ता जे श्रीसूर्यदर्शन करतो ते श्रीसूर्यदेव हे श्रीहनुमंतांचे मुखातून आलेले आहेत. हे येथे आपण ध्यानात ठेवावयास हवे. श्रीकपिवरांचे-त्यांच्या बल-बुद्धीचे नी या तर जन्मवेळच्या बल-बुद्धीचे वर्णन करण्यास कुठुन नी कुणाचे शब्दसहकार्य घ्यावे? वर्णन करणेच अवघड.

आज हाच आदर्श हवा आहे. एवढे अतुलनीय सामर्थ्य लाभूनही-असूनही स्वीकारले आहे ते श्रीरामरायांचे दास्यत्व. ही ताकद ही बुद्धी-ही जितेन्द्रीयं बुद्धीमतां वरिष्ठम्‌ता याचा-या स्थितीचा-या आवेषाचा-या अवस्थेचा अभ्यास सर्वत्रांनी केला पाहिजेच पाहिजे. सर्वत्र जाहला पाहिजेच पाहिजे. का? तर अभ्यासही अशांचा करावा की त्या अभ्यासातूनच विद्येचे आर्ती-प्रार्थी-सार्थी-सारथी, असे तयार होउ. तयारी करता करताच तयार होउन जाउ. श्रीकपिवरमहाबली हे सीताशुद्धी करुन आल्यानंतर जेव्हा श्रीरामरायांना भेटते झाले. तेव्हा त्याचे वर्णन आपल्या श्रीसुंदरकांड या श्रीरामायण रचनेत करीतांना श्रीसमर्थ सांगतात,

पुढे मारुती भव्य आनंदरुपी। नभोमंडळी भानु जैसा प्रतापी ।
महावीर तैसा दलामाजि आला । समस्तांसि देखोनि आनंद जाला।
सखा जीविचा तो असे दूरि देसी । सदा लागले चित्त हे त्याजपासी।

पुढे पाहता तो अकस्मात आला। तयासारिखे वाटले राघवाला ।
कपिने कसे पाहिले राघवासी । पुढे देखिले लोभियाने धनासी ।
तया बालके लक्षिले जंन्ननीला । तयासारिखे वाटले मारुतीला ।
नमस्कारीले त्या रघुनायकासी । उभा राहिला हात जोडोनि पासी।
म्हणे राम तो धन्य गा धन्य वीरा ।
कपी काय द्यावे तुझ्या उपकारा ।
अगा मारुती तुझिया उपकारे । जिवा शीण जाले बहू साल भारे।
सदा सर्वदा आमुची तुज चिंता । समस्तांसि तू येकला प्राणदाता।।

**श्रीकपिवरांचे श्रीरामरायांसन्निध नुसते उभे राहणे तरी कैसे..**

ठकारे पर्वता ऐसा । उभा राहिला वीर मांदार जैसा ।
मनाहूनि पुढे बळे वेग तैसा । बहू धोकले कुर्म वारह दंती ।
झडाचांचरे ते धरा सांवरिती । स्फुरद्रुप सर्वांग वाजे झडाडा ।
उडाले नभी वृक्ष वाते फडाडा ।।

काय शक्ती आहे ही पहा. अशा या शक्तीची प्रार्थना-अशा या शक्तीचे स्तवन-आवाहन-पूजन-वंदन-ग्रहण झाले पाहिजेच आपणाकडून. नी आपणांस हे सारे शक्यही आहे. केवळ अभ्यासाने शक्य आहे. कठोर अभ्यास-बहु परिश्रम. जितेन्द्रीयता नी रामदास्य या साऱ्या शक्तींचा नी आपला परिचयच श्रीसमर्थांना करवून द्यावयाचा आहे. आपण तयारीत कच्चे म्हणून ही मूळापासून सुरवात. मुळारंभ तो आरंभ. अहो मध्येच एखादी कथा वाचायला घेतिली तरी कळत नाही. मध्येच एखाद्या सिनेमा-नाटकास गेलो तरी कळत नाही. तर जन्म नी मृत्युच्या या मध्यात, काय कळेल? म्हणून शक्ती हवी. ही शक्ती बल-बुद्धी-विवेक-ज्ञान-वैराग्य-ऐश्वर्य-जाण-प्रेम हे घेऊनच 'उषः' काली प्रवाहित होते, नी आपल्यावर ते आवरण चढते. यास वातावरण म्हणूया. कवच म्हणूया. सूर्य उगवला की, आपण वेगळ्याच चिंतेत असल्याकारणाने याचे ज्ञान आपणांस होत नाही. ग्रहणात हे आवरण कुठेच राहिलेले नसते. नी आवरणाशिवाय जगण्याची-जगविण्याची- 'स्वतःच' स्वतःस जगविण्याची शक्ती नसल्याकारणाने-अभ्यास नसल्याकारणाने अशा ग्रहणकाली शांत असावे.

सर्व झाकपाक असावी. सत्संग-नामस्मरण, अशा शांत गोष्टींजवळ तेव्हा असावे. श्रीतुलसीपत्र सर्वांवर ठेविलेले असावे. ग्रहण सुटले की स्नाने-दाने करावीत. म्हणूनच हा प्रघात आपणांस वाडवडीलांनी घालून दिला आहे. कायेवर आवरण आले की पाणी लावून घ्यावे. म्हणिजेच ग्रहण सुटले की स्नान करावे, हा प्रघातही त्यातलाच. खूप अर्थ आहे या साऱ्यात. अभ्यासाने हे सारे जीवास प्राप्त करुन घेता येते. आपण कधीच या ग्रंथांचे अर्थ आपल्या मोक्ष-मुक्तीहितार्थ वेचित नाही. पाणी-नीर-आप-तोय-वारी, अशा कीतीतरी नामाभिधानांचे हे आपतत्व. खूप अभ्यास आहे यात. बघा-श्रीभास्कर पाटील यांच्या अकोली ग्रामातील विहीरीसाठी श्रीमहाराजांनी याच श्रीआपोनारायणांची प्रार्थना कशी केली बघा-श्रीत्या गर्दाडासी-त्या शुष्कासी कसे संवादिले बघा-देवा ही अकोली पाण्यावाचून त्रस्त जाहली। वोलही ना राहिली कोठेही देवा विहिरीतून । मानवी यत्न अवघे हरिले । म्हणून तुजला प्रार्थिले । पाव आता जगन्माऊले । पाणी दे या विहिरीला। तुझी करणी अघटीत । जे न घडे ते घडविसी सत्य । मांजरे जळत्या आव्यात.। पांडुरंगा तू रक्षिली ।। एखाद्या कोरड्याठक्क-शुष्क गोष्टीसी कसे संवादावे? याचा हा अभ्यास आहे. हीच ती मांजरे. श्रीगोराकुंभारांच्या भट्टीत तर ती राहिलीच. परंतु या प्रचंड भट्टीतही, ही सप्तघट रचना कशी घट्ट राहीली इकडे श्रीमहाराज आपले लक्ष वळवित आहेत. ती ही मांजरे. म्हणजेच सात आवरणे होत. सप्तवासरे. सर्व संख्या १ ते ९ यामध्ये विलीन होतात. मात्र ० विलिन करता येणे हा अभ्यास आहे. इथेच श्रीमाऊली म्हणतात, तर्क पांगुळतो. पुढे बुद्धी न चालणे म्हणजेच तर्क पांगुळणे होय. श्रीवेदांनीही येथेच हात टेकले. श्रीसरस्वतींचीही वाचा येथेच मौनावली. नी याच पुढील मार्गास मग स्वसंवेद्य असे म्हंटले गेले. स्वतःचे स्वतःच जाणावयाचे असे. **शब्दानी सांगणे संपले. संख्येने सांगणे संपले. त्या पुढचे जाणायला 'भाव' हवा. पुढे सारे भावबळे आकळे..येऱ्हवी ना कळे..असा सारा भाग आहे.** संख्या-अक्षरे ही बुद्धीच्याकक्षेत आहेत. भाव हा जाणिवेच्या कक्षेत आहे. ज्ञान हे प्रेमाच्या कक्षेत आहे. नी या सर्वांत विवेक हा प्राणदातामहाबली होय. नी तोच

श्रीहनुमतांच्या अखत्यारीत आहे. त्यांच्या हातात आहे. नी हे सर्व प्रवाह जाणणे म्हणजे 'भान'-भानुबिंब. भाव नी भावाचे बळ दोन्हीही मिळून तयार नी तृप्त झालेले असे ते जीवाचे भानुबिंब. आवरणे कशी असतात ते आपण थोडक्यात बघू या. ही सारी स्वतंत्र अभ्यासरचना आहे. परंतु श्रीसमर्थांस जीवाचे आरंभीचे पान, आरंभीचे अक्षर उलगडतांनाच, कीती नी केवढे ज्ञान आपणास करवून द्यावयाचे आहे. सांगावयाचे आहे बघा. 'ग्रं' मधून केवढा हा मधूच श्रीसमर्थ आपणांस देत आहेत. आपणांस आता एक पोळेच तयार करावयास घ्यावयाला लागेल. हो नक्कीच. कारण हा सारा मधु साठवावयाला हवा नां. श्रीसमर्थांच्या या शब्दमाधुर्याचा हा थेंब-पूर्णगच्च-घनदाट-घनगर्द-घनघोर-ओथंबलेला-परिपूर्ण-परिपक्व-ओतप्रोत मधुमास. हे-हे मधाचे थेंब. हे थेंब साठविण्यासाठी पोळे. हे मध साठविणारे पोळे. पौळी. काय सुंदर रचना आहे ही त्या 'चंद्रमौळीची'. ही सारी मधुसंचय रचना आपल्या कंठाशी असंते. आपल्या कंठात ही पौळी असतात. हनुवटीखालील कंठापर्यंतचा भाग हा परा-पश्यन्ति-मध्यमा-वैखरी या मधुसंचयाने ओथंबलेला असतो. परेतील मधु पश्यन्तित गोळाकरुन मध्यमेने साठवून-वैखरीने लुटणे म्हणिजे नामस्मरण होय. 'नाम स्मरले'. 'नाम आठवले'. स्मरणे-आठवणे, म्हणिजे आता आपले हरविणे संपले. केवढा हा श्रीसमर्थांचा अभ्यास. पण आपण हा श्रीसमर्थांचा अभ्यास, असे कसे म्हणावयाचे? हे लहान तोंडी मोठा घास घेणे झाले. नी तोंडच नाही तर घास कुठला हो? पण काय करणार, आपल्यावर जेवढी श्रीशारदामातांची, फटीतून येणाऱ्या बारीकशा-केसाएवढ्या किरणांची कृपा, त्या शब्दांनी एवढेच सांगता येणार..असेच म्हणता येणार..समर्था तुझे काय उत्तीर्ण व्हावे. नी पुन्हा हेही शब्द श्रीसमर्थांचेच बरे. स्वतःला काही उपमाच सुचत नाही. एवढे बुद्धीमांद्य गेले नां तर बरे. याच बुद्धीमांद्यातून जीवास काढून उच्च ज्ञानावरणात जीवाचा मधुबिंदू वाढविण्यापाठीमागे काही योजना आहेत. निश्चित अशा योजना आहेत श्रींच्या. कारण निमित्त-आदेश-स्मरले-आठवले की सुफळसंपूर्णता आलीच नां. त्या स्मरणीकरिताच हा पृथ्वीचा आवा लावला गेला आहे. श्रीपांडुरंग स्वयमेव ते श्रीकुंभाररुप

घेते जाहले आहेत. श्रीमहादेवांचे आरे तयारचि आहे. घट म्हणिजे आदिशक्ती भवानी. 'ती काळीमाती'–मती–'मायभूमी'. जीव म्हणिजे वन्ही, फुंकरीनी चेतणारा. नी चैतन्याने प्राण जागविणारे श्रीमहाबलीप्राणदाताश्रीहनुमंत. कशाकरीता जागवितात ते या प्राणांस, तर, श्रीरामदास्याकरीता. हे श्रीरामदास्य कसे करावे हे सांगणारे श्रीमरुतमहारुद्र–जीवास ते संवादीणारे श्रीसमर्थ. विसर पडू नये म्हणून, पुन्हा विस्तीर्ण असे, अतिजीर्ण असे ते सूत्र कसे प्रगट करावे, याकरीता श्रीश्रीगजाननमहाराज. जीवा, अरे मानवा,




या सप्तवार रचनेत आपले शुक्लपक्ष-कृष्णपक्ष विभागले असून तसेच शुक्लपक्षात रवि-शुक्रांचे प्राबल्य असते व बुध-शनिची छाया यावर असते. कृष्णपक्षात सोम-मंगळ या वारांचे प्राबल्य असते व बुध-शनिची छाया यावर असते. यासर्वामध्ये यत्न विभागातून गुरुबल प्राप्त होते.

गुरु - यत्न तो देव जाणावा

तुला काय हवे आणिक सौभाग्याला. श्रीसांगतात, सूत्र जन्मत नाही तर ते प्रगट करावे लागते. ते प्रगट करण्याकरीता अभ्यास-तप-शुद्धता लागते. त्या शुद्धतेचीच ही आवरणे होत. बरोबर माध्यान्ही श्रीगजाननमहाराज प्रगटले. का?कारण आपणही 'मध्यान्ही' च जन्मलो आहोत नां. जन्म नी मृत्यू यांच्या मध्यावर. कशी आहेत ही आवरणे. सप्तावरणे-अशा प्रकारची चित्रात दर्शविल्याप्रमाणे ही आवरणे असतात. ही आवरणे-कवच-आच्छादने त्या त्या वारी या पृथेवर असतात. या आवरणांचे अर्थ समजून जीवाने आपल्या कर्तृत्वाची तलवार चालवावी नी बंड-पाखांड मोडून जितेन्द्रीयं व्हावे. हा सार अभिनिवेश स्व बांधणीसाठीच तर आहे. परंतु विश्व बांधणीचेही हेच सुत्र आहे. जीव काय करु शकतो. नी तो एकटा नाही, हे उमगण्याकरीताच केवळ त्याकरीताच हे सूत्र आहे. हीच ती सांकेतिकता त्याविहीरीशी बोलताना, श्रीगजाननमहाराजांनी आपणांस दाखविलेली आहे. बघा-मांजरे जळत्या आव्यात । पांडुरंगा तू रक्षिली ।। घट ज्याने घडविला तोच जाणेल तो कसा रक्षावा ते. तोच सांगेल हा काय-कशाचा-कशापासून बनविलेला घट आहे ते. तोच संवादेल हे जीवासी. नी त्यालाच तळमळ त्या 'घटमठाची'. आपले एवढे भाग्य की, ती तळमळ आपल्यासाठी आहे. आपण त्यांचे लेकरु आहोत. श्रीरामदास गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायी ।। असे हे मार्जार-मार्जित. मार्जित म्हणजे वेलची-केशर सुगंधयुक्त श्रीखंड. म्हणिजेच गोडी. एवढ्या भयानक भवाब्धितही श्रीपांडुरंगा तूच रक्षिलीस ही अमुची 'ज्ञानगोडी'. नाहीतर आम्ही अज्ञाने असती तियेस भक्षिली. नाही तर आमुचीच झाली असती भक्ष्यस्थाने काळाचे मुखी..तू आवरली रे आवरलीस अमुची यमपुरी..केले दूरी जीवास भवरोगामधूनी.

## ..सप्तम् संकष्ट - संभव..

आता सातवे 'संभव'. यास आपल्या अनंतजन्मींच्या विस्मरणाने नी तद्नुषंगे केलेल्या कर्मातून आलेले ताप असे म्हणतात. भव या शब्दाचा अर्थ झालेला-होणारा-होउन गेलेला. तसेच दुसरा जन्म नी श्रीशंकर असेही अर्थ याचे आहेत. नक्की आत्ताचा हा जन्म कितवा? याची दखल

जीवास नाही. ती तशी नसावीही. परंतु बहुत जन्मांचे सेवटी । नरदेहाची प्राप्ती । ही खूणगाठी बांधी जीवा.., ते न उकलून-ते न समजून-ते न जाणून पुन्हा त्याच गर्तेत जीव ओढावला की, ज्या कर्मांशी त्याची गाठी-त्याची ग्रंथी-तो'ग्रं' बद्ध होतो, तेथूनच हे कष्ट जीवास पडतात. नी बद्धपणाच्या पाशात सुटकेची याचना करण्याचेच तो विसरतो. कारण हे बद्धपणच-ही मायाच जीवास प्रिय वाटावयाला लागते. हवेहवेसे वाटणे, हीच माया. नी याच मायेकरुन जीवास ८४ लक्ष प्रकारीचे जन्म घ्यावे लागतात. आपण असे म्हणू की, कोणी पाहिले हे ८४ लक्ष जन्म? परंतु असे नका म्हणू, असे श्रीसमर्थच जीवास सांगत आहेत. कारण तेच सांगत आहेत की, बहुत जन्मांचे सेवटी नरदेहाची प्राप्ती. श्रीमाऊलीही हेच सांगत आहेत की..बहुत सुकृताची जोडी..म्हणूनी विठ्ठले आवडी. आपणास डोळ्यांच्या मर्यादितील-कानांच्या मर्यादितील-बुद्धीच्या मर्यादितील एवढेही पुरेसे दिसत नाही. नी समजतही नाही, तर या आपल्या बुद्धीपलीकडच्या गोष्टी आपण नाकारणे इष्ट नाही. उलट त्या तशा अत्यंत जाणिवेनी आपण समजून घेतिल्या पाहिजेत. श्रीश्रीज्ञानेश्वर महाराजांनी श्रीमहिषामुखी जे वेद वदविले, त्या महिषास त्यांनी त्याच्या त्या अज्ञात जन्माचे स्मरण दिधले, ज्या जन्मात ते वेदपाठी-घनपाठी होते. श्रीश्रीमाऊलींनी त्याच्या स्मरणाचा धागा उंचावून त्या स्मरणापाशी नेला. त्या 'ज्ञात' स्थानी जोडला. नी त्यांस सर्व ज्ञान झाले. जीवाला जी बुद्धी प्राप्त झालेली असते त्या बुद्धीअन्वये त्याने केल्या कर्मांची परतफेड करावयाची असते. **परंतु कोणत्या कर्माचे हे फळ आहे, हे कळण्याकरीता जीवास जो अभ्यास करावा लागतो, त्यास 'यत्न' असे श्रीसंबोधितात. नी हे असे यत्न फक्त मानवी जन्मातच जीव करु शकतो. म्हणून नरदेह प्राप्ती ही फार मोठी उपलब्धी आहे.** फार मोठी उपलब्धि असते-ठरते-होते-लाभते, याचा विचार गांभीर्याने जीवाने करावयास हवाच हवा. एखादे फुल कुंडीत कसे उमलते. देठापुढून कसे फुटते, याचाही आपला अभ्यास नाही. तर मस्तकातील हे स्मरण हे सहस्त्रदलकमल कसे विकास पावते याचा कधी होणार?पुढे हे महिषप्रभृती श्रीश्रीमाऊलींबरोबर पैठणहून पुणे-नाशिक महामार्गावरील आळेफाटा या

गावापर्यंत बरोबर आले. पुणे नाशिक महामार्ग ही आत्ताची ओळख आहे. त्यावेळी तिथे केवळ पाऊलवाट होती. अत्यंत झाडाझुडपांनी वेढलेली अशी. नी म्हणूनच त्या गर्द वनराईत श्रीश्रीमाऊलींस प्रार्थून त्या श्रीमहिषप्रभृतींनी श्रीश्रीमाऊलींसाक्ष समाधी घेतिली. तोपर्यंत ते श्रींबरोबर संवादीत असत. ही भावंडे नी हे श्रीमहिषप्रभृती यांचे एकत्र संवाद होत. दुर्दैवाने हे संवाद ग्रंथित करणारे, 'ग्रं'थित करणारे-ग्रंथीत ठेविणारे, त्यावेळी कुणी श्रीश्रीमाऊलीं जवळ नव्हते हे आपले दुर्दैव आहे. नी श्रीमाऊली व भावंडे या सर्व बाबींबाबत उदास असत. म्हणिजे आताशासारखे, प्रसिद्धी-अनुभव लिहीणे-छायाचित्रे इत्यादी बाबतीत. पण त्यामुळे आपण सारे या संवादास-यातील ज्ञानास मुकलो नां. परंतु श्रीश्रीमाउलींची नी श्रीमहिषांची कृपा की त्यांच्या संवादातील लघुभाग जीवाच्या भाग्याने त्यास येथे वाचावयास लाभत आहे.

तृ त्रे व्री को चि ना वृः ब्रृत्रो चक् येतद् विहीतहाः-

तृ-तृतियपदे भावंडे. त्रे-मुक्ता. व्री-ब्रह्मांड. को-कोदंड. चि-महादेव. ना-शेष. वृः-आवरण. ब्रृत्रो-प्रत्येक. चक्-मंडीत-मांडव. येतद्-माझ्या. विहीतहाः-असू द्या-काळजीवहा यदर्थी.

मुक्तीसहीत तृतियपदांनी ब्रह्मांडाचे धनु धरोन श्रीमहादेवस्थानी शेषावरणानी झाकीलेल्या पृथेवरील प्रत्येकाची मंडपीवेला जाईपर्यंत माझ्याप्रमाणे काळजी वहा.

**ज्या महिषांसी श्रीभावंडांचा संवाद होत असे, त्यातील अंश येथे वर चौकटीत दिला आहे. ही सर्वश्रीश्रीमाउलीकृपा होय.** परंतु आता तरी जे प्राप्त आहे, ते घेण्यास तरी आपण मुकू नये हिच सर्व श्रीसंतांची तळमळ. 'ग्रंथित' म्हणिजे स्मरणात. 'ग्रं' ज्या स्मरणाशी जोडलां की उमज पडेल, तोच 'ग्रं' श्री समर्थांनी प्रथमोच्चार-संवादातील प्रथमाक्षर म्हणून घेतिला आहे. किती काळजी-किती प्रेम-किती दया-त्या श्रीअंत:करणाची. किती किती आरती करावी श्रीसमर्थांची. किती किती आर्त व्हावे आपण श्रीसमर्थांच्या पाऊलांसाठी. किती किती व्याकुळ व्हावे आपण श्रीसमर्थांच्या दर्शनाकरीता..किती किती. आपण हा धागा

सोडायाचा नाही. कर्म-भोग-प्रारब्ध जर यत्नाने बदलता येतात-पाठी फिरविता येतात तर हतवीर्य व्हावयाचे का? कशासाठी? समर्थांचिया सेवका वक्र पाहे..असा सर्व भूमंडळी कोण आहे..? श्री तर मुख्याधिश आहेत. श्रींचा अधिकार मोठा. श्रीसमर्थांच्या गलोल चालविण्याबाबतही याच प्रकारीची एकं लिला आहे.

..श्रीसमर्थांची अगम्य लिला..

श्री आपल्या बरोबर एक गलोल बाळगित. काही ब्रह्मवृंद एक डाव श्रींस भेटले. नी ते या गलोलीस पाहून श्रींस उपहासाने वदले, की नुसती खांद्यावरच असते ही, की काही प्रयोगही करता इचा. तेव्हा श्री वदले करीतो नां. बह्मवृंद बोलिले, दावा इयेचे प्रत्यंतर. श्रींनी उंच उडणारी घार दाखविली. नी तिस आपल्या गलोलिचे निशाण करुन टिपलेही. गलोलिचे माराने घार टपकन पडली नी तेथेच गतप्राण जाहली. ब्रह्मवृंदांस तेच हवे होते. तत्काळ ते वदले, आता आपुले म्हणे ब्राह्मण्य गेले. तापस्य गेले. भ्रष्टवलेत आपण स्वतःस. श्रीस्वामीन् वदले, ऐसे न व्हावे. आपण प्रत्यंतर दावा सांगितले, केवळ म्हणोनिया हे घडीले. वृंद वदले, जीवहत्या-ब्रह्महत्या हे तो घडिलेचि नां. श्रीस्वामिन् वदले, क्षमा..उद्धरा-शुद्ध करा. वृंद वदले हे तो न घडे, ब्रह्महत्या पातक बहु जाहले. श्रीस्वामीन् वदले, आपण सर्वज्ञ. आपण आम्हास पावन करावे. पातके मुक्त करावित. श्रीवृंदानी तेथ श्रीस्वामीन्करवी पंचआहुती करविल्या. प्रथम दाढी-जटा-मोचन करविले. द्वितीय गोमय स्नान करविले. तिजवे भस्म स्नाने दवडीले. चतुर्थ जानवे मंत्रोन परतविली. नी पंचमशुद्धी स्कंधशुद्धी करविली. नी वदले, झालात जी आपण शुद्ध. श्रीवदले ज्याप्रत हे प्रायश्चित दिधले. ही शुद्धी जाहली. ही अमुची काया शुध्दविली. आमुची ब्राह्मण्ये रक्षियेली. अमुची तपस्या उतरविली. ती घार तर तैशिच गतप्राण राहीयेली. आमुच्या प्रायश्चित्ते करोनिया ती उठावयास हवी. ती पूर्ववत व्हावयास हवी. तेथ श्रीवृंद हासिन्नले. वदले, हे तो संभव नाही. शास्त्री ऐसे नाही. मेले, जित कदापि न होय. आपण शुद्ध आहासा, हा अमुचा भरवसा. श्रीवदले हे होणे नाही. घार उठीवा नाहीतर अमुचे जटासंभार परतवोनी द्या. श्रीवृंद वदले हे

कदापि होणे नाही. ऐसे कदापि कधी घडीले नाही. आपण वृथा आग्रहासी न करावे. श्रीवदले हे होणे नाही..हे ऐसे नाही. आमुचे रामराज्य ऐसे नाही. रामराज्ये जन्मे न कोणि मरे न कोणि. ब्रह्मवृंदांनी अट्टाहास केला-उपहास केला स्वामीन् चा. दावा तुमचे रामराज्य कैसे ते. वृंद हास्यध्वनिकल्लोळत वदले. श्रीमन् उठीले. घारीपासी आले, वदले, बाईये उठावे गो. आपुले काम जाहले. मृत घार-गतप्राण घार श्रीस्वामीन् शब्दे चेतली..उडाली. देशी दिगंती गेली. ब्रह्मवृंद थक्कीत-चक्कीत होत्साते राहिले. श्रींचे सन्मुखी बद्ध करे उभे ठाकीले. श्रीस्वामिन् जटा-दाढीसंभारेसहीत देखियेले. क्षमा..श्रीस्वामिन् क्षमा..ऐसे वदले. श्रीस्वामिन् कथिते जाहले, ऐसे कदापि न करावे. वेदशास्त्री सर्व जाणताती. **जाणत्यासी तर्क न करावा. जाणत्यापासी संशयो नसावा. तरीच जाणते म्हणवा.** वेद वेदांगासी हीनपण. आपणा कर्मासी कारण. विधी-विधाने दोष मात्र, ब्रह्महत्येसमान. या पातकासी नाही थारा..पृथ्वीवरी फेडावया. सांप्रत आपण उल्लेखिले रामराया, म्हणोनि तुम्हा दोष न लगे. ब्रह्मवृंद श्रीचरणे वंदीताहे तो स्वामिन् गुप्त जाहले. ही वार्ता सर्वश्रुत जाहली. श्रीस्वामिन् कीर्ती बळावली. लांब लांबोनी लोक येती. दुःख चरणी घालावया. श्रीमन् सारे जन जवळ करीती. समस्तांचे दुःख हळू करीती. कर्मगती पुन्हा न येवो. पुन्हा न लागो ती संगती म्हणूनी रामपुडी देतसा. श्रीमन्स्वामी बहुत प्रेमळ. डोळीया बाष्प दाटे..जन दुःखे हेलावे..ऐसे दुजे मन ना कोणाचे. ऐसिया कारणे व्हावे जाणते. समस्तांस हेचि विनविणे..चरणी लागोनिया हिच विदीता..वेणी नेत्र ओलावताहे. श्रीस्वामिनस् स्मरणे बहु सुंदरसे. आपणा लभ्य जाणत्या भावे. कैसी अगम्य लिला श्रींची.

हे नाकारण्याचे धाडस कोणास? ते स्विकारण्याएवढी बुद्धी नाही आपणांपास म्हणून तर्काच्याच वाटेस का जा? विश्वासाच्या वाटे का न या? पण हे जाणूनही संशयाच्या वाटे जाण्यानेच तर हे संभव कष्ट जीवास पडतात. श्रीगजाननविजय ग्रंथात देखील अशी एक श्रीगजाननमहाराजांची लिला आहे बघा-एकेदिनी श्रीमहाराज, श्रीकृष्णाजीचे मळ्यासी येऊनी बैसीले. ते समयी तेथ काही दूरस्थ गोसावी आले. नी आम्हास भोजन

घाला शिरापुरीचे, आपण कोणासही देव मानिता. नी मुख्य परमात्म्यास विसरता ऐसे बहुत ती गोसावी मंडळी पाटलांस बोलती जाली. पाटील वदले आज जे आहे ते देतो, आपण बैसावे. गोसावियांनी आपआपली कडासने लावियेली. नी त्यातील जो मुख्य होता, ब्रह्मगिरी नामे, तो जमल्या मंडळींस श्रीगीतावचने कथावयास लागियेला. श्रीआत्म्नास अग्नी-पाणी-वारा-काहीच करु न शके. श्रीआत्मन्रुपाचे श्रेष्ठत्व कैसे, ऐसे त्याचे वदणे गर्व-दर्पोक्ती उद्गारे चालिले होते. इकडे श्री बैसल्या पलंगी, चिलीम हाती घेतिली होती. तियेची ठिणगी पलंगी पडली नी पलंग चौफेर पेटता जाहला. जन घाबरले. श्रींस विनविते जाहले, महाराज आपणां भय ना अग्नीचे. परी अमुच्यासाठी आपण या जळत्या पलंगावरुनी उठावे. आम्हास भय दाटे मनीमानसी. श्रीवदले भिण्याचे कारण काई. श्रीभास्कर पाटलांस श्री वदले, जा भास्करा, त्या गोसावियास घेऊनी यावे. श्रीपाटीलांनी त्या ब्रह्मगिरीगोसावियाचा सव्यकर धरीयेला नी श्री बैसिले तेथ ओढीत आणिला. तो गोसावी पुरता घाबरलेला. श्रीवदले, अहो महाराज ब्रह्मगिरी..या बैसा पलंगावरी..तुम्हा आहे अवगत सारी..गीता शास्त्रे साकल्ये..तये परीक्षेची वेळा..आणिली हरीने आपुल्या पुढता..ब्रह्मा न जाळी अनळ..ही खरी करुनी दावा बोली.., ब्रह्मगिरी बोलिला, मला न न्या पलंगापासी. मी पोटभऱ्या कथेकरी. शिरापुरीची मला गोडी. श्रीश्रींच्या अधिकारासी मी नाही जाणितले. बहु पायी लागला. निरभिमान जाहला. तेव्हा श्रीवाणी जाहली, हीनत्व वेदविद्येला आणू नका रे निरर्थक. ही न विद्या पोटाची. मोक्षदात्री आहे साची. बा डोईस बांधिल्या शालीची किंमत काही राखावी. ब्रह्मगिरीयाचा सौभाग्यकाळ फावला. श्रीमुखे एकीले गीतासारा. पूर्णबोध घेउनिया श्रीचरण वंदुनिया निघोनिया गेला. श्रीहसतमुखे शांत. ब्रह्मा न जाळी अनळ..गीता साच केली. श्रींस पेटत्या पलंगी बैसिलेले पाहून, किती जनमुखे थक्कीत जाहली. किती जन नेत्र पाणावली. किती जन वक्षे भांबावली. ते दृश्य देखोनिया. श्री जे वदले, की ही विद्या मोक्षाची. पोटासाठी बुद्धी दिधलिची आहे. मोक्षासाठी मती दिधलिची आहे. शाल बांधिली ना डोई. लाज राख. ही शाल म्हणिजे 'केस'. जटा या अर्थी. श्रींना अभिप्रेत येथे हा अर्थ आहे.

जसे शालू म्हणिजे अखंडवस्त्र-महावस्त्र. तसे हे महावस्त्र. गोसावियांचे महावस्त्र म्हणिजे जटा होत. हे केस, हा जटासंभार हे आतील 'ग्रं'थीस एक आवरण स्वरुप असते. अग्र म्हणजे टोक. हे केसांस, नखांस फुटतांना आपण पाहतो. केशाग्र-नखाग्र-नासाग्र-जिव्हाग्र-हृदयाग्र-कुशाग्र-तृणाग्र-नेत्राग्र-कर्णाग्र-कराग्र-चरणाग्र-स्कंधाग्र-ग्रीवाग्र-पुच्छाग्र-कुंडलाग्र-भावाग्र-दिव्याग्र-भेदाग्र-अभेदाग्र-वेधाग्र-अंगाग्र-प्रेमाग्र-ज्ञानाग्र-विवेकाग्र-उत्तमाग्र-तनाग्र-तिक्ष्णाग्र-व्याघ्राग्र-बाणाग्र-गर्भाग्र-धनुष्याग्र-केवलाग्र-भूताग्र-भक्ताग्र-धूमाग्र-श्रद्धाग्र-दासाग्र-बुध्याग्र-ग्रहाग्र-निद्राग्र-ध्येयाग्र-गणेशाग्र-शारदाग्र-अक्षराग्र-चेतनाग्र-बिंद्वाग्र-निर्मळाग्र-आनंदाग्र-भागाग्र-अधिकाग्र-विषाग्र-उच्चाग्र-समाग्र-भरताग्र-सौमित्राग्र-अरीदमनाग्र-सर्वाग्र-नवाग्र-केवलाग्र-भूमाग्र-भ्रूमध्याग्र-कपोलाग्र-शिवाग्र-पिंडाग्र-उमाग्र-रमाग्र-पर्वताग्र-सागराग्र-सरीताग्र-वटाग्र-अश्वथाग्र-वैनतेयाग्र-समाग्र-समग्र-उग्र-तपाग्र-सौभाग्याग्र-शुभाग्र-संपूर्णाग्र- सुफलाग्र-बीजाग्र-मुक्ताग्र-मोक्षाग्र- गजाग्र-नारदाग्र-शिखाग्र-जटाग्र- हन्वाग्र-विशेषाग्र-आशिषाग्र- मरणाग्र-जीवाग्र-लोकाग्र-काळाग्र- रुद्राग्र-व्यग्र-ध्रुवाग्र-चक्राग्र- शंखाग्र-रथाग्र-अश्वाग्र-स्थाग्र- तुंदुलाग्र-कोमलाग्र-दिव्याग्र-मूर्धाग्र- अग्र-व्यग्र अशी साधारण १०८ प्रकारीची अग्रे,



ग्र च्या शिरावर बिंदुरूप जीवाचे ओजवणे

म्हणिजे सूत्ररचना आहे. सूत म्हणिजेच आरंभ-टोक-धागा-स्मरण-स्मरणी-उद्भव-बीज-पात्र-ग्रह-ग्राह्य-ध्येय-विषय-पूर्ति-शांती-समाधान-जाणिव-चेतना-वन्ही यास काहीही म्हणा. हे आहेत. ही सारी शक्ती या केशांमधूनच प्रवाहीत होत असते. या सर्व अग्रांविषयी सांगावयाचे म्हणजे एकातून एक किती होईल. नी ही ग्रं ची उकल केवढी होईल. होत जाईल की..वाढता वाढता वाढे भेदीले शून्यमंडला. नी श्रीसमर्थांचे कृपाकटाक्षे

करुन, तयांचे बलेकरुन आपण नक्कीच ते शून्यमंडल भेदू शकू. पण ग्रं कसा आहे, ही उकल जीवास व्हावी या हेतूनेच तर श्रीसमर्थ आपणांस हे सारे सांगत आहेत नां. हा ग्र आहे. अग्रातील ग्र. श्रीसमर्थांनी त्यावर बिंदुरुप-स्मरणरुप-कोमलरुप-सानुलासा जीव ठेविला आहे. या 'ग्र' च्या तिवईवर 'ग्रं' ग्र ग्रा ही तिवई, त्यावर जीव. जीवाचा घट ठेविला आहे. नी त्याचिच ओळख श्रीसमर्थ करुन देत आहेत. जी आपणांस श्रीसमर्थ चरणी हेत ठेऊन श्रवण-वाचन-मनन-चिंतन-ज्ञान यामार्गे करवून घ्यावयाची आहे. श्रीसमर्थांसच खरेतर यामधून आपण जाणून घ्यावयाचे आहे. श्रीसमर्थच ती कृपा करोत, नी जीवबिंदुस ते त्याचे सिंधूरुप उमगो. श्रीचरणांबुजी दण्डवत प्रार्थूया त्या 'उमस' साठी. या अग्राविषयी आपण पुढे समजून घेउ. पण या सर्व स्मरणाशी निगडीत गोष्टी आहेत एवढे ध्यानी धरावे. या स्मरणासाठीच ही १०८ अग्रे सांगितली. हे काहीच न जाणता केलेले कर्म या संभव विभागात येते. याचा विचार गांभीर्याने करावयास हवा.

**..अष्टम संकष्ट - संनष्ट..**

'सं'नष्ट-आठवे कष्ट. जीवास ताप त्रिविध आहेत. त्यामुळेच कष्ट केवढेतरी आहेत. कष्ट म्हणिजे बुद्धीने स्पष्ट करता येत नाहीत-उच्चारीता येत नाहीत अशागोष्टी. अध्यात्मिक-अधिभौतिक-अधिदैविक अशा त्रिविध तापांस, त्यातील जाणकार श्रीवैद्य हे औषधी देउ शकतात. परंतु या 'संकष्टां' ना मात्र प्रार्थना-पूजा-सत्संग-कृपा-सेवा हेचि औषध ठरते. हेच ते अनंत रोगावर एक असे रामबाण औषध. जयासी ना उपाधि..बरे करी लवकरी..घेताचि जीवभाव ऐक्यकरोनी. नी सर्वत्र अनुभवही तोच आहे की, सर्व प्रयत्न थकतात तेव्हा, श्रीवैद्यही देवाकडेच हात करीतात. कारण, निसर्गाच्या बाहेरी वैद्यशास्त्र काही न करी। तेथे एक उपयोगी पडे कृपा देव संतांची। त्रिवार सत्य. या कृपेस जाणिले नाही की कष्ट. नी मग संतुष्टी दूरच. असे न व्हावे म्हणून, जीवाने जाणून घेतिले पाहिजे की, या कष्टातून निवृत्तीसाठी त्या निवृत्तावरच स्वतःस सोपवून द्यावे. नी शांत राहण्याचा अभ्यास करावा. शांत राहणे हा अभ्यास सर्वप्रथम जिव्हेकडून

सुरु करावा लागतो. कारण तीजजवळूनच त्या पथावरुनच शांतीवहन आहे. कारण सर्वप्रथम ब्रह्माचा नी तोही पूर्णब्रह्माचा स्पर्श याचस्थानी जीवास होतो. पण त्यातूनही जीव शांतिरस सेवनाऐवजी स्वाद-रुचि-वैविध्य यांकडेच वळलेला असतो. म्हणून येथेही श्रीसमर्थांनी तो शांतिरस-तो रामरस प्राप्त व्हावा म्हणून सांगितले, पुढे वैखरी राम आधी वदावा।। कारण सारी सृष्टी, अनुक्रमे हे सारे अनंतकोटीब्रह्मांड श्रीरामानुगमनी आहेत. म्हणून श्रीराम..या उच्चारासरशी ते सारे जागते-जागवते-नी लाभते. नामस्मरणास आपण फारच दुय्यम समजतो किंवा काही अध्यात्म क्षेत्रातीलच लोक यास जाणितात. बाकी याकडे वळतच नाहीत. मग केव्हा तरी साडेसाती-राहूग्रास-प्रथमग्रासे मक्षिकापाते-केतूग्रास-कठीणकाळ आला, की मग एकदम लक्षावारी जप सांगतात. नी तो करावयालाही बसतात. नी मग असा जप करतांना तो जपी त्या जपात असतोच कुठे? तो नसतोच तेथे. तो असतो संकटात. त्याची नी नामाची गाठ पडेल तर नां..'ग्रंथी' उकलेल. नी समस्येवरील उपाय त्याच्या शीर्षविकाशात बीजेच्याकोटीप्रमाणे उगवेल. म्हणजे प्रतिपद्‌चंद्रलेखेववर्धिष्णुः ते पौर्णिमेपर्यंत. ही ज्ञानावस्था फार कठीण आहे मिळवावयाला. नाही तर संकटकाळी ही प्रतिपदा वेगळ्या अर्थांनी अभ्यासावी लागते. म्हणून स्मरणीचे सुत्र कुठून कुठे चालते-जाते-नेते-पोहोचते-पोहोचविते हे आपण जाणिले पाहिजे. याचेच जिव्हेकडून नियंत्रण झाले की या कर्माची शांतता होते. आपणास साधारण ३२ दात असतात. साधारण एवढ्याकरीता म्हंटले की एकूण ३२ सच. परंतु दातावर दात असले तर तसे एकूण '३६' दात संभवतात. वरील दात हा गुणांक-'३६' हा गुणांक आहे. हा गुणांचे अधिक्य करीतो. ८४ दातांपर्यंत मोठा जबडा पूर्वी होता. खूप पूर्वी. आता मगर या प्राण्यासच अधिकांश दात असल्याचे आपण चित्रात-चित्रपटात पाहतो. समक्ष बघण्याचे धाडस नाही. आपणास येथे फक्त सुळ्यांची शक्ती बघावयाची आहे. बाकी भाग नंतर. या सुळयांनी आपण फारसे पदार्थ सेवन करीत नाही. बहुतांशी नाहीच. पुढच्या दातांनी फळे-लाडू- इत्यादी. बाकी सारा भाग जवळजवळ दाढाच उचलतात. तसा सुळ्यांचा उपयोग ग्रंथी-गाठी उकलावयास-सोडवायासच

अधिक. लहान मुलांसाठी हे सुळे प्राप्त होतांना-हे सुळे निघताना फार त्रास होतो. अभ्यासिण्यासारीखे आहे हे दंतसूत्र. तसेच जीयेस अक्कलदाढ आपण म्हणतो तीयेस श्रीहनुमंत 'प्रसादिनी' असे संबोधितात. ही वयाच्या साधारण २२ नंतर २८ पर्यंत केव्हाही येते. परंतु ही प्रसादीनी प्रसरण पावत असताना जीवास फार त्रास होतो. श्रीगणेशांचेही हे सुळेच बाहेर आलेले असतात. नी त्यात मोठमोठे वृक्ष-राक्षस उचलण्याची नी मारण्याची ताकदही असते. ती श्रीगणराजांचे सौंदर्यस्थली आहे ती. सुंदर दात हे सौंदर्याचेच लक्षण आहे. दात एकसारखे नी एवढे गच्च, घट्ट नी कडक असे एकमेकांना लागून असतात की दातात फट म्हणून असत नाही. असलीच तर चांगली नसते. पोकळी नसलेली शरीरातील ही एकमेव जागा आहे. साधारण व्यवस्थित वजनाच्या मुलास ६ ते ७ व्या महिन्यात हे दात प्राप्त होतात. नी त्यास ५ ची म्हणजेच पृथ्वी-आप-तेज-वायू-आकाश या तत्वांची ओळख होते. नी साधारण ४ थ्या महिन्यापासून त्याच्या हिरड्या दिसावयास लागतात. पुढील पटाशीच्या दातातील २ दात उघड व्हावयास लागतात. दोन बारीक छोटे बिंदूरुप दंत येतात. नी त्यानंतर मग हळूहळू सुरवातीस वरचे दात आधी, नी खालचे नंतर क्रमाक्रमानी येतात. अशा या ३२ दातांच्या, ३२ सख्यांच्या साह्निध्यात जिव्हा सतत राहते. वयानी ती कधीही वाढत नाही. जन्मतःच ती जेवढी असते तेवढीच राहते. हिस लंब म्हणजे दीर्घ करण्याकरीता हटयोग-खेचरीमुद्रा-सिंहमुद्रा-व्याघ्रमुद्रा-जांभई-ॐकार-कंठरव, यामार्गाने प्रयत्न करावे लागतात. यावरुन आपल्या हे निश्चित ध्यानात येईल की प्रियईश्वराची, पूज्यईश्वराची कोणतीच-कुठलीच गोष्ट ही योजनेशिवाय नाही. पूर्ण योजनाबद्ध-सुसुत्र-अशी सारी बांधणी आहे. आपण अभ्यास करीत नाही म्हणून. दुधाचे दात नाजूक-हलके-छोटे. पण ते पडल्यानंतर भक्कम अशी दंतधारणा होते. कराल-दात-दाढा या काळाच्या असतात. पण त्या सर्वांवरच धरील्या जात नाहीत. आपणास एक जिव्हा-नी एका जिव्हेस ही ३२ सूत्ररचना असते. विचार करायला हवा. अग्निच्या सप्तजिव्हा. शेषांच्या सहस्त्र. आपण म्हणू शक्य नाही हे. नी तसे ते खरेही म्हणावयास हवेच. कारण आपल्या

बुद्धीने हे पाहिलेले नाही. नी जे पाहिले ते सारे लघुरुप देखियेले. लहानसेच पाहिलेले आहे. विशाल असे काही उरलेलेच नाही, एका आभाळा शिवाय नी समुद्रा शिवाय आता. जो समुद्र आपणांस विशाल वाटतो तोच एका आचमनात-ओंजळीत घेऊन श्रीअगस्तिमुनिंनी प्राशन केला आहे. पुन्हा बुद्धीस हे दुसरे कोडे पडेल. पण बुद्धीजवळचा हा अलोट स्मृति खजिना खूप खूप दिव्यगुणांच्या आश्रयास आहे. सर्वत्र संशयाने पाहणारी- संशयात्मा विनश्यति असे वाचून-ऐकून-पाहूनही पुन्हा संशयाकडेच वळणारी बुद्धी, तीस हे कठीणच वाटणार. अवघडच वाटणार. परंतु हे अशक्य नाही. कारण अभ्यास. तोच तर श्रीसमर्थ करवून घेत आहेत. म्हणे दास विश्वासिता मुक्ती भोगी. कशातून मुक्ती..तर साऱ्यातून-संशयापासून ते जन्ममरण फेऱ्यापर्यंत साऱ्यांतूनच मुक्ती. केवळ विश्वासिल्याने ही मुक्ती जीवास प्राप्त होणार आहे. मग काय हरकत आहे विश्वासायला..पण तेच तेवढे जमेना नां.

..जिव्हेचे एक सुंदर सूत्र फुंकर..

बघा आपण त्रिधा मेधा द्विविधा या वेणीच्या त्रिपेडांपासून हे सूत्र घेत घेत श्रीसमर्थां बरोबर कुठल्या कुठल्या दालनातून फिरत आहोत. नी ते ते दालनही आपणांस ज्ञानाने समृद्ध करीत आहे. जे आजपर्यंत अज्ञात होते आता ते सारे ज्ञानकक्षेत, केवळ श्रींमुळे येत आहे. ऋण नाहीच फीटले पाहीजे हे. आपण तयांचे ऋणीच असावयास हवे. कारण हा ज्ञानवन्ही श्रींनी चेतविलेला आहे. आता आपण हे जिव्हासूत्र पाहत आहोत. ही जिव्हा आपली शक्ती, फुंकर या वहन मार्गाने कशी पाहोचविते बघा. कीती प्रकारीच्या या फुंकरी आहेत. वन्हीवर मारीलेली फुंकर. दुःखावर घातिलेली फुंकर. जखमेवर टाकीलेली फुंकर. गरम पदार्थावर फुंकर. दिवा विझविण्यासाठी फुंकर. एखादी गोष्ट फुलविण्यासाठी फुंकर. एखादी गोष्ट मोकळी करण्यासाठी फुंकर. एखादी गोष्ट वाळविण्याकरीता फुंकर. एखादी गोष्ट कोरडी करण्याकरीता फुंकर. एखादी गोष्ट काढण्याकरीता फुंकर. जसे डोळ्यात पापणीचा केस असे. अष्टमीच्या घटातील फुंकर. फुगडीच्या वेळची फूफू अशी फुंकर. कान फुंकतांना मारावयाची फुंकर. नाव ठेविल्यानंतर

मारावयाची फुंकर. दमल्यानंतर तो दम काढून टाकतांना मारावयाची फुंकर, जसे हुश्श. गरम होत असतांना मारावयाची फुंकर. जसे स स..असा वारा घेतो तसे. भाजल्यानंतरची. पोळल्यानंतरची. चिरल्यानंतरची. खरचटल्यानंतरची. औषध लावल्यानंतरची. धूळ बाजूस सारतांनाची. पाण्यावर मारीलेली. अग्नीवर मारीलेली. ओंजळीत हात गरम व्हावे म्हणून मारलेली. शीळ नावाची फुंकर. एखादी गोष्ट स्वच्छ करतांना मारीलेली. गेली उडत या अर्थी मारीलेली फुंकर. ओवा खावून बाळाच्या कानात मारलेली. पाण्यात बुडाल्यानंतर, ज्यास आपण कृत्रिम श्वासोच्छ्वास म्हणतो त्यावेळेची फुंकर. एखादी गोष्ट आठवतांना ओठांचा चंबू होतो ती फुंकर. पाण्यात काही पडले तर मारावी लागणारी फुंकर. पदार्थातून काही काढण्यासाठीची फुंकर. दागिन्यांमध्ये-कुड्यांच्या फिरकींमध्ये काही अडकले तर त्यासाठी मारीलेली फुंकर. रांगोळीचा थेंब चुकला तर तो दूर करण्यासाठी मारीलेली फुंकर. पानास पान चिकटले असल्यास मारावयाची फुंकर. विझू नये म्हणून मारावयाची फुंकर. हाती लागलेली पापणी मनगटावर घेऊन तीस उडविण्याकरीता मारीलेली फुंकर. तिखट पदार्थांनी मुखात जाळ केल्यावर स्वत:च फुंकरणे. पाणी अलग करतांना. दुधावरची साय बाजूला करतांना. दुध ऊतू जावू नये म्हणून. भातावरची वाफ बाहेर येउ नये म्हणून. पदार्थ भांड्यातच रहावा म्हणून. दिव्यावरची काजळी काढावयासाठी मारीलेली फुंकर. अलाबला टळो म्हणून मारीलेली फुंकर. लहान मुलाला तो पडल्यावर, रुदन करायला लागल्यावर त्यास सांगतात हात् रे, तो बघ उंदीर पळाला..फू फू, ती फुंकर. काही वाईट दृश्य पाहिले तर मारावयाची फुंकर. केस पुढे आलेले उडविण्यासाठी मारीलेली फुंकर. गरम पदार्थास-भाकरीस-पोळीस, पापुद्रा काढतांना मारीलेली फुंकर. सूपातिल धान्याचे भूस काढून टाकताना मारीलेली. मेंदी वाळण्यासाठी मारीलेली. काडी विझवितांना मारीलेली. फुंकणीतून मारीलेली. घोरतो तीही फुंकरच आहे. काहींना नुसतेच ओठ फुलवायाची सवय असते. त्यावेळीही जी हवा बाहेर पडते ती देखील फुंकरच होय. एखाद्याच्या सांत्वनपर दुःखावर घातिलेलिही फुंकरच. भयानक दृश्य पाहून मुखातून बाहेर पडणारी फू या अर्थाची हवा

ही देखील फुंकरच. शंखात घातिलेली फुंकर. सनई-बासरी-बाजा-तुतारी-पिपाणी-पुंगी-बीन-शिंगी-कर्णी यातील फुंकर वेगळी. या साऱ्या फुंकरी, फुंकरातून ती हवा बाहेर टाकतात, जी परावाणीच्या आसपांस 'खसखस' स्वरुपात विहरत असते. ही देखील हवाच आहे. एखाद्या पदार्थास हवा लागू नये म्हणून जपतात. कारण हवेच्या संपर्कात तो पदार्थ आला की तो दगडासारखा होतो. परंतु तसे हे भाव-दगडासारखे नाहीत. याचे वायुरुप कण तयार होत असतात. ही प्रक्रिया आतल्याआत नी अत्यंत गुप्त स्वरुपाची असते. रागाने-सूडाने टाकलेले फुत्कार यात येत नाही. ज्यावेळेस जीवास क्रोध-संताप-वाद-विवाद-भांडण-तंटा होतो, त्यावेळेस या वायूरुपकणिका सैरभैर होऊन तडातड उडत असतात. त्यामुळे भांडण म्हंटले, की जो पोटात गोळा येण्याचा प्रकार आहे तो यामुळेच आहे. म्हणूनच फुंकरीस खूप महत्व दिले आहे. लहान मुलाची टाळू भरतांना टाळूवर थोडी वेखंडपावडर घालावयाची आपली पद्धत आहे. वेखंड घातले की त्यास सर्दी कींवा पाण्याच्या संपर्काचा त्रास होत नाही. परंतु सध्या ही टाळू देखील भरण्याबाबत फारच प्रवाद आहेत. असो बापडे. मूलं ज्यांनी खऱ्या अर्थानी वाढवले, नी १०० च्या पुढे धडधाकट नेले, त्यांचेच जर ऐकावयाचे नाही तर, अशा त्या बुद्धीविषयी न बोलणेच बरे नांही कां? तर ही टाळूवरील वेखंडपावडर त्याच्या जावळात हलके फुंकर घालून पसरविली ना की, त्या कणांनी या तडतड उडणाऱ्या कणांना उपजतच-जात्याच निवविले जाते. लहान मुले फार तडतडी असतात. त्या तडतडीस शांतता प्राप्त होते. नी ती शांतता स्मरणासाठी अत्यंत पोषक असते. पुढे स्मरणशक्तीत वाढ होणे. स्मरणशक्ती वाढविणे-जोपासिणे यासाठी हे गुटी प्रकार फार महत्वाचे आहेत. हे एक वेगळ्या प्रकारचे बाळकडूच होय. आईने मुलाचे कोपरे-मनगट-गुडघा-पोटरी व टाच या भागांवर विशिष्ट संस्कार जर ८ व्या ९ व्या महिन्यापर्यंत म्हणिजेच साधारण तो उभा राहिपर्यंत केल्यास, त्यास दम लागत नाही. त्याची क्षमता वाढते. नी उत्साहही वाढतो. परिणामी त्यास चिंता रहात नाही. कारण चिंता म्हणिजे बुद्धीचे अडणे, नी बुद्धीचे अडणे म्हणिजे तरी काय..तर स्मरण न होणे.

यावरही उपाय आहे, परंतु तो बुद्धीतील कुठल्या कक्षातून-कक्षात जाऊन-कक्षापासून घ्यावायचा-सोडवावयाचा याचेच ज्ञान होत नाही. नी नेमके अशाचवेळी जीव, सत्य मागत फिरत असतो. सत्य शोधित असतो. नी ऐशाचवेळी-ऐशाच समयी जर त्यास योग्य मार्गदर्शन लाभले तर ठीक, नाहीतर अडणाऱ्या घोड्यांचे सल्ले मग आणखीनच जीवाचामार्ग अडवितात. पुन्हा मग वेगळ्याच समस्या. आपण जर त्या सल्ला देणाऱ्यास म्हणालो, अहो, तुम्ही सांगितले म्हणून नां आम्ही असे केले. तर त्यावर त्यांचे सांगणे असते की, अहो आम्ही लाख सांगितले हो, पण तुम्ही ठरवायाचे काय ते. थोडक्यात तुम्हाला अक्कल नको कां..असेच त्यांस म्हणावयाचे असते. म्हणजे एकूण काय? तर, पुन्हा आपल्याला जर आपल्याच अकलेवर यायचे आहे, तर मग आपल्याच बुद्धीचा कोट, तो तो अक्कलकोट मजबूत करावयास नको का? नी ती मजबूती केव्हा करणार-कळणार? चिंता-काळजी वाढायाला लागल्यावर? अहो जोपर्यंत तात-मातगृही निवांत नी निश्चिंत असतो, तोवरच ही मजबूती-ही इमारत बांधणी शक्य आहे. एकदा का सर्व जबाबदारी आपणांवर पडली की कोट फुटण्याचीच-तटबंदी ढासळण्याचीच शक्यता अधिक आहे. अनुभव काय आहे याबाबत आपला? जरा अंतर्मनात डोकवा म्हणिजे ते अंतर्मन कसे सुळकन बाहेर येऊन, अजून आत किती किती तण माजले आहेत ते सांगेल. अंकुर असेल, कोंब असेल-लव असेल-कुशही असेल तर काळजी नाही हो. पण तण म्हणजेच चिंता नां? त्या वाढायाला नकोत. ते तण काढून टाकीलेच पाहिजेत. येथेच मत्स्यावताराचे महत्व जीवाने उमजले-जाणिले पाहिजे. या साऱ्या साठवणी गर्भात नी दर्भात दडलेल्या असतात. दुपटात नी झोळीत-अंकावर नी कुशीतच असतांना यांचे स्मरण व्हावयास हवे. व्हावयासच हवे. पुढे हे शक्य होत नाही. शक्यताही नाहीच. वृक्ष एकदा वाढल्यावर आपण तो असा वाढायला हवा होता-असा अंकुरायला-असा बहरायला हवा होता, असे म्हणणे म्हणिजे हास्यास्पद नव्हे का? वृक्ष जर आपल्याला सावली देणारा हवा. भरभक्कम हवा. तर कधी सुरवात करावयाला हवी? विचार हवा नां काही? म्हणून 'ग्रं'-'ग्रंथारंभ'. तो

करतानाच दक्ष-सावध-साक्षपी-चतुर-ज्ञानी-जाणते नी मग कर्ते व्हावयास हवे. नी तद्नंतर पेर्ते-स्मर्ते-व्हा. हेच श्रीसमर्थ या 'ग्रं' मधून जीवास जोजवितांना सांगत आहेत. अंकावर घेऊन-मांडीवर घेऊन जर गायत्री उच्चारणापर्यंत शिकविता येते, तर संस्कारक्षम वय अजून का वेगळे सांगावयाला हवे का. म्हणून या फुंकरीचे शास्त्र समजून घेतिले पाहिजे. पाटी वाळावी म्हणून-शाई वाळावी म्हणून मारीलेली फुंकर. पूर्वी लेखनाकरीता बोरु वापरले जायाचे. तेव्हा तर त्या अक्षरांवर फुंकरच मारावी लागायाची. किती प्रकारची फुंकर आहे बघा. बरे ती एकाच मुखातून मारली जाते हे केवढे आश्चर्य आहे. काय श्रीपरमेश्वरी योजना वैचित्र्य म्हणावे हे. केवढे विविध-वैविध्य-वैचित्र्यपूर्ण भावधारण करती होते ही फुंकर. आपल्यातच जर एवढ्या जिव्हा आहेत-तर कोण म्हणेल शेषांच्या सहस्त्र नसतील म्हणून? श्रीसमर्थ सांगतात, पूर्ण जाणा-मुळापर्यंत जाणा- अर्धवट माहितीवर पूर्ण 'ग्रं' ची परीक्षा करुच नका. त्याने नुकसान-त्यात नुकसान आपलेच आहे. या फुंकरीत कीती अग्नीव्याप्त असतो, याची आपणांस कल्पना नाही. पण पोळी फुगली नी आपण ती हाताने भाजत असताना ती जर कुठे फुटली तर, जी वाफ येते नां ती पोळीची फुंकरच आहे. प्रत्यक्ष भाजण्याने एवढी आग-एवढी तळमळ होणार नाही, एवढी त्या वाफेच्या पोळण्याने होते. केवढा अग्नि त्यात व्याप्त असतो बघा. मुखाचा चंबू करुन आतून हवा बाहेर टाकली की फुंकरीतून ती हवा गार येते. पण बघा-हां हां असा उच्चार केला तर गरम हवा मुखातून बाहेर येते. म्हणिजे चंबू पद्धतीने गार हवा. नी जांभई पद्धतीने गरम हवा. काय एका मुखाची करामत हो ही? योजनेशिवाय का असेल हे सारे? परंतु नाही योजना कळली. नाही योजक कळला, पण निदान आपले अज्ञान जरी कळले, तरी पुष्कळ मेळविले म्हणावयाचे. यातील काहीही जाणा, मग आपण पूर्ण आहोत हे, कींवा अर्धवट आहोत हे. हुशार आहोत हे, कींवा पढतमुर्ख आहोत हे. अणु आहोत हे, कींवा ते ब्रह्मांड आहोत हे. जीव आहोत हे कींवा शिव आहोत हे. काहीही जाणा. जाणते व्हा म्हणिजे झाले. ही सारी धडपड श्रीसमर्थांची तेवढ्याचकरीता आहे. आपण जाणते होण्याकरीता

केवळ. आळसे कार्य भाग नासतो, नी यत्नाने कर्मभोग नासविता येतो. जाणा कुठे जायाचे ते. फुंकर ही श्वास व अन्न या दोन स्थळांमधील विवरातून येते. तीस खालून वर आणणे तसे अवघड काम आहे. पण हे आपणांस अवघड वाटत नाही. कारण मुखाचे चंबू स्वरुप केले की ही आपोआप बाहेर येते. पण कशी? याचाच खरे तर अभ्यास व्हावयास हवा. नी शालेय शिक्षणात हाच अभाव आहे. शालेय शिक्षण वाईट अथवा चुकीचे नव्हे. पण ते केवळ माहिती नी संकलन स्वरुपाचे ठरते. प्रत्येक गोष्टी थोड्याफार माहिती करुन घेणे, म्हणिजे सर्वांगीण विकास होत नाही. एकदम या वाक्यावर आपणास डोळे मोठे करायला नकोत. किंवा संताप-क्रोधाचे शब्द ही शोधायला नकोत. कींवा कोणाच्या कुठल्या भावना दुखावयालाही नकोत. तो उद्देश तर कधीच नसणार-नसेलही. त्रुटी समजून घेणे म्हणिजे उदात्तता जपणे आहे. नी भावना दुखावतात म्हणिजे त्या आहेत हे तर निश्चित नां? नी त्या जर आपणापाशी आहेत, तर त्या तशाच दुसऱ्याजवळही असणार हे ही निश्चितच. नी मग जर आपल्या सारख्याच या भावना दुसरीकडेही आहेत, हे कळल्यावर मग त्या दुखविता येतिल का. आपण त्या दुखवू धजू का? जीभ दाताने चावली..कोणी बत्तिशी फोडीली, असे नी ऐवढे सलग्न नाते आपल्या सर्वांचेच बंधुत्वाचे आहे. नी म्हणूनच कुणास दुखवू नये हेच ज्ञान. आपण असे बघू या की, शालेय शिक्षणात जर सर्वांगीण विकास होत असेल तर, शालेय जीवनानंतर-महाविद्यालयीन जीवनानंतर काही समस्याच उरावयास नकोत. चिंता, कींवा पुढे काय? या प्रश्नांची मालिकाच खरेतर नको. तर तसे होतांना दिसते का? प्रश्नाच्या मुळाचा भाग येथे तपासणे आवश्यक नाही का? विद्यार्थ्यांच्या मनात उतरता आले तर आढळेल, की महाविद्यालयीन शिक्षण संपत आले, की त्यांची सैरभैर अवस्था वाढायाला लागते. भिती वाढायाला लागते. का? कारण आता पुढे काय करावयाचे? माता-पित्यांची अपेक्षा पूर्ण करावयाची असते. त्यांनी शिक्षणावर केलेला खर्च, याची मनास बोचणी असतेच. स्वतःस जबाबदारीची जाणिव आलेली असते. नी परिस्थिती अशी पुढे उभी, की पार जखडून गेलो आहोत अशी. ज्या भावनेने शिक्षण

घेतले त्या विरुद्ध परिस्थितिचा सामना जर विद्यार्थ्यांस करावा लागला तर त्याचे त्यांस शिक्षण आहे का? सहनशक्ती-समंजसता-मनाचे कंगोरे-भवसागरातील धक्के-आप्त-इष्टांचे स्वभाव-त्यांच्या समजूती-स्वतःची स्वप्ने-ध्येय गाठण्याच्या मार्गातील अडचणी-कुणाशी नीटसा संवाद न होणे-समजून घेणारा कोणी न भेटणे-आयुष्याच्या प्रवासात भेटणारी विविध स्वभाव वैचित्र्याची माणसे-समज-गैरसमज-अपसमज-जाणून घेणाऱ्या सोबतीचा अभाव, या साऱ्यामुळे मग शालेय जीवनातील गोष्टी स्वप्नवत ठरु लागतात. नी जीवाचा एकंदरीतच संभ्रम होतो. विश्वास उडतो. जसे बालपणापासून विद्यालयीन पुढे महाविद्यालयीन असा त्याचा शिक्षणप्रवाह अखंड चालिला तसाच पुढेही हा प्रवाह त्यास नोकरी-व्यवसायाची खंड न पडता उपलब्धी का करुन देऊ शकत नाही? स्वतःचे कर्तृत्व सिद्ध करण्यासाठी त्यास झगडावे का लागते? नी या संघर्षात त्यास कळते की घेतिलेले शिक्षण किती तोकडे आहे म्हणून. प्रश्न पड्तातच का? तर प्रश्नांच्या मुळाशी आपण जात नाही म्हणून. अहो ही साठाउत्तराची कहाणी पाचाउत्तरी सुफळ संपूर्ण अशी जर आहे. तर मग प्रश्न आहेच कुठे? नी प्रश्न हे वरवरचे आहेत हीच तर जाण होणे म्हणिजे अभ्यास, नाही का? उत्तर तळाशी आहे, हे तर ज्ञान. नी तळातून वर येणे हिच तर फुंकर. अशी ही फुंकर हेच तर आरोग्य-वैभव. आता ही वैभवाची फुंकरच जर त्या बालब्रह्मावर घातली गेली. योग्य वयातच घातली गेली तर तो वन्ही उद्या श्रीसूर्यनारायणांतून येणाऱ्या वन्ही शलाका-अग्नी जिव्हांशी संवादू शकणार नाही का? जिव्हा आहे म्हणिजे अक्षरप्राप्ती आहे. नी अक्षरे आहेत म्हणिजे बोल आहेतच. असणारच. बोल म्हणिजे वाचण्याचे तंत्र. उच्चारण्याचा हेतू. हेतू मागील निश्चय-निश्चयामागील भावना-भावनामागील प्रेरणा-प्रेरणे मागील ज्ञान-ज्ञानामागील जाणिव-जाणिवेमागील प्रेम-प्रेमामागील कर्ता-कर्त्यामागील कर्तृत्व-कर्तृत्वामागील शक्ती-शक्ती मागील बळ-बळामागील पाठबळ-पाठबळामागील अधिष्ठान-अधिष्ठानामधील अधिष्ठात्र-अधिष्ठात्राचे क्षेत्राक्षेत्रावरील तीर्थ-तीर्थातील तत्व-तत्वातील प्राण-प्राणातील श्वास-श्वासातील पोकळी-पोकळीतील फुंकर-फुंकरीतील

चैतन्य-चैतन्यातील स्पर्श-स्पर्शातील गोडवा-गोडव्यातील माधुर्य-माधुर्यातील मध-मधातील मकरंद-मकरंदातील मधुपर्कांचे ठाणे-स्थान-ठाण्यातील मधु-मधु स्थानातील स्नेह-स्नेहातील सायुज्य-सायुज्यातील शुचिता-शुचितेतील निस्पृहता-निस्पृहेतेतील तळमळ-तळमळीतील ओढ-ओढीतील व्याकुळता-व्याकुळतेतील विरह-विरहातील आर्तता-आर्ततेचे बीज-बीजातिल प्रार्थना-प्रार्थनेतील कृपा-कृपेतील घन-घनातील वर्षा-वर्षातील थेंब-थेंबातील समृद्धता-समृद्धतेचे स्मरण-स्मरणातील अमृत-अमृतातिल चिरंजीवित्व-चिरंजीवित्वाचा धागा-चिरंजीवित्वाशी जोडलेला 'ग्रं'. या ग्रं ची ग्रंथी अशी आहे की हिस गाठ मारीलेली नसते. ही जोडीलेली असते. या जोडीशी सुफळता-सुफळतेशी 'सं' पूर्णता-म्हणिजे संकष्ट निवारण. संकष्ट निवारण म्हणिजेच संपूर्णतेची प्राप्ती-म्हणिजेच श्रीगजानन भेटी-श्रीगजानन भेटी म्हणिजेच दासभेटी श्रीरामदास भेटी-श्रीरामदास भेटी म्हणिजेच श्रीप्राप्ती. श्रीकपिवरांची ध्येय दृष्टी-त्या दृष्टीने श्रीस्वामीसृष्टी नी सृष्टीतील श्रीराम नी श्रीरामांची सृष्टी-या मुळापर्यंत, येथपर्यंत आहे का या शिक्षणास पुष्टी? तरच सुफल संपूर्णता प्राप्त होईल. तर अभ्यास पूर्ण होईल. नी साऱ्यांचेच आयुष्य मग एक सायुज्य प्राप्त असा विजयरथ होईल. इथे तर अभ्यास पूर्ण झाल्यावर काय करावयाचे?हा जर प्रश्न आहे, तर मग पूर्ण कोण आहे-कुठे आहे? नी अर्धवट 'घडणे' काय चढ चढणार..कसा चढ चढणार-कधी शिखरावर जाणार..? सागरीचा सिंपकीडा मेरु पर्वता न जाय कधी..हे जेव्हा श्रीमहाराज सांगत आहेत, तेव्हा श्रींना जीवास असे सांगावयाचे आहे, की या अशा अर्धवट ज्ञानाने तो ती उंची कशी काय गाठू शकेल? जी त्यास हवी आहे. ज्याची त्यास अपेक्षा आहे. जसे आयुष्य त्यास हवे आहे तसे आयुष्य या अशाबळावर त्यास प्राप्त होईल का? म्हणून तुम्ही तो, म्हणिजे अर्धवट ज्ञानाचा कीडा, कशाने वर जाईल-उच्च-उंच जाईल हे समजून घ्या. याचा अभ्यास करा. असे श्रींचे आपणा सर्वत्रांस सांगणे आहे. अशाश्वताचे पोषणं केले शाश्वता विसरुनं, अशाने का तो सिंपकीडा मेरुची उंची गाठेल? शक्यच नाही. त्याचा नी त्या मेरुचा काही अभ्यास नको का? मग असा तो, ती उंची गाठूच जर

शकणार नाही-तो त्याप्रत जाणारच नाही तर मग विचारच सोडून द्यावयाचा का? तर जीवाने याचा विचार, आपण तेथपर्यंत का जाऊ शकणार नाही? जाणार नाही? या धाग्यापासून सुरवात करुन, आपण जाऊ शकू-जाऊच-पाहोचूच-जाईल-जाईलच-गेला-पोहचला-लागला, ध्वज, चढला कळसावर. येथपर्यंत असा करावा. असे हे संपूर्ण आत्मविश्वासाचे शिक्षण द्यावयास नको का?अहो लृ लॄ हे ऱ्हस्व दीर्घ शब्द-हे बाराखडीत नसतात. म्हणजे बघा-अ आ इ ई उ ऊ-ए ऐ ओ औ अं अः-क ख ग घ ङ-च छ ज झ ज-ट ठ ड ढ ण-त थ द ध न-प फ ब भ म-य र ल व श ष-स ह ळ क्ष ज्ञ- यापर्यंत किंवा यामध्ये कुठेही लृ लॄ हा शब्द नाही. नी यात नसलेला शब्द घेऊन जर आपण सानुल्याशी संवादतो-बघा 'अरे लृ लृ लृ'-कींवा लहान मूल रुदन करीत असतांना जीभेचा शेजारील हिरडीवर आघात करुन टर्रर टर्रर पद्धतीने त्यास शांतवितो. खेळवितो. तर याचा अर्थ काय? अर्थ हाच की तो हे बारा ही खडे जाणितो आहे. त्यास १३.१४.१५ शिकावयाचे नाहीत, तर ओलांडून जावयाचे आहेत. पण कोण जाणणार?

..कोणाकडून शिकावे?..

*महर्षिश्रीनारदप्रभृति*श्रीमहर्षिश्रीवसिष्ठमहाप्रभृति*श्रीश्रीमन्अत्रेयश्रीस्वगर्भीन् *श्रीमद्वाल्मिकमहायश दिव्यप्रभृति*श्रीमुनिसांदीपनिविशेषप्रभृति *श्रीव्यासमहामुनिमहर्षी.*श्रीविश्वामित्रसकलसृष्टी*श्रीयाज्ञवल्क्यमहद्विभूती *श्रीआदिनारायणमहाविष्णो*श्रीमहद्भूतकपालिन्हेहेश्रीश्रीमद्महादेव *श्रीउमामहेश्वरपर्वतधारिणिआईभवानी
*श्रीमहाकालीआनंदिनी सौभाग्यदायिनी परमानंदी भगवती *श्रीजगदंबाविशेषमिळणी श्रीश्रीमहाकाली भैरवी चामुंडा सरोदिनी *श्रीगणाधिपतीश्री-हुंध्विमंडलाधिपतिकरतैकमहाविशेष*श्रीकपिल महाज्ञानी *श्रीमार्कंडेयअधिपति*श्रीमन्नारायणउदीतभानूसप्तेश्वरमहाप्रभूश्रीसूर्यमंडली *श्रीवद्चंडाशु शशितप्तकीरणु*श्रीविशेषातेजःशलाकाधिपतिनक्षत्रमंडली *श्रीपरमविशेषाग्रहमंडळी*श्रीरसउद्भविणिराहूसारणी
*श्रीकेशवैभवविद्वत्धारिणिंकेतूकदंबिनी*श्रीपरमगुणिशनिमर्हऐश्वर्यी

*श्रीमहामतिधर्मराजउद्भवमहामुनी*श्रीउर्ध्वशक्तीउद्भविन्श्रीश्रीभिमप्रभृति
*श्रीमन्महामहामति मुनीश्वरैः प्राकटय श्रीयमधर्म करतालिनी.
*उपरीविशेषअधिपतिधिपतिमहिपतिश्रीसरस्वत्यैब्रह्मभूभूःतःअक्षरसमुहिनी
*श्रीप्रचंडांशदिव्यउद्भविनीविद्याकलादिग्पतिमहिम्महिम्श्रीगणेशगोसावियां
*शांतआशिषउपरीपरब्रह्मप्रवेशश्रीमन्विद्याकलाअधिष्ठात्रउपप्रवेशमहाबली
श्रीरामदासस्वामिमहाराज श्रीहनुमत्सर्वाधिकारी श्रीमन्महागणपति
*श्रीश्रीमद्एक्यमौनंधारिणउप्रजाधीरलाविशेषाचित्चित्क्लीकुंडलीन्यांमंडलप्रिया
त्रृ त्रृ त्रृं त्रृ त्रृ भानव्येज्ञार्नोज्ञार्नोनिवृत्तीमहाराज
* *सरोवरनिजमांगल्यस्वदर्पणशलाकाघनगंभीरमहाप्रागट्यश्रीश्रीमहाराज
गजाननविशेषअवतारधारिण्विभूतिमहद्ऐश्वर्य
*श्रीशांतनिजवल्लीमहामुनीअद्भुतैश्वरमहामंडलीदिक्धिपती
कोटीब्रह्मांडराश्याधिपतीअखिलमंडलमहन्मंगलमूर्तीमहाराजाधिराज
कपिवरमहामन्ङङज्ञाधिपतयेगणपतीश्रीमहाबलीअंजनीकुमार
*महद्बिंदुसिंधुसागरअजानबाहुकुंडल-स्कंध-वक्ष-समग्रउन्जन
विषण्णमहाकपोलभ्रूमाविशेषअत्यादारिणीसुखसागर-क्षीर-उर-पूर
इक्षुरसव्यापिनीत्वष्ट्रामहाप्रमोदिनीजानकीलावण्यविधीवत्
महामहाधिमहीधियोनःनलिकाद्धिमुखिधारिणीतत्सवित्रृमहापराक्रमी अष्टगज
प्रियंगदा कोमल-रुप्रजा महद्अंगा प्रत्यंगा चंदन मंडल विशेषा
*राजाधिराजमहाराजअधिराजदिक्प्रेमीपरम्सुंदरमहामायांकीत
श्रीश्रीश्रीमद्चंद्रचंद्राडंशुङङशक्तीदिव्यधामनिवासी महायोगी तपस्वी
महामहामुनीऐश्वर्यवलयांकीतपरमनिर्गुणश्रीस्वामीन् हृदयनिवासी श्रीराम..

यांकडून विद्याग्रहण करावी आपण. विद्यार्थी व्हावे यांचे आपण. यांकडून विद्याग्रहण करावे. यांचे वर्गी-कक्षी बैसावे नी शिकावे. ज्यांनी १२ खडे दिले. नी ३६ वाळुकंद दिले. अनंतकोटीब्रह्मांड दिले. अशा या दिग्गजप्रभृतीं जवळ बसूनच खरेतर आपण शिक्षण घ्यावयास हवे नां?त्यांच्याजवळ बसूनच शिकण्यानी ते कळेल नां?कारण सारी निमिर्ती त्यांचीच. सारे अवतार-सारी जनधारणा-सारे पिंड ब्रह्मांड बीज-सारेच जर त्यांचे हाती, तर शिकायाचे कुठून? प्राप्ती कुठून करुन घ्यावयाची,

**जीवास गर्भातच प्राप्त होणारे बाराखडे**

| वक्ष मध्य | वाम स्कंध | सव्य स्कंध |
|---|---|---|
| ११ (वर), १० (डावे), १२ (उजवे), १ (खाली) | २ (वर), ९ (डावे), ८ (उजवे), ७ (खाली) | ३ (वर), ४ (डावे), ६ (उजवे), ५ (खाली) |
| ⑦ | ⑧ | ⑨ |
| १ | २ | ३ |
| ① | ② | ③ |
| १ अ | २ ए | ३ ऊ |
| १० अं | ९ ई | ४ ऐ |
| ११ अः | ८ इ | ६ उ |
| १२ आ | ७ औ | ५ ओ |
| ३४ | २६ | १८ |
| ७ | ८ | ९ |

जीवास गर्भातच प्राप्त होणाऱ्या या बाराखड्यांविषयी अधिक माहिती आपण पुढील पुस्तकात बघणार आहोतच.

बघा. नी आपण जे शिकतो ते यापैकी काय आहे? नी जर यातील काही नाही तर मग ज्यातून थोडे थोडे घेऊन आपण 'शिकलो' म्हणितो, ते पूर्ण कसे म्हणावयाचे? महाघोर संग्राम विद्युल्लतेचा-महाराजाधिराज उष:प्रभेचा-शिरी हात ठेवी कृपा पूर्ण देई..गजानना रामदास रुद्रा विजयाशिष देई..ही पूर्णता हवी. लृ लृ या अक्षर उच्चारानी जी फुंकर बाहेर पडते, ती सर्व आरोग्य-ऐश्वर्य-प्रताप-बळ-या शक्तींस बलवान करीते. शरीरात तसे रोगजंतू नाहीतच आपल्या. पुढे प्रादुर्भाव होतो त्यांचा. त्यासाठीच ल या अक्षरास अ र उ अक्षरे लावून 'लृ' उच्चारण करणे, म्हणजे रोगजंतूंसच अटकाव करणे आहे. हे ध्यानी असू द्यावे. बाराखडे म्हणजे अ आ. नी ३६ वाळूकंद म्हणिजेच आपल्या अपभ्रंश केलेल्या भाषेत, वाळवंट म्हणजे क ते ज्ञ ही अक्षरे होत. या सर्वांमधून-श्री-लृ-लृ-ॠ-ॠ ही अक्षरे म्हणजे अलिप्ताक्षरे आहेत. कशाकशाचा नी कोठून कोठून अभ्यास करणे आवश्यक आहे. तो होणे आवश्यक आहे बघा. लृ लाृ लिृ लीृ लुृ लूृ लेृ लोृ लौृ लांृ लृः-आता अभ्यासा की यांस काना-मात्रा-वेलांटी-अनुस्वार-विसर्ग या कशाहीमध्ये घातिले तरी उच्चार तोच आहे. 'ऋ ऋ' या अक्षरांस तर काना-मात्रा-वेलांटी हे काहीच अंग-उपांग जडविता येत नाहीत. काय आपली प्राकृत-प्राकृतिक मराठी भाषा आहे. महान आहे. आई आहे. मातृभाषा आहे. ही अशी ऋषितुल्य भाषा या भारतवर्षात केवढी अधिक्याने आहे बघा-अभ्यासा, असेच श्रीसमर्थ आपणांस सांगत आहेत. हे सारे जीवास गर्भावस्थेतच प्राप्त होते. गर्भातच तो हे खडे वेचतो. तो ज्या क्रमाने ते वेचतो ती त्याची परिक्रमा ठरते. तीच त्याची

कुंडली ठरते. त्याची मनोवारुवरीलमांड ठरते. मांड म्हणिजे घट्टपकड. एकुणच सर्वावरची. श्रीअभिमन्यूंनी श्रीसुभद्रामातांच्या उदरातच श्रीचक्रव्यूह भेदन कला अवगत केली होती. असे आपण श्रीमहाभारतातून श्रवण केले आहेच. ती याच अक्षर-अर्थ-भाव नी उपयुक्ततेचे मूल्य जाणूनच. म्हणिजे गर्भ जर एवढा पक्क, तर त्यास जन्मास आल्यानंतर किती परिपक्कता मिळावयास-लाभावयास-यावयास हवी? किती.. त्याचेही प्रमाण आपणापांशी आहे बघा..सर्व पृथ्वीचे-समग्र पृथ्वीचे यच्चयावत् शिक्षण घेऊन, स्मरुन-जाणून झाल्यावर, जन्म झाल्याबरोबर पृथ्वी पादाक्रांत करुन, एकदम आकाशझेपच घेतिली श्रीहनुमंतांनी. योगपंथच-सूर्यभक्षणच. श्रीकपिवरांनी दाखवूनच दिले आहे की सारी पृथा जाणिली आहे. आता सूर्यपथ जाणायाला आलो आहोत. बघा हे शिक्षण. या अफाट-अचाट अशा शक्तीस शिक्षण म्हणणे प्रस्तुत नाही. परंतु आपणांस कळावे यासाठी हा शब्दप्रयोग करावा लागतो. आता यापुढे आपण घेतो ते शिक्षण ठेवा. नी आपली आपण बघा तुलना करुन. तुलना क़रण्यापूर्वीच आपल्या माना नाही नाही-हे जमणे नाही-हे होणे नाही या अर्थी हलतात. विद्याप्राप्त करतांना सकलप्राप्तार्थी असा विद्यार्थी दिसतच नाही. आताच्या विद्यार्थ्यांची तयारी तशी कमकुवततेकडे झुकणारीच आहे. त्यास तासाभराची सामुदायिक कवायतही आता सहन होईनाशी झाली आहे. भोवळ येणे-मळमळणे-चक्कर येणे-उभे राहण्यातील दुर्बलता-सतत आजारी-पोषण व्यवस्थित नसणे. म्हणिजे केवळ अन्नसेवन नाही. तर पुरेसा वेळ स्वत:कडे-अभ्यासाकडे-खेळाकडे-विकासाकडे द्यावयास त्याचेजवळ नाही. त्याच्या वाढीकडे कुणा, पूर्णवाढ झालेल्याचे लक्ष नाही. जर मूल जन्मास घातिले, तर त्यास चिंतारहीत वाढविण्याची जबाबदारी श्रीमाता-श्रीपित्यांची आहे. परंतु चित्र असे की मुलांच्या बरोबरीने त्यांच्या काही वेगळ्याच चिंता श्रीमाता-श्रीपित्यांना त्रासदायक ठरतात. चिंतामुक्त-भयमुक्त असे मुल वाढते का? यावर कटाक्ष हवा-लक्ष हवे. त्या अर्थी तात-मात स्थाने कच्ची आहेत असेच म्हणावे लागते नां. नी कच्च्याकडून पक्काची काय अपेक्षा करणार? एका शांत नी समंजस पातळीवरुन आपण या साऱ्याचा

खूप अभ्यास करावयास हवा. ज्या श्रीगजाननांची-श्रीसरस्वतींची विद्या कला अधिष्ठात्री श्रीदेवता म्हणून आपण पूजन करतो, त्यांविषयी जाणणे त्यांच्या अभ्यासानुसार जाणे-त्यांचाच अभ्यास करणे, हाच अभ्यास नव्हे का? कारण विद्या विनयेन शोभते. हा काय फक्त फळ्यावरचा संस्कार सुविचार आहे का? आचरणामधेही ही विनयशीलता हवी नां. जर विद्यार्थी- विद्याप्राप्ती करणारा-विद्याप्राप्त केलेला असेल, तर तो 'विनयाने मंडीत' नको का? श्रीगुरुजनांनाच या विद्यार्थी विनयाबाबत आपण विचारीले पाहीजे. तेच यर्थार्थ सांगतील नक्की काय ते. अंगावर काटा आणणारेही वर्ग आहेत हो. कक्ष आहेत हो. तो काटा आता काढायला हवा नां. निदान ती बोच तरी जाणून घ्यायाला हवी की नाही? आता काटा म्हटले की काट्याचा अभ्यास नाही करावयाचा. तर इथे अभ्यास फुलाचा करावयास हवा. देठ बऱ्यापैकी वर आले, कळी लागली की काटा फुलतो. म्हणिजेच ही काटा बाजू बरीच उशिराची आहे. म्हणिजेच मूळपोषणच संयुक्तीक नी यथायोग्य हवे नां. बरे हे काटे श्रीतात-श्रीमात व स्वत: त्या लेकरांसही बोचतातच नां. पण या पायरीशी-बुद्धी मोहात अडकते. नी लाड- कोडकौतुक-एकुलते, अशा स्वप्नवेड्या विचारांनी त्या फुलास-त्या मुलास- वास्तविक त्या कोमलांगास यशस्विरित्या त्यास जे हवे त्या 'श्री' फळापर्यंत पोहोचता येत नाही. खरेतर हा ध्येयवृक्ष फार उंच नाही. चढण्यासाठी मात्र उध्वर्ता-उच्चतेचाच अभ्यास हवा. हात-पाय रोवणे-उभे राहणे याचाच अभ्यास हवा. नी हेच सारे विस्कळीत झालेले आहे. नी इतरांस अपेक्षा सुसंघटीत समाजाची. कुठे तिवई चालली ही? या डळमळीत आसनावर बसेल का घट व्यवस्थित? मग ती तिवई व्यवस्थित प्रकारे या जीवबिंदुचे बैठकी-तळी द्यावयास नको का? . जीवबिंदु जर या ब्र वर व्यवस्थित राहीला तर सारे ज्ञान त्यास प्राप्त होईल नां. तेच तर स्थान डळमळले नां. म्हणूनच, स्थिरावला समाधित । स्थितप्रज्ञ कसा असे । कृष्णा सांग कसा बोले । कसा राहे फीरे कसा? कामना अंतरातील । सर्व सोडोनी जो स्वये। आत्म्यातचि असे तुष्ट। तो स्थितप्रज्ञ संयमी ।। ओळख करुन देत आहेत. समाधितच जो स्थिरावला. गर्भातच जो सारे उमगला, तो बाहेर

येउन पैसावेल का? जो मुळचाच संयमी आहे, तो हे संयमन तोडेल का? नाही नाही. मग हे असे का घडते आहे?

अर्जुना स्थिती ही ब्राह्मी । पावता न चळे पुन्हा । टिकूनी अंत:काळीही। ब्रह्मनिर्वाण मेळवी ।। न चळणारी-न ढळणारी अशी अढळु-अचळुशक्ती प्राप्त झालेला जीव आहे. जीवाने स्वत:च स्वत:स शोधावे. **याचेच करा सदा मनन..कशापासोनि जग झाले.** ते मननच तर श्रीसमर्थ आपणांस शिकवित आहेत. त्याचाच अभाव आहे आपल्या शिक्षणात. नी तेच महत्वाचे अतिमहत्वाचे आहे. आता सांगा, कसे नी कोणते हवे शिक्षण, तर आपण म्हणू प्रश्न संपविणारे हवे. प्रश्नच न पडणारे शिक्षण हवे. प्रश्न सोडविणारे शिक्षण हवे. नी आता चहूबाजूस नजर टाका, प्रश्नांचे समुहच्या समुह वावरतांना दिसतील. प्रश्न घेऊन पंचतारांकीतात जातात. तेथे पैसे खर्च करुन या समस्यांवरच चर्चा झडतात. कदाचित या समस्या-प्रश्नांकरीताच ही हॉटेले शोधली जातात. म्हणजे स्वत:चे घरात हे बोलता येत नाही. हेच खरे नां? कुठे विचार व्हायला हवा बघा. कुठल्या पातळीवरुन याकडे आपण पाहिले पाहिजे. या समस्या हे प्रश्न डोक्यात घेउनच व्यवसाय-नोकरी-गाडी चालविणे-चहा-सिगरेट-तंबाखू-खान-पान-दागदागिने-रंगरंगोटी-कपडा-वस्त्रप्रावर्ण-घर-संचय-दवाखाने-भविष्य-हस्त-वास्त-पुस्त-तीर्थ-क्षेत्र-जप-पूजा-ग्रंथ-वाचन-शोध-विज्ञान-यंत्र-तंत्र-मंत्र-स्वतंत्र-यज्ञ-हवन-होम-सर्वत्र-आप्त-इष्ट-नाते-श्राद्ध-पक्ष-सारीकडेच प्रश्न घेऊन सर्वजण हिंडत असल्याचे आपण पाहत आहोत. प्रश्न घेऊन हिंडत आहेत..पण सुटत मात्र नाहीत. कारण कुणाचाच तो कधीच सुटल्याचा अनुभवच नाही. नी ज्याचा सुटलाच नाही त्यानेच दुसरा वाढवला. दुसऱ्याचाही वाढविला. निर्माण केला. नी अधिक गुंता त्यामुळे झाला. गुंत्यात गुंता-गुंत्याचा गुंता. नी हरवले काय आपणा सर्वांचे? केवळ पृथ्वीवरीलच नव्हे तर त्रिभुवनातील साऱ्यांचेच, हरवले काय तर..मूळसूत्र-मूळधागा-मूळ टोक-मुळारंभ-मूळग्रंथी-मूळगाठ-मूळहेतू-मूळ 'ग्रं' च आपला साऱ्यांचा हरवलेला आहे. नी त्याचीच श्रीसमर्थ आपणास आठवण करुन देत आहेत. आपल्याच धाग्याचे, 'ग्रं' चे मूळसूत-

मूळसूत्रच आपल्या हाती देत आहेत. आता गुंता नको. आता गुंतू नका. भजनरहीत रामा सर्वही जन्म गेला । स्वजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला। रघुपती मति माझी आपुलीशी करावी । सकळ त्यजूनि भावे कांस तुझी धरावी ।। हे करुणरस पूर्ण उद्‌गार आता आलेच पाहिजेत ओठी. तरच ती ब्रह्माक्षरे भाग्य लेउन येतील हो आपल्या दारी. परंतु शेवटी-अंती उपयोगाचा नाही हा करुणरस. प्रारंभिच ही करुणता-ही प्रार्थना-ही आर्तता हवी. याकरुणरसातील आर्ततेनेच प्रार्थना पूर्ण होणार आहे. नी ज्याची ही प्रार्थना केली, तोच आपणांस प्राप्त होणार आहे. अध्यात्म हे असे विज्ञानाचेही विज्ञान आहे की 'ते आहे'. ते तेच आहे. तेच ते आहे. तेच तेवढे आहे. तेच तेवढे राहील. तेच तेवढे राखेल. 'धन्य'. या धन्यतेस वर्णण्या वाचा नाही. अध्यात्म हा शोध नाही. ती प्राप्त-उपजतचीच गोष्ट-वस्तू-चीजवस्त आहे. आपले लक्ष नाही म्हणून. आपल्या लक्षात नाही म्हणूनच प्रभूश्रीरामांनी दक्षिणेस ही शक्ती ठेविली. दक्षिणे लक्ष्मणो यस्य. म्हणिजे पहिली कक्षा. आपल्या सर्वांचीच. तीच निर्भय केली श्रीरामे. वामे तु जनकात्मजा-उत्तरदिशा. उत्तरोत्तर वृद्धिंगत होणारी..करणारी..जाणारी दिशा. प्रश्न संपविणारी दिशा. माया जाणिली श्रीमायापतिची. लीला जाणिली श्रीभगवंताची. लिलाविग्रह जाणिला. देह विदेह जाहला. देहबळी देवोनिया साधिले म्यां साधनी । तेणे समाधान मज झाले वो माये ।। हे श्रीश्रीमाउलींचे सांगणे, आपण कुठल्या पद्धतीने घ्यावयाचे? केवळ कानावर पडणारा अभंग म्हणून? त्या अभंगातून जर अभंग-अखंड-परिपूर्ण अशा श्रीज्ञानेश्वरमहाराजांसच घ्यावयास शिकलो तर? ज्यास हे कळले, ज्याने हे जाणिले त्यास काय शिकवावयाचे उरले? पण 'जाणता' हवा. मुलांना शिक्षणाचा कंटाळा-अभ्यासाचा कंटाळा का?आपणही त्या वयातूनच पुढे आलो आहोत नां. आपला त्यावेळचा अनुभव काय? या साऱ्याच्या शोधनाने परस्परांना जे समाधान प्राप्त होईल, जी प्रगती होईल, ती खरी. मग तेथे धाक-अमिषे-प्रलोभने इत्यादींना जागाच उरणार नाही. नाहीतर आता मुलांना, तू अभ्यास केला नां की सायकल घेउन देईन. तू अभ्यास केला नां की मोबाईल देईन. अशी आमिषे दाखववावी लागतात. मग सांगा या

हवेपणावरचा अभ्यास निवृत्ती देईल का?प्रत्येक विषयाच्या दोन दोन शिकवण्या लावूनही गुणांमधे त्याची विशेष वाढ होतांना दिसत नाही. खसखशीच्या दाण्यावर भोपळा ठेवला-काय होईल? काही विचार? म्हणजे जीव केवढा नी त्याचेवर जबाबदारी केवढी. बरे त्यात, त्यास काय समजते, ज्ञात होते, की नुसतेच पाठंपाठ होते. पाठचे नी पोटचे कळले तर वरचा वर्ग नां. शाळेत वर्गात अशा जरा कच्च्या विद्यार्थ्यांकडे पुरेसे लक्ष देता येत नाही म्हणून, श्रीगुरुजी आपुल्या सदनी त्यांस बोलावून त्यांचा अधिक अभ्यास करुन घ्यावयाला लागले. त्याची बुद्धीकक्षा जाणून शिकवाया लागले. नी तेथूनच पुढे शिकवण्या सुरु झाल्या. पण एकूण फलिते काय? मुळात संभ्रम येथेच आहे की निवृत्तीचे शिक्षण द्यावे की प्रवृत्तीचे. वास्तविक हा प्रश्नच नाही हो. कारण निवृत्ती म्हणिजे विरक्ती-वैराग्य-संसारत्याग आदी असे जे आपण समजतो तसे ते नाही. तर निवृत्ती म्हणिजे जन्म-मृत्यू-अहं-गर्व-ताठा-क्रोध-मोह-स्वार्थ-आप-पर विरहीत भावाने दिलेले नी घेतिलेले शिक्षण होय. नी प्रवृत्ती म्हणिजे बघा आता यातून ठरवा आपले आपणच. विरुद्ध टोकच नव्हे का प्रवृत्ती म्हणिजे? बघा कशी परिस्थिती आढळते..नोकरी-धंदा या क्षेत्रात डळमळीत अवस्था. अपयश-भिती-प्रचंड स्पर्धा. सतत चिंता. काहीच मनासारखे होत नाही म्हणून संताप. चिडचिड. स्वतःच्याही अपेक्षा पूर्ण होत नाहीत. करीता येत नाहीत. त्यात इतरांच्याही वाढवून ठेविलेल्या. वाढवून घेतिलेल्या. नी आम्ही दुःखी आहोत. आम्हास काय दुःख आहे हे नाहीच कळायाचे कुणाला, हा डांगोरा पिटून, मनास नैराश्यात ढकलून-रोगास आमंत्रण करुन कायमचे पंगुत्व घ्यायाचे. मग काय म्हणायाचे या परिस्थितीस. नी स्वतःच स्वतःचे वस्त्र जीर्ण करुन घ्यायाचे. मग नुसते गीता वाचून काय हो उपयोग. वासांसि जीर्णानी..हो-ते तर आहेच हो. पण जीर्ण झाल्यावर जर आत्मा हे वस्त्र टाकून देतो, हा क्रम आहे, तर आपण ते वस्त्र जीर्ण होऊ न देणे, हा धर्म कधी ओळखणार?११ चिरंजीव नी २१ इच्छामरणी या पृथ्वीवर आहेत. त्यातील चिरंजीव केले जनी दास दोन्ही, ते म्हणिजे श्रीमहाबलीअंजनीकुमर नी श्रीबिभीषणमहाशय. हे दासपंथातील

श्रीश्रीमन्‌महावीर. या चिरंजिवांचा अभ्यास व्हावयासच हवा. यांचे चिरंजिवित्वाचाही अभ्यास हवाच. बरे इथे तर शास्त्र सांगते की, मूकं करोति वाचालं । पंगुं लङ्घयते गिरिम्‌ ।। त्याचा अनुभव घेणे म्हणिजे खरे ज्ञानार्थी होणे आहे नां. श्रीगजाननमहाराजांचे अन्नार्थी रुपात यापृथ्वीवर अवतरण होणे हे आपण अभ्यासरुपाने कधी घेणार आहोत? अन्नही मागावे लागते, अशी या भारतवर्षाची दैन्यावस्था होण्याचे कारण पृथ्वीवरील आपणच सर्वांनी एकत्रितरित्या शोधावयास नको का? भरतखंड म्हणिजे पृथ्वी. 'भ' 'रत'. भ म्हणिजे होणे. जे जे हवे ते ते होणे. त्या भ वर-जीवबिंदू ठेवला की 'भं' असा उच्चार होतो. हे भं म्हणिजे तारामंडल होय. नक्षत्रे-तारका-ग्रहमालिका-सप्तवासर-वीर्यवान-दीर्घायुषी-पुनितपावनमहात्मा, ही सारी आयुधे आहेत. परंतु अयोध्यांची आयुधे. येथे युद्ध-रणांगण असे काहीही नाही. तर येथे जिंकलेले आहे. सारेच जिंकलेले. स्वतःसह सारेच. अशी ही अयुद्धांची आयुधे होत. नी अशा या आनंदात निमग्न असणारा 'तो', म्हणिजे पृथ्वीवरील जीव. कसा आहे तो जीव? तर 'भ' रत आहे. केवळ भरतखंड नाही म्हणावयाचे. नाहीतर काही वेगळेच वाटायाचे नी भांडण लागायाचे. कशावरुनही भांडायाला फार आवडते आपल्याला. 'भांड' यास 'ण' कधीच लागू नये. ण लागावा तर फक्त 'ग' या अक्षरासच लागावा. 'गण' हे अक्षर ज्या अधिक्याचे-अधिपत्याचे-अधिकाराचे, त्याच 'ग ङ' या अक्षराचा उच्चार श्रीश्रीगजानन महाराजांनी आपल्या प्रगटलिलेत प्रथम या पृथ्वीवर केला. पहिला श्रीउच्चार-'ङ'. किती महान असेल याचा अर्थ. तो अर्थ अभ्यासूच आपण. पुढे येणारच आहे ते आपणास अभ्यासावयास. पण आपला हा कठीण स्वभाव शांत झाला पाहीजे. जाणून शांत झाला पाहिजे. खवळून नव्हे. हे विश्वचि माझे घर याभावनेत कुठे आहे भांडण? श्रीरामकर्ता म्हणिता पावसी यश-कीर्ती-प्रताप. इथे कुठे भांडायाला जागा आहे? नी हे स्वीकारायाचे नाहीच मुळी, हे आहेच. त्यातं मिसळायाचे आहे आपण. केवढा मोठा मिसळणीचा घडा आहे हा आपल्याजवळ. श्रीआपोनारायणु तत्वाचे वहन करणारी. म्हणिजेच पाणीवहन करणारी श्रीसरिता-नदी, ज्यावर आपले जन्मभर

पोषण होते. अशी ती सरिताही नंतर शांतपणे श्रीसमुद्रात मिसळते. पंचमहाभूतेही एकमेकांत मिसळतात. यात हे, त्यात ते सारी मिसळणे आहेत. श्रीसमर्थांनी ते सांगितलेलेच आहे, कशात काय मिसळणार आहे ते. आपण त्यास प्रलय म्हणतो नी उगाच घाबरत बसतो. परंतु ज्ञानमार्गाने अवलोकील्यास त्यात घाबरण्यासारीखे काहीच नाही. ते आपण पुढे बघणारच आहोत. बीज मातीत मिसळते. माती अंकुरात-अंकुर वृक्षात. सारी मिसळणच तर आहे ही. मग जीवानेच का पृथक राहावयाचे. नी पृथकपणानेच-पृथकपणाचेच तर दुःख आहे. पृथेत पृथकता नाही. मग त्यावरील जीवात तरी ती का असावी? असावी का? का? आपण साऱ्यांनीच एकत्र येणे-होणे-मिळणे-समजून घेणे गरजेचे आहे. ही गरज-ही आवश्यकता उमजली की ज्ञान झालेच. जीवापासून अगम्य-अशोध्य राहिल असे वेगळे दुसरे काहीच नाही या पृथेवर. श्रीराम भक्तमूळ रे । प्रसन्न सानुकुळ रे । समर्थ तो तया गुणे । समस्त होय ठेंगणे।। श्रीराम उच्चारीताच हृदये कशी विशेष फुलारतात. श्रीराम अवतारातीलच केवळ प्रभूराम, असे एका अवतारापुरतेच सूत्र नव्हे हे. नाहीच हे. फार वेगळे आहे हे श्रीरामसूत्र. श्रीहनुमत्कृपेच ते उलगडेल. येऱ्हवी ना. नाहीचि. श्रीमद् हनुमान किलकं..तयांचे जवळ साऱ्या किल्लया-सारी कपाटे. 'श्रीरामराय' हे एक अत्यंत सुंदर-आपले प्रत्येक जीवाचे-जीवांशाचे-पिंडांशांचे-कर्मांशांचे-ज्ञानांशांचे-गर्भांशांचे-बीजांशांचे चैतन्यस्थान आहे. ते 'शतकोटी प्रविस्तरं' असे बीज आहे. शोध पूर्ण केला-झाला, तर कोणाचाच कोणाशी वाद नाही. तुटे वाद संवाद तो हितकारी. हितकारक असा आपला आपल्याशी व आपला इतरांशी संवाद करुन-संवाद घडवून देण्याची तर कला-विद्या-गुण श्रीसमर्थ आपणांस या ग्रंथराजातून देत आहेत. तसे घडवित आहेत. तेच तर शिकवित आहेत नां. 'ग्रं' पासूनच सर्वांची उपपत्ती. कुण्या एकाची नाही. तर समग्र सृष्टीचीच. अनंतकोटी ब्रह्मांडाची देखील उपपत्ती या ग्रं पासूनच आहे. आपण सारे 'ग्रं बिजी' आहोत. थोडे आपले वाद-तर्क दूर ठेवून बघा. विस्तार करा. शोधा. की कुणालाच भांडावयाचे नाही. सर्वांनाच शांतता हवी आहे. या पृथ्वीवर येऊन नक्की काय करावे? जीव या

पृथेवरुन जातो म्हणिजे नक्की त्याचे काय होते. तो पुढे कुठे जातो? आपण स्वतःच्या सुरक्षिततेचे कीतिही प्रयत्न केले तरी आपणांस अकस्मात येणाऱ्या मृत्यूला सामोरे जावेच लागते. कर्म म्हणिजे काय? नक्की कशाकशाने आपण बांधलेलो आहोत. याबाबत कीतीही संशोधन करुनही काहीच हाती लागत नसल्याकारणाने आपली ही अज्ञानाने परस्परांतच, चाललेली चिडचिड आहे. धर्म-जात-पंथ सारे एकाच अग्राकडे जाणारे आहेत. साऱ्यांच्याच मनाकरीता-साऱ्यांच्याच मनातील, या 'धर्म' संकल्पनेकरीता, खरा धर्म न जाणिताच धर्म म्हणविणाऱ्या आपल्या सर्वांच्याच मनांकरीता, आपण या धर्मास काहीच नाव न देता फक्त 'अग्र' असे म्हणू या. असे आपण सारेच एकुणच या पृथेवरील सारे, त्या अग्राकडेच जाणार आहोत. तो रस्ता एकच आहे. कुठूनही या-कसेही या-कुणीही या. विश्व स्वधर्म एकच आहे. 'शांतिपूर्णतेचा'. ज्यांवर आपले साऱ्यांचेच पोषण होते आहे. म्हणिजे स्वतःस पृथक् काढून भांडणाऱ्या सर्वांचेच पोषण जे श्रीसूर्यदेव करतात-करीत आहेत. ते श्रीसूर्यस्थान तर कोणी नाकारु शकणार आहे का? नी समजा आपण तेही नाकारले तरी त्यांत काय फरक पडणार आहे? पण यांस नाकारुन आपणास कोण स्वीकारेल? या विचारानी जो शोध घडेल नां, तो शोधच समस्त ब्रह्मांड ठेंगणे करील. नी आपणा सर्वांसच उंच करेल-उच्च करेल. व्हायचे नां उंच? वाढवावयाची नां कीर्ती ? या निरुपणाचे मूळ । शोधिलेचि शोधावे प्रांजळ । बुद्धि करोनी विशाळ । सावधान शिष्या।। श्रीतुकाराममहाराजही सांगतात, अणुरणिया थोकडा..तुका आकाशाएवढा. आपण कधी हा एवढा उच्च अनुभव घेणार? कुठल्याच विचारांनी एकत्र यावयाचे नाही. नी नुसतेच धुमसत ठेविल्याने कुणाची शक्ती व्यर्थ जात आहे? खर्च होत आहे-होते आहे?तर त्या 'अग्र' च्या अग्रजांची. त्यांच्या बाळांची. असे कीती दिवस आपण एकत्र असणार आहोत या पृथेवर? ज्याचे त्याचे गंतव्य ठरलेले आहे. ते जन्माबरोबरच निश्चित केलेले असते. १० ११ १२ काय दर्शवितात या संख्या? १० दहा म्हणिजे दशमी. जीवाची विजयादशमी. जीवाने पृथेवर येऊन सोने व्हावे. ज्ञानाचे सोने लुटावे. तो आता ती सम साधिता झाला आहे. समता त्याने

जाणिली आहे. एकास एक असा आता मिळाला आहे. आता तो त्या एकासह एक झाला. तो आता एकाबरोबर एक आला. ११ असा. खरा अ करा झाला. नी आता तो १०+११=२१ असा कळसावर गेला. नी तयाने जननी जन्मभूमिश्च सार्थकी केले. धन्य केले. जीवाने त्याचे बारसे सार्थ करुन बारावे चुकविले. असे हा आपला ग्रं आपणास सांगत आहे. परंतु घडताना वेगळेच घडत आहे. असे का? याचाच अभ्यास होणे आवश्यक आहे. आपण लवकरात लवकर ते अग्र जाणून घ्यावयाला हवे नां. तो एकावर एक ११ अक्रा सर्वांनीच गाठायला नको का?जन्म दो दिसांची वस्ती । कोठे तरी करावी ।। तर मग ती अ करातच करावी. ११ हेच अग्र. १० तून येणारे. ९ नवमीतून उलगडणारे. अष्टमीतून आलेले. सप्तमीत कळलेले. षष्ठीत उकललेले. पंचमीत रंगलेले. चतुर्थीत पूर्ण झालेले. तृतियेने आशिर्वादीलेले. द्वितियेत भेटलेले. १ त गुप्त झालेले असे हे जीवाचे आदेशस्थान आहे. एकादेश-एकादशी. ही उलगड, सर्वांचीच सारखी आहे नां? का धर्म वेगळा म्हणून घडण-आगम-निगम वेगळे आहे? नाही हो. यात आपल्या साऱ्यांचाच फार वेळ चालला आहे. कुणास ठाऊक, जगावयास असे कीतीक्षण आपल्या हातात आहेत ते. आहोत तोवर श्रीश्रीसमर्थांचे हातात हात द्यावा. त्या अग्रात मिळून-मिसळून जावे. निश्चिंत व्हावे. सोपवून द्यावे तयांवर. हेच योग्य नव्हे काय? ब्रिदाकारणे दीन हाती धरावे। म्हणे दास भक्तांसी रे उद्धरावे । सुटे ब्रीद आम्हांसी सांडुनि जाता । रघूनायका मागणे हेचि आता।। थांबून विचार करावयास हवा या अभिनिवेषाचा. वास्तवात-मुळात प्रत्येक पात्र सुपात्र आहे. करायाचे आहे वेगळे, नी करतो आहोत वेगळे. यामुळे समाधान लाभत नाही. नी समाधान नाही म्हणून चिडचिड-राग-संताप-संघर्ष, काय करावे?कोठे जावे? कळत नाही. म्हणून सत्ता-स्पर्धा दुसरे काही नाही. आत डोकावून बघा जरा. अंर्तमुख होउन विचार करा जरा. शोधा जरा स्वतःला. बघा सारे हेच-ऐक्याचेच-शांतिचेच विचार आहेत प्रत्येकाचे तळात. विषयांचे करी ध्यान । त्यास तो संग लागला । संगांतूनि फुटे काम । क्रोध कामात ठेविला । क्रोधातूनि जडे मोह। मोहाने स्मृति लोपली । स्मृतिलोपे बुद्धीनाश। म्हणजे

आत्मानाशचि।। काय करुन घेत आहोत आपण हे. आत्मनाशावर संकट ओढवले तरी निवांत?तरी जाग नाही?पार्थिव की चैतन्य? कान्होबा तुझी घोंगडी चांगली..त्या घोंगडीचेच-त्या चांगभल्याचेच-त्या चांगल्याचेच आपण सारे वारसदार आहोत. या जाणिवेच्या जवळ येण्याकरीता या साऱ्यातून हीतकारक तेवढेच घ्यावे. अंतरी आवडेल तेवढेच घ्यावे. नी ते घेता घेता कळेल, अहीत कुणीच करणार नाही. आपणही होऊ देणार नाही. फक्त मधेच काही गोष्टी साचल्या, नी त्याच तेवढ्या स्वच्छ करावयाच्या राहिल्या एवढेच. इथेच सर्वांनी 'भ' रत, अशा सर्वांनी एकत्र येऊन विचार-शोध करणे गरजेचे आहे. पृथ्वी जर प्रलयाने नष्ट होणार आहे, तर ते तसे होउ न देण्याची जबाबदारी कुणाची? आपली श्रीपृथ्वी-श्रीमाता वाचविण्यासाठी आपण आपल्यातील 'व राह' शक्ती खेचून नाही का आणू शकणार? शोध हवा नां करायला त्या शक्तीचा? नी ती शक्ती हे असे आपापसातच भांडून नष्ट करण्यापेक्षा, तिस साठवून-मैत्र करुन श्रीपृथामातेस प्रलयांकीत होण्यापासून आपण पृथ्वीपुत्र तियेस वाचवू नाही का शकणार? हे सारे मंथन कुठल्या अरणींवर करावयाचे तर, आपल्यामध्येच तो उभा आहे नां, बळे आगळा राम कोदंडधारी। पुढे देखता काळ पोटी थरारी ।। ठकारे पर्वता ऐसा । नेटका सडपातळू ।। असे ते ठाणे-असे ते स्थान. या सर्व बाजूंनी हे सारे आपले जाणणे घडायाला हवे. या धवलवस्त्राची घडी, घडीने घडी काळ घालित आला आहे. घालित येत आहे. केव्हा वस्त्राची तो पूर्णच घडी घालील ते त्यासच माहीत. आपले जीवनवस्त्र बघा कसे आहे ते..वेळ-संधीच्या या काठांवर-सौभाग्यवृष्टीचा मयूर पदरावर-बुट्ट्यांची ग्रहमंडले मध्यावर-अशी ही चंद्रकला हे आपले वस्त्र आहे. असे हे महावस्त्र, काळास द्यावयाचे? त्याचे भक्ष्यस्थानी घालावयाचे?नाही नाही, काळ ही घडी घालण्यापूर्वीच, आपणांस शोध घ्यायलाच हवा की, हे महावस्त्र पांघरले कुणी. घातिले कुणी, शोधिलेची पाहिजे. जाणिलेची पाहिजे. निदान आपण 'ते' नाही. केवळ काळाच्या भक्षस्थानी पडणारे नाही, एवढी तरी ओळख आपली आपणांस व्हावयास हवीच. ३६५ दिवसांचा वर्षाकाल तर सर्वत्रांस सारखाच आहे. समानचि

आहे. पण त्यातील १ दिवस काळा येतो. बाकी सारे धवल आहेति. धवलारी-धवल असे. हेही सर्वत्रांस सारीखेचि आहेत. एकच दिवस नी तोही केवढा'काळा', किती काळा..कसा काळा तर तिळाएवढा ० एवढाच. एवढासाच काळा. हा सारा अभ्यास-याचाच अभ्यास व्हावयास हवा. काळा-पांढरा एवढेच रंग अभ्यासायला हवेत खूप. छटा-केसरी हे मूळ. कपिध्वज हे कुळ असे. आठवे संकष्ट महाकठीण आहे हे. अनंतजन्मींचे विस्मरण, ज्या चैतन्याने स्मरणार आहे-आठवणार आहे, **ते चैतन्य म्हणिजेच श्रीराम. तो धागा ते सूत्र म्हणिजेच श्रीरामदास-श्रीगजानन-हनुमंतों महामुने-महासिद्धाय अद्‌भूते रामदासाय वरिष्ठाय गजाननाय नमोस्तुते ||** आठवेच कष्ट अधिक आहेत. आठव्यातच कष्ट अधिक आहेत. आठव्यात जर जीवाचा जन्म झाला तर मृत्यू ओढवतो. आठवा-आठ वा-आठवा अवतार आठवा-अष्टविनायकांस स्मरा. बघा ८ ही सम संख्या आहे. ती सारे समच करील जीव नी भगवंत ऐक्य करील.

**..नवम संकष्ट - संव्यष्ठ..**

आता नववे संकष्ट पाहूया. श्रीसमर्थ आपणांस 'यत्न' या विभागाजवळ नेणारच आहेत. आपल्याला जर आपला ग्रंथ वाचायाचा आहे तर शक्ती हवीच नां. तीच शक्ती मिळविण्याकरीता केलेले यत्न म्हणजे संव्यष्ठ होय. संव्यष्ठ म्हणिजे सारथी. तो सव्यपाणी-शूलपाणी न जाणिल्याने, नी स्वतःस स्वतःचा संस्थापक समजल्याने, जे कर्म घडते नी त्या फलद्रुप जे कष्ट-दुःख-आपत्ती भोगावी लागते ते हे कष्ट-सं व्यष्ठ होत. कशामुळे हे भोगावे लागतात? तर आपल्यालाच आपले सारथ्य करीता आले नाही म्हणून. आता सारथ्य काय-कसे? तर सारथ्य म्हणिजे रथ आलाच. नी रथ म्हणिजे सारे ऐश्वर्य प्राप्त आहेच आपणांस याची खूणच ही. रथ आला म्हणिजे अश्व आलेच. ते किती? याचा विचार मात्र हवा. आता हा विचार कसा करावा? तर बघा-श्रीसूर्यदेव आपले पालक. त्यांचा सप्ताश्वरथ आहे. म्हणिजेच श्रीसूर्यदवांच्या रथास सातअश्व आहेत. पंचमहाभूंताच्या रथास पंचाश्व आहेत. तर आपला तृतियाश्व रथ आहे. म्हणिजेच ३ अश्वांचा रथ आहे आपला. बरे सारथ्य करणारा म्हणिजेच

समेट जाणणारा हवाच. कुणाशी समेट, तर अश्वांसी. त्यांच्या गतिसी समेट करणारा. जुळवून घेणारा. जाणता हवा. नी रथी कोण बैसिले आहे, तर रथी 'नर' असा तो अर्जुन-पार्थ बैसिला आहे. कसा आहे हा नर, तर सतत लढवय्याही नाही. नी सतत लढणाराही नाही. तर तो जिज्ञासू आहे. आप्त-इष्ट साऱ्यांशी घनिष्ठ संबध असतांनाही हे युधिष्ठ का झाले? असे काय विशिष्ठ घडले की हे रणांगण घडले? हेच घडायाचे होते. मारावे, कर्तव्यकर्म करावे, तर मग फलित काय? ऐन युद्धाचे क्षणी ज्यांचेशी लढायाचे तेच जर हवेसे वाटले-त्यांस पाहून जर वैराग्य जवळचे वाटले. त्याग आपलासा वाटला. नी ऐन रणांगणावर शत्रुत्वाचा 'समेट' व्हावा ऐसे वाटले. शत्रुत्वच संपावे-विरावे-न रहावे असे वळण त्या प्रसंगानी घ्यावे, असे वाटणे म्हणिजे, सारथ्य केवढे प्रभावशाली आहे बघा. नाहीतर आगीत तेल टाकणे सर्वांनाच जमते हो. आग भडकवून देणे सर्वांनाच जमते. पण म्हणून काही त्यास यज्ञ संबोधिले जात नाही. तर त्यास विध्वंस म्हणतात. नी विध्वंसानी का कुणास आनंद? नकोच हे काही. म्हणूनच तर ते सारथ्य जमावे. सारथ्य म्हणिजे प्रत्यक्ष लढाई नाहीच. सारथ्य म्हणिजे 'ग'. नी ग म्हणिजे प्रारंभ-ज्ञानारंभ. पुन्हा ग आला. गीता म्हणिजेच सारथ्य. गीता म्हणिजेच श्रीईश्वर गुणवर्णन. नी ते श्रीईश्वरानेच केले म्हणूनी विशेष ठरले. श्रीगीतेसारीखे असे शांतिप्रदेश जाणणारे सारथ्य आपण जर केले नाही, तर हे कष्ट जीवास पडतात. सारथ्य करु शकलो तर यश. मग तो पांचजन्य फुंकायला मिळेल. अश्वांची गति-त्यांचे रंग-त्यांच्यातील शुभलक्षणे-त्यांची धाव-त्यांची झेप-त्याची तहान-भूक, सारे ठावकी पाहिजे मात्र सारथ्याला. नुसतीच श्रीगीता, नुसतेच श्रीमहाभारत नाही वाचावयाचे, तर आपण त्याचे अभ्यासी व्हावयास हवे आहे. या साऱ्या श्रीपरमेश्वरी लीला आहेत. त्या लीला हीच आपली उघड उघड पुस्तके आहेत. केवळ पाठ्यपुस्तके नव्हेत तर आद्यग्रंथ आहेत हे. स्पष्ट धडे आहेत हे. आपले घडे हे पूर्णज्ञानानी भरुन जातील असे हे धडे होत. वाचले-अभ्यासिले पाहिजेत. नी-वाचन हवेच. 'प्रसंगी' असे विशेषण लावून श्रीसमर्थ सांगत आहेत, प्रसंगी अखंडीत वाचित जावे. आता हे अखंड वाचन झाले की,

त्याच बरोबरीने अखंड अभ्यासही आपला आपल्यालाच करायला हवा. आपण अखंडनी अभ्यासही अखंड. तो अभ्यासीही अखंड. ज्याचा करावयाचा अभ्यास तोही अखंड. नी अशा या अखंड सूत्रामधून या लीलावतारांमधून ती अखंडता घेता आली नाही, तर व्यर्थ नां. श्रीमहाभारतानी सांगितले, की हे ऐसे करु नका. नी नेमके त्या 'नकाच्याच' बाजूने आपण गेलो. नको तेच आवडायाला लागले की झाले, उधळले अश्व रथाचे. मग सारथ्य आटोपलेच. अश्वांची विश्रांती-त्यांचे खाद्य-त्यांचे पाणी-त्यांचा खरारा-त्यांचा निवास-संवाद सारे कळायाला पाहिजे सारथ्यास. बरे अश्व हा प्राणी असा की, तो कधीच खाली बसत नाही. सतत म्हणजे जन्मापासून ते गंतव्यापर्यंत उभेच असतात हे. जर रथाचे अश्व, हे असे सतत उभे असतात. उभे राहणे शिकतात. तेवढी ताकद ते घेतात. त्यांच्यात ती आहे. ती ते जाणतातही. तर सारथी?कसा हवा तो?कसा असावयास हवा सारथी?परंतु हे श्रीअश्व ही सारी तेजस्विता कोणाकडून शिकत असतील हो? कोणाकडून घेत असतील हे शिक्षण? कोण त्यांचा आदर्श असेल? तर त्यांचा आदर्श निश्चितच हा सारथी आहे. सारथीच जर अखंड जागा आहे. जागृत आहे. सतत उभा आहे. जसे युगे २८-अखंड उभा. हाच तो त्यांचा आर्दश. त्यांना उमजतात ही युगप्रवर्तक लक्षणे. २८ युगे त्यांचा आदर्श जर उभा आहे तर अश्वही तसेच-तेवढेच आर्दश. या साऱ्या जाणिवेच्या गोष्टी आहेत. बरे जो रथावर आहे-ज्याचे सारथ्य आपण करायचे आहे, तो नर आहे. नी हा नर कसा आहे? तर जो लेचापेचा नाही. कमकुवत नाही. सर्वविद्या जाणणारा-हुशार-चतुर-विद्वान नी सखा असा हा नर आहे. नर नी नारायण, एकच अवतार आहेत. 'सखा' अवतार. म्हणिजे काय तर, परस्परातील शत्रुत्व-भांडण-वाद-संघर्ष आटोपलचे म्हणायाचे नां. पण अनुभव असा की, मन नावाची विभूती काही जीवास दम घेऊ देत नाही. काही सुचू देत नाही. सततच्या विचारांनी मस्तक क्षणभरही मूळ जागेवर राहात नाही. या साऱ्यानी बुद्धीवर आघात होतो नी बुद्धीची झेप आखडते. नी मग आखूडपल्ल्याचे हे अश्व दीर्घयशयात्रेसाठी उपयोगी नाहीत-नसतात. सतत रथ अडवून-अश्वांची गति रोखून टाकणारे अडथळे,

सारथ्यास दूर करीता आले पाहिजेत. बघा, विचार-चिंता-काळजी या सतत मस्तक बधीर करणाऱ्या गोष्टी, अशा काय गतिच्या आहेत? पण त्याही जर आपली ही गती-हा मनोवेग रोधू शकतात, तर त्यातून सुटण्याचा नी पुढे पुढेच जाण्याचा अभ्यास हवाच नां. या विचार-चिंतांना मुळात गतिच नसते. ही सारी साचणारी डबकी आहेत. विचार-चिंता हे जर पुढे जात असते तर काही सुचले तरी असते हो जीवास. पण जर हे सुचूच देत नाहीत, तर ते साचून नासवतात, हेच खरे ना? नी कुणास नासवितात तर, झेपाविणाऱ्या-अतितीव्र नी अखंड गतिशील अशा मेधाश्वाला नासवितात. आता आपणांस आपले मूळस्वरुप स्मरावेच लागेल. अश्व नी पार्थ हे पूर्णपुरुष आहेत. नी पुरुषोत्तम असे श्रीभगवानश्रीकृष्णस्वरुप. अशा या साऱ्या दिव्यशलाकांनी मंडीत असे आपले स्वरुप आहे. आता सारथ्य कसे व्हावे-कसे हवे नी कसे ते आहे हे बघायास हवेच हवे. आता हे सारथ्य जरा आपण सामान्यपातळीवर अगोदर बघू या, म्हणिजे रोजच्या दैनंदिनीतील एक उदाहरण घेउ, समजा पतिदेवांना पोहे खावेसे वाटले. त्यांनी पत्नीस तसे सांगितले. बाई गं पोहे करतेस कां? आता इथे सारथ्य कोणाकडे गेले ?तर पत्नीकडे. तिने जर पोहे धुंडाळले नी ते पुरेसे नाहीत हे तिस कळले. नी ती म्हणाली की पोहे संपलेत. दुसरे काही करुन देऊ, की चहाच टाकू? तर अश्व उधळले समजायाचे. सारथ्य जमलेच नाही. आता यात गृहिणी म्हणून तिने कसे सारथ्य करावयास हवे, तेही पाहू या-सारथ्य म्हणजे काय, तर गृहिणीने त्याच पोह्यात थोडा कांदा-खोबरे-कोथिंबीर-बटाटे-टोमॅटो-वाटाणे-शेंगदाणे यांची भर घालून आपल्या पतिस पुरतील असे ते तयार करुन देणे हे त्या प्रसंगीचे गृहीणीचे-पत्नीचे तीने केलेले संसार रथाचे यशस्वी सारथ्य होय. पोहे नाहीत-संपलेत-आताच काय मधेच पोहे हवेत तुम्हाला? ही अशी उत्तरे, समर्पक नाहीत. ही अशी उत्तरे सारथ्य करु शकत नाहीत. नी परिणामी दोघांचेही अश्व उधळतात. नी भांडणात समाप्ती होते. प्रसंगानुरुप जे ज्ञान हवे ते इथे नाही. अर्थात इथे हे खूपच सामान्य उदाहरण आपण घेतले. परंतु कळावयास तेच योग्यही आहे. इथे जर बुद्धीचे सारथ्य-प्रेम करीत असेल तर हे, जे

वर सांगितले ते 'सुचेल'. आता दुसरे उदाहरण पाहू या-तसेच समजा पत्नी म्हणाली-अहो, हा जराही अभ्यास करीत नाही. सांगा बरे जरा त्याला काही. आता इथे जर पति म्हणाले, मग तू काय करतेस दिवसभर? तुझे लक्ष कुठे आहे? तुच लाडावून ठेवले आहेस, झाले, उधळले अश्व. आटोपले, सारथ्य आटोपले. पण येथे जर बुद्धीचे सारथ्य पित्याकडे असेल, पिता ते करीत असेल, तर तो पत्नीमुळे पितृत्वस्थानी आहे, हे त्याने जाणिले पाहिजे. तद्वत त्याने पत्नीच्या त्या भविष्यसूचक सुचनेकडे लक्ष देऊन, तिने तीस जमले नाही म्हणून पतिस सांगितलेले नाही. प्रयत्न करुनही मूलाने ऐकले नाही, म्हणूनही पतिस सांगितलेले नाही. प्रयत्न न करताही पतिस सांगितलेले नाही. तर अगोदर तिनेच प्रयत्न केले त्यास समजाविण्याचे. ते पुरेसे ठरले नाहीत. म्हणून तीने पतिस विनविले. एवढे जाणून, तियेच्या पतिने जर पुत्रास जवळ करुन, समस्या पूर्ति करुन. त्यास कुठलेही आमिष न दाखविता. धाक न घालिता. अभ्यासाचे महत्व नी तो न करण्याचे तोटे-नुकसान समजावून सांगितले, की झाले. रणांगण आटोपलेच. नी रणांगण आटोपणारेच-आटोपविणारेच सारथ्य हवे आहे. असेच थोडक्यात यातून आपणा सर्वांना घ्यावयाचे आहे. बघावयाचे आहे. असे हे सारथ्य, सर्वत्र-नी सर्व बाबींमधे आपणांस नित्य, क्षणोक्षणी करावयाचे आहे. तेव्हा विचार करा की कीती थकत असतील आपले अश्व. नी थकलेल्या अश्वांना कधी विश्रांतिस्थळी न्यावयाचे आपण. त्यांना स्वच्छ करायाचे-दाणा-पाणी घालायाचे. श्रीकृष्णांना स्वामिनिष्ठ सेवकाचे म्हणिजेच अश्वांचे साន्निध्य आवडले. पण सख्याबरोबर म्हणिजेच श्रीअर्जुनांबरोबर युद्ध करणे श्रीभगवंतांनी नाकारले. यापद्धतीने याबाजूने आपणांस या गीताग्रंथात, या 'ग्रं' मधे नाही का उतरता यावयाचे? का नाही उतरता येणार? आलेच पाहिजे. मामेकं शरणं व्रज ।। मग काय, तुझे प्रश्न कुठेच कोणी सोडविले नाहीत. तुला उत्तरेच मिळाली नाहीत. तर तू ते सारे सोडून मला शरण ये. कारण माझ्याजवळ प्रश्नच नाहीत. किती विलक्षण आहे हा ग्रं बघा. श्रीसमर्थ कुठून कसे तो उलगडवित आहेत. हे सारे पाहून-वाचून-ऐकून निश्चितच आपला 'या',वस्त्राविषयीचा आदरभाव

वाढला असणार. त्या वस्त्राविषयी पुज्य-नम्र-शिव-भाव जागा झाल्याचा अनुभव आपण अनुभवित असू. किती सुंदर आहे आपला ग्रंथ. आपण व्यर्थ केवळ कथा ऐकील्या. त्या कथेतून-त्या कथेचा धागा आपल्या कथेशी नेऊन, वास्तविक व्यथा नसलेल्या पृथेशी जोडून, नवीन प्रथा-पायंडा आपण पाडू शकतो हे आपण जाणिलेच नाही. कळलेच नाही आपल्याला. श्रीसमर्थ तेच सुत्र जोडून देत आहेत. बघा कुठे आपण आहोत, नी कुठे आपण आपणांस समजत आहोत. कुठे इंद्राचा ऐरावत नी कुठे शामभट्टाची तट्टाणी, असे येथे म्हणता येणार नाही. कारण हे उदाहरण फारच साधे होईल. म्हणून असे म्हणूया-छत्रसिंहासनी आयोध्येचा राजा। नांदतसे माझा मायबाप ।। असेच म्हणावे लागेल. कारण कोणत्या छत्राखाली आपले सिंहासन सुरक्षित राहिल, तर श्रीरामरायांच्या छत्राखाली. 'भ'रत-भरतांनी रक्षिलेल्या-सेवकधर्म-दासधर्म जाणिलेल्या अशा या भरतभूमिवर आपण दासच-रामदासच. दूध ते तूप, या संपूर्ण परिक्रमेत कोण सारथी-कोण अश्व-कोण पार्थ याचा अभ्यास करणार कोण? रोज दुधा-तुपाचा फक्त खाण्याशी संबंध. पण पूर्णब्रह्मास-त्या ब्रह्मरसास घेऊन येणाऱ्या त्या शितांशी संवादिणार कोण? **श्रीगजाननमहाराज उष्ट्या पत्रावळासन्निधच प्रगट झाले. अनंतकोटी ब्रह्मांडनायक या पृथ्वीवर प्रथम कोणाशी बोलले तर उष्ट्याशितांशी. अभ्यास व्हावयासच हवा या भूमिकेचा.** खाणाऱ्याशी-जेवणाऱ्याशी नाही बोलले श्री. आपण समजतो फक्त मानवालाच बोलता येते. परंतु शितही बोलत असेल-अन्नही बोलत असेल, हे नाही आपण जाणिले. हे फक्त तोच जाणू जाणे, ज्याने त्यास घडविले. **ज्याने हे विश्व निर्मिले. त्या शिताशी श्रींचा तो संवाद ते समयी कसा झाला बघा-**

कोणी रे त्यजिले बाळा तुला..सांग रे शित मुखा तू मला..
अर्थरस तव नसे जाणिला..नुमजताच घेतिलेसे ग्रासा
जैसा का..काळाने घ्यावा..कोणी रे त्यजिले बाळा तुला..
गोड पक्व तू मधु मधुरसा..नाभिसुरस वैष्णवगायका
मति भंगली ग्रासचि घेता..कोणी रे त्यजिले बाळा तुला..

मिळून जासि पात्री लागता..घास घेई गा वदसि ऐसा
ऐका ग्रासी देसी तृप्तता..जाणिले ना परि तुवा..कोणी रे..
वैराग्याची तुजसि प्रतिक्षा..पूर्ण होसी पुरे जी म्हणता
धन्य बाळा ब्रह्मरसाचा..स्वादु तू घेतिला..कोणी रे..
प्रेम नव्हे हे तुजवरी बाळा..भुलली स्वारी आमंत्रणाला
जे जे आवडी ते ते भक्षी..सारुनी तुज बाजूला..कोणी रे..
आपबंधु तव दुःख जाणिता..घोटासंगे तुज कोमलता
आग्रहाने रे केले घाता..राखिले बाजूला तुजला..कोणी रे..
येई बाळा येई येई..साद घालिते तुला माऊली
हृदय तुझे रे प्राण तियेचा..येई स्वरुपी निजधामा..कोणी रे..
मुखी लागला तू श्रीहरीच्या..तैसा आणिक राम बदरीला
भक्षूनी तुजसी भक्ती नवविधा..तृप्ती जी भक्ताला..कोणी रे..
शोध शोध तू ऐशा श्रीमुखा..ज्याने जाणिले अभयांतरता
रामदास हा तुझा विनविता..लागी राम मुखा..कोणी रे..
बाळा तो न त्यजि तुजला..बाळा अनुभव हा मम मुखा
लागि बाळा त्याचे रे मुखा..श्रीराम रामदास बाळा
तो ना त्यजि रे बाळा तुला..

घ्या घ्या घ्या..श्रीसमर्थ घास भरवित आहेत आपल्याला. घ्या पटापटा. उघडा श्रीमुखा झटपटा. परंतु त्यापुर्वी या श्रीघासाची भूक लागू द्या. नी हा ग्रं म्हणिजेच आपले मुख. ते श्रीमुख उघडा नी घ्या, पोटभर होउ दे उदरभरण. जागू दे अंर्तयाम. नी हा ग्रं..च जर त्या घासाचा भुकेला असेल तर? या ग्रं लाच जर त्याघासाची भूक लागली तर..? तर मग अश्वांना येथेच विश्रांती लाभेल. या श्रीचरणांजवळच. येथिलेच पाणी पिउ द्या त्यांना. बघा एवढ्याश्या शिताशी जर एवढा संवाद होत असेल तर आपल्याशी..जीवांशी..?त्या शिता-शितांची मुद करणाऱ्याशी? पण अजून आपल्याला मुदीचा 'मोदक कर्ता' नाही आलेला. नी अजून आपण त्या मोदकाचे कर्ते का नाही होऊ शकलो तर, आपण अजून तो ब्रह्मरस चाखलाच आहे कुठे? आपण तर नुसतेच खातो आहोत. भूक भागविणे,

एवढाच आपल्या लेखी उल्लेख अन्नाचा. परंतु ज्या शिताशी श्रींचा संवाद झाला. त्याच शिताने श्रींशीही ते समयी संवाद केला. **श्रीमहाराजांचे कृपेकरुन ते समयिचा तो गुप्त संवाद-तो शब्देविण संवादु..असा संवाद, आज आपणांस श्रीकृपेकरुन उमगत आहे. याचा नित्य लाभ करुन घेतिला पाहिजे.** नित्य यातून आपले जाणतेपण आपण वाढविले पाहिजे. यावरुन एवढा तरी बोध जीवाने घ्यावा, की पात्री काही टाकू नये. कसा झाला तो संवाद, बघूया. यातून आपणही नित्य तो ज्ञानरस सेवन करावा-

माऊली घेई मजला हृदया..विनविते अन्नब्रह्म या पदां..
हीच आस या मना..सेवि नित रे ज्ञानधामा
ज्ञानियांचे बाळ आई मी..सांभाळी तव लेकरा..माऊली घेई..
त्या पात्रातूनि उठोनि आलो..अन्नार्थी मी तुवा भेटलो
श्रीमुख तव हे मम भाग्याला..उरली नाही सीमा..माऊली घेई..
वैराग्याच्या या यात्रस्था..भेटविला तू शम दम हर्ता
प्रभुरामा मज प्रभुरामाविण..अन्य मुखा ना धाडा..माऊली घेई..
यज्ञ कर्म ते मुळी न जाणिता..केवळ रस रुचि स्वादु घेता
कैसे पावतिल यातील ब्रह्मा..दुखावले अंतर बा ताता..माऊली..
होते ठाऊक हृदयासी या..कोण आहे तो मजसि जाणता
जाणत्याचे पायी लागता..धन्य केले मी कुला..माऊली घेई..
अहो स्वामीया रामदासा..कपिवरा हो ङणङण कर्त्या
माघवद्यासी भर माध्यान्ही..हरीली आपुली क्षुधा..माऊली घेई..
जे जे आपुणा करणे साचे..ते ते या बिजी ओथंबविले
पूर्णब्रह्माने परब्रह्माची..केली पूर्ण सेवा..माऊली घेई मजला हृदया..

एवढा विचार आहे का आपला? एवढा भाव आहे का आपला या श्रीअन्नब्रह्माबाबत? जेव्हा आपण उदरभरण नोहे..जाणिजे यज्ञकर्म, हे जाणू, तेव्हाच ते शितही स्वतःस धन्य समजेल. नी तो शितकर्ताही संतोषेल. नी तेव्हाच तो शितभोक्ता पूर्ण होईल. नी मग अशा पूर्णास मग 'मोदक कर्ता' म्हणता येईल. या शिताचा मानस बघा काय आहे तो. अजून

आपल्याला मुदीचा मोदक कर्ता नाही आलेला. मुदीचा मोदक करणे म्हणिजेच पिंडाचे ब्रह्मांड करणे होय. फार मोठा अभ्यास आहे यात. तो जाणित नाही म्हणून तर हे कष्ट पडतात. म्हणून अश्वांना त्या मोदकस्थली विश्रांती द्या. की जेथे गोडवा कळला आहे. ज्यांस गोडवा कळला आहे. ज्यांनी गोडवा जाणिला आहे. श्रीसमर्थ..श्रीसमर्थ..जय जय स्वामीन् श्रीसमर्थ..श्रीरामसमर्थ. हाच आपला मंत्रघोष-नामघोष-जयघोष-ब्रह्मघोष-विनयघोष-दीर्घघोष-आत्मघोष-परमात्मघोष-शिवघोष नी हीच आपली दुदुंभी. खरेच श्रीसमर्थांचे चरणी विनंती करुया-प्रार्थूया..हे श्रीरामसमर्था, सारथी आपणची व्हा. अश्वस्वरुपी जीवासी धरा. पार्थ करवा विवेकासी. द्यावा चारा ज्ञानाचा अमुसी. श्रीसमर्थ वदति..

विवेकअश्व हा प्रिय आम्हांसी..प्रथमतः तर तोचि रथासी..
दुजा विरक्ती..तिजा वैराग्य..चतुर्थ जाण बा धनआरोग्य..
पंच अश्व हा शक्तिशाली..षष्ठ परिपूर्ण चातुर्य..
सप्त अश्व हा निस्पृहतेचा..अष्ट तो चैतन्याश्व..
नवम तो मेधाश्व..रथ हा पूर्ण सेवक
रामरथ हा नवमाश्वांचा.. सारथ्य करी कपिध्वज त्यांचा..
रामपादुका पार्थ..छत्रमंडीत रिपुदमन हा..ध्वजांकीत सौमित्र..
कौसल्या जाण गा भूमी याचि..दशरथ स्वानंदस्थली..
जानकीजीवन सच्चिदानंदी..रथ हा रामदास हाकी..

काय हवे आणिक? यापरते ते काय हवे आणिक आपल्याला. काही नको. या पलीकडे काहीकाही असूच शकत नाही. आम्हा अनाथा तू एक दाता। संसारचिंता चुकवी समर्था । दासा मनी आठव वीसरेनां । तुजवीण रामा मज कंठवेना. हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ।। आठव..आठव..आठव. नवव्यातच सारथिची आवश्यकता आहे उमज.

..दशम संकष्ट - संस्कध..

आता दशम कष्ट. दशम स्थानाचे कष्ट. दशम स्थानातील कष्ट. संकष्टातील दशमस्थान. संस्कंध-स्कंध म्हणजे खांदे. झाडाचा बुंधा किंवा आधार म्हणूया. कशाचाही आधार. कुणाचाही आधार. कुणीही घेतिलेला.

कुणासी दिलेला. कुणाचा कुणी घेतिलेला व कुणाचा कुणी मानिलेला, या अशा आधारभावनेशी प्रतारणा अथवा विश्वासघात केला, या भावनेचा विश्वासघात झाला की हे कष्ट पडतात. आपणांस याचा त्रास नाही जाणून घ्यावयाचा. म्हणिजे बघा-कुणाला काही व्याधी झाली, की ती कशी झाली-रोग कसा बळावला-त्याचे वर्णन करावयास त्यांना फार आवडते. संकटे कशी आली. आम्ही कसे पार पडलो. समस्या कशा आल्या. आपण त्यातून कसे पार झालो, इत्यादीचेही फार फार चविष्ट चर्वण करायाला आवडते. सत्संगावर-देवाविषयी-एखाद्या ग्रंथाविषयी नाही बोलता यायचे. एवढे या फाफटपसाऱ्याविषयी बोलतील. म्हणूनच रोग कसा-त्याचा त्रास कोणता ते नाहीचं बघावयाचे आपल्याला. त्रास का झाला? नी तो निर्षनार्थ काय करायाचे, याची जाण. एवढाच तपशिल आपणांस बघावयाचा आहे. म्हणजे दुधावर पाणी प्यायल्यास मळमळते. एवढे सामान्यतपशील आपणांस बघावयाचेच नाहीत. मात्र एवढे किमान उमगावयाला हवे की दुधाचे महत्त्व काय? त्याबाबत आदर-पुज्यता-गांभीर्य आपणांस आहे ना? दुधात पाणी नाही मिसळणार आपण. माया पातळ नाही करणार आपण. येथे माया म्हणिजे वत्सलप्रेम-वत्सलता असा अर्थ घ्यावयाचा आहे. गोरस-वासरु असे ते प्रेम. तु माझी माऊली..मी वो तुझा तान्हा..पाजि प्रेम पान्हा..पांडुरंगे. अशी ती वत्सलता आपणापाशी हवी. म्हणिजे ज्ञान हे श्रीगोमाता नी अर्थाचा गोरस सेवन करणारी आपण सारी वासरे. रघुपति मति माझी आपुलीशी करावी । सकळ त्यजुनि भावे कांस तुझी धरावी ।। श्रीराम..श्रीराम हाच गोरस हवा. असे श्रीराम पालखी उचलणारे स्कंध हवेत. त्यांनी तयातील ही शक्ती न जाणिता दुसरेच ओझे खांद्यावर घेतिल्याने हे कष्ट उद्भवतात. म्हणिजे मराठीतील एका गाण्यासारखे आहे हे..कुणाच्या खांद्यावर कुणाचे वोझे. तसे बघा, आपल्या खांद्यांना आपले ओझे होईल का..जसे मांजरीच्या पिल्लास तिचे दात बोचत नाहीत. तसेच हे. विश्व पट ब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ।। श्रींना विनंती, ताटी उघडा. ती ताटी-पुन्हा खांद्यावर देऊ नका. खांदे मोकळे करा आमचे. खांद्यावरुन जाण्याचे ते दिवसच नकोत. तेवढे टाळा. खांदेकऱ्यांना दहाव्यात प्रथम भोजन

घालावे लागते. त्यांचे खांदे त्यानंतर मोकळे होतात. तसे हे नाही हं. हे मुक्त या अर्थानी मोकळे खांदे. ती वार्ताच परत नको. कुणासिच नको. चारांवर १० निघून जातात. म्हणिजे चार खांद्यांवर दशइंद्रींये निघून जातात. तो दशेंद्रीयांचा धर्ता एक-१, उठून जातो. दुसरा म्हणजेच २ त्याचा शोक करीत राहतो. ३ म्हणिजेच तीन, सैरभैर होतात. पाच मार्गस्थ होतात. ६ म्हणिजे षट्कर्म पुन्हा योनी-वस्त्र शोधितात. सात, त्यातून सप्तघरांची निवड करीतात. ८ म्हणजेच चैतन्य, गुप्त होऊन जाते. ९ तिथे उरतच नसतात. काय स्कंध आहेत बघा हे. कानाच्या पाळीखालील संधीचा हा भाग. कुंडलाकारानी सदोदित व्याप्त असा. कानाच्या पाळीशी मत्स्यमुख नी स्कंधाशी मत्स्यपुच्छ. असे श्रीपांडूरंगाचे स्वरुप आपण पाहिलेलेच आहे. श्रीभगवतांनी जे दशावतार घेतिले त्यातील प्रथम अवतारास हे स्कंधच श्रीविष्णूंनी दिले आहेत. श्रीभगवंताच्या स्कंधांवरच हा मत्स्यावतार प्रगट झाला आहे. स्कंध ते कर्ण यामधे हातानी अंतर घेतिल्यास वितभर होते. ते अंतर म्हणिजेच हा मत्स्य होय. त्याच पोकळीत ही मत्स्यशक्ती दडलेली आहे. हे स्कंध मत्स्य सहाय्याने श्रीपांडुरंगांशी हितगुजताहेत. या स्कंधांवर अनंतजन्मींच्या वस्त्रांचा-कर्मांचा-प्रारब्धांचा-भोगांचा-फळांचा-कुळांचा-मुळांचा-भविष्याचा-भूत-वर्तमानाचा-देश-भूमी-तात्-मात्-संसार-संबंध-आप्त-इष्ट-संकट-समस्या-सार-असार-इष्ट-अनिष्ट, साऱ्यांचाच भार असतो. तो भार कोण घेईल? कोण हलका करील? एका श्रीरामांवाचून कोण असेल दुजा? पण ती श्रीराम प्राप्ती कशी-कुठून-कशाने होईल? हे जाणणारे हृदय अगोदर तयार करावयास हवे ना. तेच कसे करावे हे श्रीरामांस विचारणारी-तेथपर्यंत पोहोचविणारी शक्ती म्हणिजेच स्कंध होत. आधार-बुंधा-प्रमाण-धृति-सायुज्य-इमारत-चढ-उर्ध्वता-ग्रीवामंडली-मौक्तिकधारीणि-द्वीभागाधिकारी-परिपूर्णा-कोमलांगी-वीरप्रेमी-बहुचैतन्या-दिंडी-कुशसम्मनी-वत्सल-ओजि-ग्रीवावर्धिनी, म्हणिजे लहान मुलाची मान या खांद्याच्याच आधाराने वाढते. मुलास कडे-खांद्यावर आपण घेतो तेव्हा ती वाढीस लागते, तसे. ऐसपैस, अंगण या अर्थीही स्कंधास संबोधन आहे. आपण ही सारी स्कंधांची स्कंधशक्तिची

## बहु अक्रा सुत्ररचना




ह्वा भाग आपल्या कुशीत-बगल-काख येथे येतो. ही संपुर्ण मुद्रा कुशीकडून हृदयाकडे निर्देश करते व नाभीशी एकरुप ह्वोते.

संबोधने पाहत आहोत. आ क ा श स्थ ा - अश्वपराक्रमी-नेमधारीणी-महामही, अशी नामाभिधाने या स्कंधांस आहेत. याच खांद्यांवर मैत्रत्वाचे स्थान असते. दुसऱ्याच्या दुःखाची सांगता-शांतवनं नी अग्नीवहनस्थलीही या स्कंधांशी असते. पूर्वी या कुशस्थली म्हणिजे कुशीत जन्माक्षर जन्म घेत असे. ऐसे आजही ते घेते. परंतु त्याचा अर्थ पूर्णपणे जीवास जाणता येत नाही. चित्रात दर्शविल्याप्रमाणे वामभागी १ नी सव्य भागी ९ अशी या शक्तीची विभागणी आहे. ती समजून घेण्याकरीता तःपस्थली आवश्यक आहे. या साऱ्यातून ११ चे सुत्र महत्त्वाचे घेतिले आहे. हे एक ते आठ हे मोतिस्वरुपात आहे. विष्णुदास नाम्याची स्वामिनी काळी। कृष्णमूर्ती बहु काळी हो माय। बुंध काळी बिलवर काळी । गळा मोती एकावळ काळी हो माय।। ती एकावळ. एकावर एक. एकावर एकाची ओळ अशी ही माळ आहे. आपल्या स्कधांमधील हा शक्तीशोध आहे. तो समजून घेतिला पाहिजे. ८+३=११.. ७+४=११.. ६+५=११.. ८+२+१=११.. ९+२=११ अशी ही एकावळ आहे. श्रीसमर्थांनी जसे ११-११ बहु ११ काय ११ कळेचिना, सांगितले ते हे अक्रा होत. अजून उलगडलेले नाहीतच पूर्णपणे. बाकी मेख अक्राशी निगडीत. म्हणूनच रात्रकाळी. घागरकाळी. यमुना जळही काळी आहे. एवढ्या घनदाट काळेपणांत तो घनसावळा कातळ श्रीकृष्ण जर साथिला असेल, तर पाठी भिती नाही. म्हणिजेच भूतकाळाची तमा नाही. म्हणिजेच दहाव्याची तमा नाही. स्कंध निर्भय करणारे हे सूत्र आहे.

श्रीसमर्थकृपेने हे आपणांसमोर उलगडत आहे. कळण्यासाठी खूप अभ्यासरत असावयास हवे आपण. बघा-११ चे पाच समुह बघितले, कसे८+३=११.. ७+४=११.. ६+५=११.. ९+२=११.. ८+२+१=११..आता हे ११ चे ५ समुह कसे नी कुठे कार्य करतात ते पाहुया. असे हे अक्रांचे-पाच समुह. या स्कंधशक्तीशी निगडीत आहेत. चित्रात दर्शविल्याप्रमाणे ही प्रस्तुत मालिका-ही संधी-ही खुण-हा संकेत-हा वक्षमध्य ते स्कंध यांसी आहे. चित्रात दर्शविल्याप्रमाणे ही वामनशक्ती म्हणिजे ग्रीवा-कंठ हा बिंदुस्वरुप आहे. १-पहिला जो समुह हा स्कंध ते ग्रीवा, माळा रुळतात तिथे तेथपर्यंत कार्य करतो. २-दुसरा बरोबर सव्यस्कंधावरुन ग्रीवेशी संधी करीतो. वामबाजूस जो बिंदु-जे ११ आहेत, याचे महत्त्व जीवास अधिक आहे. ही कुर्मशक्ती आहे. हिच कुर्मशक्ती पुढेही जीवास आयुष्यभर सोबत करीत असते. येथूनच जीवास धीरता-धारिष्ट्य-यश हे भाव प्राप्त होतात. नी कुर्मी म्हणिजेच कासवी जसे आपल्या पिलांचे संगोपन नेत्रांतून करते. तशी ही कुर्मशक्ती जीवाचे शेवटपर्यंत पोषण करीत असते. म्हणिजे यातून जी शक्ती जीवास प्राप्त होते त्यानेच तो यशोशिखर गाठू शकतो. तसेच ४ चौथी बाजू ११ ही देखील शक्तिपरिपोषाचीच बाजू आहे. यात नृसिंहशक्ती वास करीत असते. चांगल्या-वाईट गोष्टींची परिक्षा याच रसातून होते. ही शक्ती स्थिर असते. अरिमर्दन हेतु ही गुप्तरुप असते. पाचवीशक्ती वक्षमध्य-श्रीहनुमंतांनी



श्रीरामजानकीसहित विराजमान अवस्था दाखविली, ती स्थली. वराह पंचस्थली. व म्हणिजे जोडाक्षर होय. जीव-शिव हे जोडाक्षर स्वरुप आहेत. ही जीवाची कल्याणकारी अवस्था आहे. र म्हणिजे शिघ्रता. गतिचीही गती. मन-रुदन-श्वास-वायु-वीज-किरण-पर्जन्य-नाद-ध्वनी-स्मरण-धूली-पाणी-वाफ या सर्व गतितत्त्वांच्या पलिकडील, गतित्त्वांच्या कक्षेत न बसणारी शक्ती. वैनतेय-घार यांपेक्षाही गतिशील अशी ही र शक्ती आहे. श्रीरामशक्ती आहे. ह म्हणिजे पूरक. या साऱ्यास पूरक-पूर्ण करणारी शक्ती. असे ते सारे मिळुन वराह. हीच पंचस्थली श्रीनवनाथ नित्य वेष्टीत ठेवितात. याच वराह अवतारातील अवस्था उमजण्याकरीता नी त्या अवतारातील शक्ती जाणण्याकरीता ही उलगड होय. अशा सर्वशक्तीमान अवस्थेस न जाणिल्याने होणारी जीवाची कष्टप्रद अवस्था ही या सस्कंध विभागात येते.

### ..एकादश संकष्ट - संदृष्ट..

संदृष्ट-अकरावी अवस्था. यातील ष हा समुहकारक आहे. षष्ठ असा. या एका शब्दाचा प्रयोग इतर शब्दांसारखा वारंवार होत नाही. काही बाबतीतच तो वापरता येतो. ष या एका अक्षरास १६ वा यति, असेही संबोधन आहे. षोडष-षोडशाक्षरी-षोडषोपचार-षड्गुण-षष्ठी-ष्ठ-षष्ठ असे अक्षरसमुह प्रतिपादन म्हणिजे हे संदृष्ट होय. विचित्र गोष्टी-रित-रिती-विधी-विधान न पाळणे-कुळधर्मांची अवहेलना-देव दूर करणे-त्यांचे विभाजन करणे-वाडवडिलांनी लावून दिलेल्या धारांनुसार यथास्थित पूजन न करणे-तसेच विटाळ कालविणे या गोष्टींनी जी कर्मोत्पत्ती भोगणे प्राप्त होते, तिस संदृष्ट असे संबोधन आहे. याकरीता पाचवीचे पुजन, पाचव्या दिवशी झाल्यानंतर ६ व्या दिवशी षष्ठीचे पुजन करावे लागते. म्हणिजे कुणाचे पुजन करावयाचे, तर जिने ७ वी दिली तिचे. म्हणिजेच षष्ठीचे. म्हणिजेच मातेचे. कारण मातेनेच ही श्रीपृथा भेटविली नां. या पुजनाने यातील दोष नाहीसे होतात. यात दोन्हीकडे समान असे भाव लागतात. म्हणिजे आत एक बाहेर एक, असे यात चालत नाही. श्रीमहाराजांनी विठोबा घाटोळ तथा लक्ष्मण घुडे यांचा अंतरीचा भाव निराळा नी घातकी

आहे असे पाहूनच त्यांस दूरी केले. कारण ओठी पोटी. कानी-मुखी. डोळी-बुद्धी. सव्यहस्ती-वामहस्ती. पृष्ठी-वक्षी. शिखा-रंध्री. भूत-भविष्यी. कर्म-प्रारब्धी. देवधर्मी-गुरुभक्ती. दास्य-सेवाधर्मी. दिन-रात्री. सूर्य-चंद्री. भद्री-अश्विनी. चैत्री-श्रावणी. कार्तिकी-पौषी. मार्गी-माघी. फाल्गुनी-वैषाखी. ज्येष्ठी-आषाढी. अंतर-बाह्यी, अशा सर्वच ठीकाणी सारेच सम लागते. पति-पत्नी. संसारी-परमार्थी. असेही सारे समच. एकास एक-११ असे. जीवाने इकडे लक्ष द्यावे म्हणूनच तर अक्रा काय कळेचिना, असे श्रीसमर्थ सांगत आहेत. जोडवी-पैंजणी. कर्णी-कुंडली. मंगलसुत्री-कांकणी. काळे-पिवळेमणि. शिखा-जानवी. जानू-संकेती. केश नी केशाग्री, ही जी जोड आहे, ही जी जुडी आहे. सतत-सदोदीत-सातत्याने-सलग अशी. अनंतजन्म जुडलेली. कदा न विभागलेली अशी ही जुडी. अशी ही अनुपम्य जोड जी जीवाला लाभली. त्या जोडीचा-त्या जुडीचा उल्लेख श्रीमाऊलींनी कसा केला बघा-बहुत सुकृताची जोडी..म्हणूनी विठ्ठली आवडी. हा जोड जर विजोड झाला तर कष्टप्रद ठरतो. म्हणिजे बघा, विठ्ठली आवडी..याचा अर्थ काय, तर या बहुसुकृताच्या जोडीने श्रीविठ्ठलांची ओढ आपणांस लागली तर जोड. नी त्यांना तर आपण आवडत असतोच. ही झाली बरोबर जोड. पण जर का ही विजोड झाली. म्हणिजे श्रीविठ्ठलांस तर जीव केव्हाही प्रियच आहे. पण जीवाला जर ते प्रेमच समजले नाही तर? तर तुमचा अंधार तुम्हास परत. म्हणून सावध रहावे लागते. कारण हे जीवाचे ११ वे स्थान आहे. श्रीपांडुरंगांचे समचरण..सारे समच इथे. चरण-इमारतीचा पायाचं सम. थेट श्रीजीव-श्रीशीव-श्रीराम-श्रीसदाशिव सारेच सम. हे समरुप न ओळखून काही प्रमाद हातून घडतो. तो घडू नये म्हणून आपणही ही सम पकडावी. ही सम जर संगीतात नाही जमली तर गायकास व्यथा होते. किर्तनात नाही जमली तर किर्तनकार ही अडखळतो. ही सम श्रोता-वक्ता अशी जमली तर बहारच आहे. गायक-गळा अशी जमली तर गंधर्वगायनच आहे. हीच सम संसारात नाही जमली तर?अनुभव ज्याचा त्याचा. म्हणूनच १२ पुर्वीचे ११ अक्रा, नी दहा नंतरचे ११ अक्रा, यांचा अभ्यास हवाच हवा. दशमी-एकादशी-द्वादशी. जसे श्रीगजानन विजय ग्रंथाचे पारायण करताना

१०-११-१२ म्हणिजेच दशमी-एकादशी-द्वादशी, असे रोज ७-७-७ अध्याय वाचित २१ अध्यायांचे पारायण पूर्ण केले जाते. पण का?अशाचपद्धतीने का? या अभ्यासात कोणी उतरत नाही. याचा अभ्यास कोणी करीत नाहीत. काम होते आहे नां असे वाचल्यावर? मग बास, तेवढेच महत्वाचे. ते ही तात्पुरते. अशाने जीवाचे फलस्वरुप मागणे कधीच संपत नाही. म्हणून तर गीतेत श्रीकृष्णांनी सांगितले की फलाची अपेक्षा करु नकोस. नी आपणांस फक्त फलाचिच तेवढी अपेक्षा राहते-असते. विचार हवा या साऱ्याचा. शोध हवा करायाला यातूज आपला. असेच श्रीमहाराजांना सांगावयाचे आहे आपणांस. अरे, मी जर तुला अशाश्वताचे पोषण। केले शाश्वता विसरुन ।। असे जर सांगतो आहे तर ते शाश्वत तुला दाखविण्यासाठी-भेटविण्यासाठीच सांगतो आहे नां? त्यासाठीच तर मी आलो आहे नां? दुसरे कोण तुला जागविलं. सारेच अशाश्वताचे बाजारी रमलेत. सारेच अशाश्वताचे पुजारी. म्हणूनच जीवनाचा खरा अर्थ कळण्याकरीता अक्राचे, दहापासून बारापर्यंत नी १२ पासून १० पर्यंत शोधन होणे गरजेचे आहे. आवश्यक आहे. १० स १ वाढवून दिला म्हणून ११ झाले. ११ त एक वाढवून दिला म्हणून १२ झाले. हा जो १ वाढतो तोच वाढदिवस. हा आपण फक्त जन्मतारखेनुसार करतो. परंतु आपलीच जन्मतारीख आपल्याच जन्मवारी जर लाभली तर खरा वाढदिवस म्हणावयाचा. वाढले-वाढण्यासारखे त्या दिवशी निश्चितच काहीतरी रसायन त्या तिथीत आहे असे समजायाचे. हेच अभ्यासिले पाहिजे. **जसे गर्भवतीस, दिवस रहाणे-दिवस जाणे असे संबोधन आहे. तर दिवस राहीले याचा अर्थ रात्री संपल्या असा आहे. अंधार संपला-तम निमाला-इतके सुंदर आहे हे सारे. जो गर्भात आला त्याच्या रात्री संपल्या. श्रीसूर्यदर्शन करविणारी ती श्रीमाता. तिने बालक गर्भात येताच त्याच्या रात्री संपविल्या. त्यास दिनकर्ता भेटविला. तो कोमलदीनाचा भेटविला.** प्रत्यक्षात हा अनुभव आहे का? तसा तो प्रत्ययास येतो कां?माता-पित्यांचा तरी तम विरला का-अंधार संपला का? बालकाच्या रात्रीच वाढताना-अंधारच वाढतांना दिसतो नां? कारण का, तर मुळापासून

अभ्यास नाही. वरवरचे पहाणे नी तेही नीटसे नाही. 'नीट' कशाकरता शब्द योजिला आहे? तर आपलं पुस्तक, आपला 'ग्रंथ' न वाचताच आपणांस दुसऱ्यांचा ग्रंथ पाहाण्याची-वाचण्याची हौस आहे म्हणून. आपलाच आपणास खरे तर एवढा अभ्यास आहे नां..पण आजच्या काळात-आत्ताच्या काळात हे पटायाचे नाही. वयाच्या पाचव्या वर्षी श्रीसमर्थांना विश्वाची चिंता लागली. ही कथा सुरसपणे सांगता येईल. परंतु त्या चिंताक्रांत विश्वप्रिय हृदयात, उतरता येईल का अशाने ?ती त्यांस लागलेली विश्वाची चिंता जरी कळली नाही, तरी आपल्या बाबतीत, श्रीसमर्थांना कां बरे चिंता लागली? एवढा विचारही नको का करावयाला? एवढा विचारही शोधाकडे वळविल जीवाला. नी अशा शोधाकडे की सारी धडपड एक गंमत-एक विनोद वाटायाला लागेल मग. आपणच आपणांस हसू. खोटे किंवा अन्यथा नाही बघा हे. शालेय जीवनात लहानपणी, आपल्या एखाद्या मित्राच्या पेनातील शाई संपली तर, तो दोन थेंब शाई दे, म्हणून मागायाचा. आपणही पेन अर्धवट उघडून, बरोबर दोनच थेंब शाईचे द्यायचो. नी शाई परत कर ही म्हणायाचो. नी आपल्याच गळक्या पेनाची हाताला लागलेली, नी कितीतरी थेंब वाया गेलेली शाई आपण पाहात रहायाचो. ते तसे सान वय-बाल वय ओलांडून पुढे आल्यावर नी आता हे आठवल्यावर हसायलाच येते नां. जुने मित्र एकत्र आले की या दोन थेंबाची आठवण आज विनोदाने-गंमतीनेच घेतली जाते नां. हेच ते त्यावेळचे बालवयातील अज्ञान. यात मोठेपणी ज्ञानाने भर पडली नी त्या छोट्या छोट्या गोष्टींचे हसू यायला लागले. काय आपण शाईसाठी भांडत होतो. आता मुले दोन-दोन पेनं हरवितात. ज्ञान झाल्यामुळे त्यावेळचे ते हास्यास्पद वाटते-ठरते. तसेच जेव्हा, खरे नी यथार्थ ज्ञान आपल्याला याच ग्रं-ग्रंथी-ग्रंथ-गाठी उकलण्याने होईल. त्यावेळीही आपण असेच स्वतःस या वाढवून ठेविलेल्या साऱ्या पसाऱ्यास हसू. नी हे प्रत्येकाचे बाबतीत घडणार आहे. आज जे जिथे आहेत त्या पातळीवरुन सुद्धा पुढे जाता येईल. फक्त जाणिव होणे आवश्यक आहे. पूर्णपणे-अंतस्थ अशी जाणिव. अहंता गुणे सर्वही दुःख होते । मुखे बोलिले ज्ञान ते व्यर्थ जाते। सुखी राहतां सर्वही सुख आहे । अहंता तुझी

तुचि शोधोनी पाहे ।। आपल्या अहंतेनी आपले काय नी किती-कुठपर्यंत नी कसे, नुकसान केले आहे हे आपल्याशिवाय दुसरे कोण शोधणार? अहंकार करुन-धरुन जर कुठलाच फायदा होताना दिसत नाही, तर मग तो सोडून देण्याचा-टाकून देण्याचा काही उपाय-मार्ग नको का शोधायाला? या अहंकारास वाल्याकोळी समजा. नंतर तो आपल्या भोगात-दुःखात सामील होणार नाही. तो कशातही वाटा उचलणारा नाही. एकटा पाडील जीवाला. सारे जिवलग जातील निघून. जिवलग म्हणिजे इंद्रिये. कसे जातील जिवलग, तर वाट बघुन जातील. आपण लावलेला जीव हा जाणित नाही म्हणून जातील. आपल्याला तरी कुठे हित कळते आहे? ज्यांना आपण हितचिंतक समजतो त्यांना तरी ते हित कळते आहे कां? निदान स्वतःचे तरी 'हित'? **हित-म्हणिजे आत्म्याच्या निवासाची जागा. त्याच्या निवासाचे बलाढ्य असे स्थान. विश्वकर्ता-दुःखहर्ता जो जीवाचा अंशरुप आत्मा ज्यात वास करतो ते. ते-ते श्रीहितधाम. इष्ट ते साध्य करण्यासाठी श्रीअंशाने केलेला निवास.** आत्ताच्या घरात-ज्या सदनात, म्हणिजेच शरीरात आत्मा राहातो, त्या घरापासून आपण असे किती लांब राहातो? तर आपण उलट असे म्हणू, अहो तो तर आमच्या शरीरातच राहातो नां. मग लांब कसा. नी 'आपणच तो'. तोच आपण. ही जाणिव होणे म्हणिजेच साक्षात्कार होय. तो झाला नी श्रीबुद्ध हसले. तसेच आपलेही होणार आहे. खसखशीच्या जवळ दुसरा खसखशीचा दाणा ठेवून बघायाचा. किंवा तिळास तिळ लावून ठेवायाचे. वरच्या दोन तिळांमधील टोकात जेवढे अंतर पडेलेले असेल-दिसेल, तेवढेही अंतर आपण नी आत्मा यात नाही. अंतर पडले कशाने? तर त्यास न ओळखल्याने. न जाणिल्याने. कोणी जाणू नाही दिले म्हणून. भलत्यातच गुंतवून ठेविले जीवाला. त्याजपर्यंत पाहोचू असे ते दिलेच नाही कोणी. नी आपलेही प्रयत्न नाहीतच काही 'त्या' पर्यंत जाण्याचे. मग काय, कोण आडवं आलं? तर आडवा हाच, आपला अहं डोंगर आडवा. सूर्य उगवूनही हा आडवाच जन्मास आला. जन्म सांडून जातानाही आडवाच गेला. आडवा जन्मास आला. आडवाच खांद्यावर गेला. हात नी खांदा काही अंतरच नाही वास्तविक.

हाताचाच भाग खांदा. वेगळे नाहीच. पण झाले खरे वेगळे. कसे-कोणी केले तर, मी-माझे-अहंकार-गर्व-ताठा-अभिमान-प्रतिष्ठा-पैसा-खोट्या समजुती या साऱ्यानी ते केले. या साऱ्यामुळे ते ज्ञान जीवास होऊ शकले नाही. कसे बघा-श्रीसमर्थ सांगतात,

स्वार्थ केला जन्मभरी । लोभे राहीला श्रीहरी ।
धनधान्य अहर्निशी । गाई महीषी घोडे दासी ।
शेतवाडे घर ठावो । प्राणी जिवी धरी हावो ।
माता पिता बहीणी भ्राता । कन्यापुत्र आणि कांता ।
व्याही जावई आपुले। इष्ट मित्र सुखी केले ।
**दास म्हणे हो शेवटी । 'प्राप्त झाली मसणवटी' ।।**
जन्मवरी शीण केला । अंतकाळी व्यर्थ गेला ।
काया स्मशानी घातली । कन्यापुत्र मुरडली ।
घरवाडा तो राहीला । प्राणी जातसे एकला ।
धनधान्य ते राहीले । प्राणी चर्फडीत गेले ।
इष्टमित्र आणि सांगाती । आपुलाले घराजाती ।
**दास म्हणे प्राणी मेले । काही पुण्य नाही केले ।।**

कधी या साऱ्याचा आपण विचार करणार आहोत. हे विचारात घेणार आहोत. याबाबत विचार होणार आपला? छे, असे काही नसते, असे म्हणून होणारे टळते कां? टाळू शकू का?अंथरुणावर पडल्यावर स्वत:च स्वत:स बरे नाही करता येत. नी उपचारही काम करेनासे होतात. तेव्हा कळते काय राहून गेले ते. नी त्यावेळी तेवढा पुरेसा वेळही हाती नसतो. नी नेमकी जाग आलेली असते. नी इकडे तर वेळ झालेली असते उठायाची. बसल्या-बैसविल्या पाटावरुन उठायाचे?ज्या पाटावर पाचवीने पाचव्या दिवशी बैसविले त्या पाटावरुन उठायाचे? तो पट, तो चित्रपट जाणिलाच नाही. वाचता तर आलाच नाही. कोणी जाणकार शोधिलाच नाही. वाचणारा-ती लिपी-ती अर्थलिपी-संकेतलिपी जाणणारा कोणी पाहिलाच नाही. शोधिला-ऐकीला नाहीच कधी. आता तडफडून तरी काय उपयोग-कीतीसा उपयोग. नाही नाहीच काही. अजून पाचवीच जाणिली

नाही. कुठली दशमी? करा, चतुर्थ्याच करा अजूनी. आळवा पुन्हा पुन्हा त्या श्रीगजाननांस. संकष्ट निवारा म्हणूनी. अंधारातून प्रकाशात आल्यावर प्रकाशाचे जर प्रेम लागले नाही, तर? तर काय उपयोग. मग अंधारच कळला नाही म्हणायाचा. कारण अंधार जाणिला तर प्रकाशाची ओढ नां? कुठपर्यंत चुकले आहे बघा. अपराधी जन चुकतची गेले । तुझा तुचि सावरी।। कारण कां? तर कोण सावरणार? वाल्याकोळींची श्रीरामायणा संदर्भात कथा वाचून, श्रीवाल्मिकमुनी होता येण्यासाठी रस्ता मोकळा आहे हो. पण जर चालायाचीच उत्सुकता-ओढ-तळमळ नाही तर मग काय म्हणायाचे. अहंकारास मारण्यासाठी ताकद लागते. खूप तयारी लागते. खूप अभ्यास लागतो. कारण हा संघर्ष आपला आपणाशिच असतो. दुसऱ्याशी कीतीही वाद घालू शकतो. भांडण-मारामारी-शस्त्र, काहीही. पण स्वत:स जरा जरी खरचटले-कोणी काही बोलले, तरी डोळा पाणी येते. त्याक्षणी जाणायाचे दुसऱ्यासही डोळा आहे म्हणून. त्याही डोळीयास पाणी येते. न्याय करणारे आपण कोण? श्रीअर्जुनांनी एकदा श्रीश्रीकृष्णांना पुशिले की, दुसऱ्याचे अंत:करण कसे जाणावे. तेव्हा श्रीवदले की तत् त्वं असि. तू तोच आहेस. तूच तेथे आहेस. एवढाच विचार कर. म्हणिजे यातील रहस्य तुज उमगेल. चला हा विचार आपण आपल्या अहंकाराच्या जागी बसवू. ज्या कुणाशी भांडायाचे तो आपणच आहोत. मग आपणच आपल्याशी वाद घालू का? अजून सोपे करुन जाणून घ्यावयाचे तर बघा. कुणा दुसऱ्याच्या हातून जर दूध उतू गेले तर, आपण त्यास खूप बोलतो. अगदी डोळे फुटले होते का?लक्ष कुठे असते? एक काम धड जमत नाही, वगैरे. नी आपल्याच हातून दुध उतू गेले तर..? मग ही प्रतिक्रिया नाही. मग आपणच आपणास हे असे टाकून बोलू शकत नाही. मग लगेच लपायाला जागा शोधिली जाते. दुध उतू का गेले त्याची कारणमीमांसा सुरु होते. आपण दोषी नाही हे सांगण्याचे सर्वतोपरी प्रयत्न होत राहतात. नाहीतरी जाऊ दे, आज सोमवारच आहे. चांगले असते दूध उतू जाणे. मग ते कुठल्या का वारी उतू जाईना. आपल्या हातून गेलय नां..मग तो तो वार शुभच. काय मनोवृत्ती आहे ही बघा. नी

हिच घातक आहे. हाच अहंकार अशा बारीकसारीक गोष्टींनी पोसला जातो. नी एक दिवस हा भस्मासूर आपणांसच खातो. म्हणूनच श्रीसमर्थ सांगतात मुळारंभाशी हे असले काहीही नाही. नव्हतेही-नसेलही. हा अहंकार-गर्व-ताठा-मान-अभिमान-पैसा-खोटी प्रतिष्ठा-चकचकीतपणा-चैन-आराम-आळस-अज्ञान-कंटाळा-सुड-द्वेष-मत्सर-काम-क्रोध-लोभ-मद-मत्सर-प्रतिशोध-भांडणे-संघर्ष-युद्ध-सत्ता-स्पर्धा-माझे-तुझे-मी-तू-जन्म-मृत्यु-व्यवहार-कर्म-भोग-प्रारब्ध-संचित-क्रियमाण-जीर्ण-खराब-नासके-विटके-फाटके-उसवलेले-बदलावे लागणारे-टाकून द्यावयाचे-सरण-चिता-चिंता-काळजी-व्याप-विवंचना-उद्वेग-नैराश्य-आजार-आधि-व्याधि-उपाधि-उठांग-आध्यात्मिक-आधिभौतिक-आधिदैविक-हेवे-दावे-रोग-औषधे-शिव्या शाप-तळतळाट-बोटे मोडणे-वोलांडे-दृष्ट-जादू-घातपात-अपघात-रण-रणसंग्राम-शान-साठा-आग-दुष्काळ-प्रलय-पूर-महापूर-अतिवृष्टी-अनावृष्टी-पिकांचा अभाव-नात्यानात्यांमधला तणाव-भांडणे-गैरसमज-कुढणे-कुजणे-झिजणे-मनःस्ताप-कोर्ट-कचेऱ्या-कागदपत्रे-तारण-गहाण-खरेदी-विक्री-ओलिस-पोलीस-व्यवहार-अधिकार-अधिकारी-यंत्र-तंत्र-अभाव-अपाय-अश्रद्ध-अभक्त-अजीव-असे काहीही मुळारंभाशी नव्हते. नी नाहीही. गरीब-भिकारी-अन्नार्थी-दरीद्री-वर्ग-वर्ण-जात-पोटजात-भेद-उपभेद-द्वैत-मलिनता-अमंगल-अशुभ-हलके-हलक्या कानाचे-हळव्या मनाचे-आळशी-करंटे-कमनशिबी-अपयशी-रोडावलेले-दुबळे-अशक्त-कमकुवत-भित्रे-लबाड-लाचार-लोचट-घाबरट-आधाशी-उपाशी-कोमेजलेले-गळलेले-सुरकुतलेले-पालापाचोळा-उंच-नीच-राष्ट्र-सीमा-काही काही नव्हते. होते फक्त एकच-एकच १. तो म्हणिजे श्रीभगवंत असा शून्य 0 असा. नी आपण । असे. '0।'. नी त्या शून्याचा आधार घेउन जर आपण आलो आहोत तर मग हे सारे बाकीचे आले कुठून? हाच तर अभ्यास हवा आहे. याचाच तर अभ्यास हवा आहे. जर सारेच आपण आहोत, हे विश्वचि माझे घर याप्रमाणे जर सारी रचना आहे. सारेच आपले आहेत. तर मग काय मागायाचे, नी काय नाही जवळ आपल्या? पण

नुसते विचार करुन-वाचून याचा अनुभव कसा येईल बरे? जसे एखादा पदार्थ बनवावयाचा झाला तर पुस्तकात तो पदार्थ तयार करण्याची रीत अगोदर वाचावी लागते. पण नुसते वाचून का तो पदार्थ तयार होतो. नुसते वाचून का रुची-स्वाद कळतो? नाही नां? त्या करीता त्या पदार्थचि सामान आणावे लागते. त्या पुस्तकात दिल्याप्रमाणे कृती करावी लागते. याचा अर्थ काय की, वाचनानंतर कृति अपेक्षित आहे. तर तो पदार्थ आपणास खाता येईल नी तद्नंतर तृप्ती होईल नां. हे जर खरे, तर मग आपण आता तत् त्वं·असि, प्रमाणे या ग्रं च्या वाचनानंतर-कृती-आचरण हे करावयास हवे नां? जसे पोहण्याचे नुसते पुस्तक वाचून का आपण पोहायला शिकणार? त्यापेक्षा पाण्यात पडले की पोहायला येते. म्हणून मनन हवे. मननानंतर जो साक्षात्कार होईल, तो कसा असेल, तर एका मनोगताचेच श्रीस्वामी नी सेवक असतील. निश्चयाचा महामेरु । बहुत जनांसी आधारु। अखंड स्थितीचा निर्धारु । श्रीमंतयोगी ।। परोपकाराचिया राशि । अखंड उदंड घडती जयासी । तयाचे गुण महत्वासी । तुळणा कैची।। हे श्रीसमर्थांनी राजा श्रीशिवछत्रपतिंसाठी लिहीलेले आहे. पूर्ण सत्य. श्रीराजे कसे 'घडले' ते तर आपण वाचू शकतो नां? तसेतरी आपण घडण्याचा कींबहूना ते आदर्श बाळगण्याचा तरी अभ्यास आपण करु शकतो नां? भले आपणास श्रीविष्णु होणे अवघड वाटत असेल, तर आदर्शासाठी ही अवघड पण शक्य करणारी-शक्य करुन दाखविलेली-आता आताची ही पर्वतप्राय उदाहरणे घ्यायला काय हरकत आहे? हे श्रीसमर्थांनी श्रीछत्रपतिंना पाठविलेले पत्र आहे. एवढ्यापर्यंतच का ते घ्यावे? घ्यावे का? बघा श्रींना जे आवडते- श्रीसमर्थांचे जे लाडके गुण-ज्याने जीवाचे कल्याण होणार आहे-परमकल्याण होणार आहे, असे ते गुण श्रीसमर्थांना श्रीछत्रपतींमध्ये दिसल्याबरोबर श्रीसमर्थांनी त्वरेने त्या आपल्या लाडक्याबाळाचे कौतुक केले. अहो आपल्या एवढ्याशा गोष्टीची दखल घेतली गेली तरी किती उर भरुन येतो. येथे एका योगियांच्या राजाने दुसऱ्या शिवराजाची ही घेतिलेली दखल आहे. पण आपल्या समजण्यासाठी म्हणून एवढ्या सामान्यपातळीवर या गोष्टी आपण घ्यावयाच्याच नाहीत.

आपणास समजाव्या म्हणून तरी का आपण सारखी सारखी ही सामान्यपातळी गाठावयाची. जाऊ या नां उंच. होऊ या नां उच्च. कधीतरी होऊ दे नां मनाचे उन्मन. काय हरकत काय आहे?गाठू या नां ते शिखर. होऊ या ना आपणच कळस. कळस म्हणिजेच तर निश्चयाचा महामेरु. अहो हे तर मनाच्या कितव्या श्लोकात नी केव्हाच सांगून ठेविले आहे बघा श्रींनी.

मना सज्जना भक्तीपंथेचि जावे । तरी श्रीहरी पाविजे तो स्वभावे ।
जनी निंद्य ते सर्व सोडोनी द्यावे । जनी वंद्य ते सर्वभावे करावे।।

बघा कशाने निश्चय होऊ शकतो? मन धाष्ट्यावर येते? स्वबलाचा शोध लागतो? नी जीवाचा आत्मविश्वास वाढतो? तर निंद्य ते त्यागून. मग स्वत:तीलही निंद्यपणाचा त्यागच हवा नां? पदार्थ रुचकर स्वादीष्ट नी टिकविणारा-टिकणारा हवा. तर-तो पदार्थ बनविणाऱ्याचे-ज्याने बनविला त्याचे-तो कसा बनविला त्याचे, पुस्तक वाचावयाला नको कां? वाचायाला हवे नां? म्हणूनच आपणांस एकंदरीत हा सर्व-सर्वत्राचा अभ्यासच, या निश्चयाच्या महामेरुपर्यंत नेऊ शकतो. हा ग्रं त्यासाठीच तर वाचित आहोत नां आपण. श्रीगजाननमहाराजांची एक अशी लिला आपणांस श्रीगजानन विजय ग्रंथात वाचावयास लाभते, की एकदा श्रीमहाराजांना त्यांचे भक्त श्रीबंकटलाल हे त्यांच्या मळयात कणसे खाण्यासाठी नेतात. नी श्रींना एका चिंचेच्या झाडाखाली आसनस्थ करवितात. नी कणसे भाजण्याची तयारी करीतात. १०-१२ आगट्या पेटतात नी धूर आकाशाला भिडतो. तिथे चिंचेच्या झाडावर आग्यामोहोळाच्या माशांची पोळी असतात. ती पोळी या आगीने ठाव सोडीतात. पाच-पंधरा पोळी ती. एकदमच त्यातिल माशा चवताळून धावून येतात. ते पाहिल्यावर श्रीबंकटांसह सोबत आलेले सारेच पळून जातात. पुढे..?पुढे फार भयंकरसे..त्या माशांनी श्रीमहाराजांना पकडले. नी तासभर श्रींना त्या अगणित माशा डसत राहिल्या. श्रीमात्र स्वस्थ बसले. कैसे, तर निजानंदी डोलत. नुसते वाचावयाचे नाही हे. त्या भयानक अशा जीवघेण्या प्रसंगातूनही श्री आपणांस शिकवित आहेत. प्रसंग काय तो, नी श्रीमहाराजांची तळमळ बघा त्यातून काय, तर आपल्या

बाळाला यातूनही घडविण्याची. काय हो हे प्रेम. काय म्हणावे या प्रेमाला. आपण असे काय करतो..काय केले आहे यांचेसाठी. कृतज्ञ..कृतज्ञ..कृतज्ञ हा भाव याच श्रीचरणी धरीला पाहिजे हो. एक मधमाशी चावली तर पंधरा दिवसाचे दुखणे निघते आपले. चटकन उपाय करायाचा म्हणिजे काय तर तुळशीची माती लावायाची. बघा कुठे आली मती..? का आली इथे ती? भरपूर पैसा आहे नां जवळ. मग लावा नां तेथे १००-५०० ची नोट. नाही हो-त्याने तो थयथयाट थांबणारा नाही. याची पुरेपूर खात्री असते आपणाला. अहो हेच तर ज्ञान. **चटक्याला फुंकरीचा मान.** नी आता जर असा चटका बसला तर, अशी आग भडकली तर श्रीतुळसही जवळ नाही ठेविली आपण. जनी आपुली ती तुवा हानी केली..आपल्या वस्त्रास नीत्यनूतन ठेविणारे, सहसा जीर्ण होऊ न देणारे-हे श्रीतुलसी सूत्रही आता पूर्वीसारखे घरोघरी उरले आहेच कुठे. अंगणे संपली नी ती वृंदावनेही संपली. तुळशीचे एक पान खाऊन उपवास करणारे होते आपले पूर्वज. नी आपण तर आता उपवासाबाबत देखील किती सवलती करुन घेतिल्या आहेत. उपवास म्हणिजे वेगळ्या स्वाद-रुचिची तयारी असते आपल्याकडे. परंतु उपवास कुणास घडावा-कशाचा घडावा-कुणासाठी घडावा-त्याचे फलित काय? संकष्टी मंगळवारी आली तर अंगारकयोग म्हणिजे काय? चंद्र पाहूनच का उपवास सोडायाचा?या कशाचाही अभ्यास नाही. म्हणूनच वाडवडील आपणांस म्हणतात की आपण सारेच धाब्यावर बसविले. वृक्षांची जोपासना ही आपल्या संस्कृतीत अतिपूज्य नी जीवनावश्यक मानिली गेली आहे. श्रीबेल-श्रीवट-श्रीअश्वत्थ-श्रीचिंच-श्रीपेरु-श्रीआवळा-श्रीकडूलिंब-श्रीतुळस-श्रीदर्भ, किती काय सांगावे. कुठे आहेत हे वृक्ष? भरपूर-मोठ्या प्रमाणावर आहेत का आता हे. एक चिंच-एक आवळा असे जर ५००८ वृक्ष लाविले नी त्या सान्निध्यात जर दुखणेकऱ्यास उपचारार्थ ठेविले तर, तो शीघ्रही रोग टाकून ताजा होतो. अर्थात हे वृक्ष लाविण्याच्या पद्धती-त्यांचा घेर-त्यांचे आयुष्य या साऱ्या गोष्टी फलाकरीता आवश्यक आहेत. आज लावले नी उद्या झोपवले असला खुळा प्रकार नाही हा. कडूलींबाचा १०० वर्षांपूर्वीचा वृक्ष १०० वर्षांनंतर गोडपानांचा म्हणजेच अमृतसिंचनाचा होतो.

पण..जनी आपुली ती तुवा हानी केली. अश्वत्थास एकलक्ष प्रदक्षिणा घालून आपला पतिच केवळ परत मिळविला नाही मंडळी. आपली साऱ्यांची पत राखण्यासाठी-या दिव्यातून आपलीच तात-मात गेली. आपली विचित्र गत होऊ नये म्हणून त्यांनी केलेला हा त्याग आहे. आपल्याला मोक्षाचे धनी करण्यासाठी सर्वस्वाचा केलेला हा होम आहे. देहांत प्रायश्चित घेतले कोणी? श्रीमाऊलींच्या आई-वडीलांनी? नाही. केवळ एवढेच नाही. तर देहांत प्रायश्चित घेतले आपल्या आजी-आजोबांनी. नी आपण नात्याने [ना त्यातले] असे नातू. आहे नातू जागा? लागेल 'पणति' दारा? पडेल उजेड घरा? येईल तो वारा अंगणा? जो वाचवेल दिवा? आपल्याच पायावर अज्ञानाने मारीलेली कुऱ्हाड आहे ही. म्हणून नी म्हणून श्रीसंत आले. श्रीसमर्थांनी अवतार केला. श्रीमहाराज प्रगट झाले. जाणा-जाणा-जाणा-जाणते व्हा.

स्वस्थ बसले आसनावर श्री. काय विचार करीत तर..माशी तरी मीच झालो । कणसे खाया मीच आलो । कणसे तेही रुपे माझी । नी असे जर सारेच मत्स्वरुपी आहे तर मग कोण-कोणास-का नी कसे दुखावेल. हा विचार, हे धैर्य-हा भावच त्यांच्यामुळे उद्भवला आहे. त्यांच्यातून उद्भव आहे या सर्व प्रेमळ भावांचा. नी आपणास विसर पडला म्हणून आठवून-जाणवून सुत्रधरीता येण्याकरीता केलेल्या या लिला म्हणिजेच अवतार धारणा होय. त्या माशिरुप 'सच्चिदानंदास' श्रीमहाराजांनी जाणिले. म्हणून त्या मसच्चिदानंदपन्नत्वाचा अभ्यास, जर आपणही नीट मन:पुर्वक नी मननपूर्वक जाणून केला तर दु:ख उरेल का?म्हणूनच श्रीसमर्थ सांगतात की दु:ख कशामुळे आहे तर अज्ञानामुळे. अज्ञानात तर सारेच आहेत. ही अज्ञानाची पांघरुणे आता फेकायाला हवीत नां. नी हेच अज्ञान जाणून श्रीछत्रपतिंनी ती ज्ञानाची पालखी उचलली. निश्चय केला, की नाही, ही सारी संजीवने मी जागती ठेवीन. मी मंदराचलाची केलेली रवि नी झालेले अमृतमंथन, हे केवळ रात्री झोपविण्याच्या कथा म्हणून घेउ देणार नाही. त्या कथा तर घोर रात्रीतून जागविणाऱ्या आहेत. अमृत सांडले ज्या नदीत, त्या नदीत स्नान करण्यापुरताच पर्वकाळ

नाही. तर त्या तिर्थाचे ते तिर्थत्व टिकविणे हा खरा पर्वकाळ होय. श्रीराजांनी हे सारे जाणिले. यापृथेचे असेच अधिपती नाही झाले राजे. त्यांनी साऱ्यांचेच दुःख जाणिले. जाणते राजे. नदीचेही दुःख जाणिले. ज्या नदीमधे अमृत सांडीले, तीत सांडणारे-तीतून वाहणारे रक्त, आपल्याच स्वकीयांचे आहे हे श्रीछत्रपतींना दिसले. नी त्यांनी ते मेरुपर्वताचे कष्ट जाणिले. श्रीदेव-दानवांची ओढाताण जाणिली. त्या पाठीमागची तळमळ ओळखिली. शास्त्र-पुराणं-वेदश्रुती-आर्या, साऱ्यांच्याच हृदयाची ती हाक ऐकीली. अर्थात तसा कान, तसे श्रवण त्यांस श्रीजिजाबाईंनी दिले. तसे घडविले राजयांस. श्रीसमर्थांनी टोचले ते कान. आता कुणी असे समजू नये की श्रीसमर्थांच्या मांडीवर श्रीराजांचे कान टोचिले गेले. प्रसंग वोळखी दे रे राम. आपण कुठलीही गोष्ट सामान्य म्हणिजे बुद्धीच्या सामान्यपातळीवरुन म्हणिजेच केवळ अक्षर वोळखीवरुन घ्यायाची नाही. असे आपण या ग्रं च्या उकली दरम्यान बरोबर ठरविलेले आहेच. कारण मग त्यात आपलेच हो नुकसान आहे. गोष्ट स्विकारता नाही आली तर नाकारायचीही नाही. कां? तर आपण स्थितप्रज्ञ या अवस्थेस जाणिले नाही नां म्हणून. समजा आपण नावेत बसलो आहोत. नी एकाच बाजूला जडपणा वाढला. वजन वाढले तर, ते श्रीनावाडीही आपणास सांगतात की हे बघा, एका बाजूस नका बसू. नाव कलते अशाने नी तुम्ही बुडाल. नाव चालविण्याचे ज्ञान ज्यास आहे. तो सांगतो नी आपणही ऐकतो. तो जाणता आहे, हे जाणूनच नां त्याचे ऐकतो आपण..! का तिथेही तर्क-संशय-अहं बळावतो आपला. छे, नावाड्यास काय कळते. बसा, कुठेही बसा. आपण पैसे दिले आहेत. अशी बडबड होते का तिथे त्यावेळी? नी अशी बडबड करुन जर बुडालो तर मग जबाबदार कोण? न पाणी-न नाव-न नावाडी. तर..तर मग कोण? कोण दुसरे मग. अहो, आपलाच मुर्खपणा. त्यानेच बुडविले. आपला घात आपणच केला. काय करणार? मी खीर खाल्ली तर बुड घागरी. बुड...बुड...बुड....घागर बुडाली. का? तर खोटे बोललो म्हणून. मेलो खोटे बोलून. मरण पत्करले. बुडालो. पण खरे बोललो नाही. अशा कथा कीती कीती लहानपणी ऐकील्या-वाचिल्या. त्यावरील प्रश्नांची

उत्तरेही दिली. कशी बघा-

मांजर का बुडाली? २ गुण मिळवून देणारा हा प्रश्न.

आपले उत्तर-मांजर बुडाली, कारण ती खोटे बोलली होती म्हणून. २ गुण मिळाले. सोबत बरोबरची खूण, की होय, हे उत्तर बरोबर आहे. का..तर जे या गोष्टीतून कळावयास हवे ते कळले म्हणून. श्रीगुरुजीही खुष नी विद्यार्थीही. शिकविणे व्यर्थ नाही गेले म्हणुन.

प्रश्न दुसरा-या कथेपासून आपण काय बोध घेणार?-५ गुण.

आपले उत्तर-माणसाने कधीही खोटे बोलून आपलाच घात करुन घेऊ नये. नाहीतर त्याची गत मांज़री सारखी होईल.

चला, अजून ५ गुणांची प्राप्ती झाली. दुसरी बरोबरची खूण. आता

तिसरा प्रश्न-१० गुण, आपण जर मांजरीच्या जागी असाल तर? इथे उत्तरे वेगवेगळी संभवतात. त्या जागी आपण असतो तर कसे वागलो असतो. हाच प्रश्न-याचेच खरे उत्तर म्हणिजे धडा. खरा धडा. तोच घ्यावयाचा आहे. घ्यायाचे काय..श्रीछत्रपतींच्या कथा वाचून. श्रीरामायण-श्रीमहाभारत-श्रीमत् भागवत-श्रीमत् ग्रंथराज दासबोध-श्रीज्ञानेश्वरी-श्रीगजानन विजय, खूप खजिना आहे आपला. आपला सर्वांचा. एवढा वाचायाचा-वाचून वाढवावयाचा. काय श्रीमंती आहे आपली. श्रीकुबेरांचे भांडार एका कोपऱ्यात बसेल याचियेपुढति. अ उ म-या त्रयाक्षरातून निर्माण झालेली आपली श्रीपृथ्वी-श्रीअवनी-श्रीवसुंधरा. श्रीशेषकन्यावैभवी. या त्रयिंचा नियंता एक श्रीभगवंत. नी आपणही तेच स्वरुपी. विश्वास बसणे कठीण यावर. कारण आत्ताची आपली अवस्था पाहता आपणच हे ऐवढे दिव्य नी सुंदर असे आपलेच रुप स्विकारु शकत नाही-शकणार नाही. अहो चकचकीत हॉटेलात जर आपण गेलो तरी आपणास गडबडल्यासारखे नी संकोचल्यासारखे होते. हे तर एकदम स्वर्ग-मृत्यू-पाताळ ओलांडून स्विकारावयाचे आहे आपणांस. म्हणिजे एकदमच श्रीइंद्र-श्रीकैलास-श्रीक्षीरसागर ओलांडून श्रीसाकेतधामात जायाचे. अवघडच आहे. विश्वास नाहीच बसत.

देवालये चालवी देवो । प्रत्येक्ष सचराचरी ।

अंतरी विवरी नाना । सद्य गद्य नव्हे कदा ।।
देवळे चालवी नाना । तनाना होतसे पुढे ।
वदाना त्यास का आधी । तो देव येकला दिसे ।।
येकला येकच बहुतां ठाई। सर्वांठायी विभागला ।
दिसेना लोचनाला रे । घाला रे मन त्यामध्ये ।।
येकला सर्व देवळी । गुप्त नानापरी वसे ।
त्यापुढे तीन देवाल्ये । ब्रह्मा विष्णू महेश्वरु ।।
तया अभ्यांतरी देवो । तो देव सत्य जाणिजे ।
तोचि जो तो हा जाणा । नाना देवालयामध्ये ।।
अवतरे देवळांमधे । त्यासी अवतार बोलीजे ।
आता म्यां काय सांगावे । सांगावे त्या परमेश्वरा ।।
अखंड अंतरी ध्यावे । जावे रे निश्चलाकडे ।
नाव रुप जया नाही । कार्य कारण तो नव्हे ।।
महाकारण ही खोटे । देवालये मुळीचे मुळी ।
अनन्य दास देवाचा । वाचा रे मन घालूनी ।
पाहता कोण तो कैचा । भेदाचा ठाव नाडळे ।।

हेच ते. आणिक काय सांगावे? तुम्ही आम्ही भेद तेथ । नाही उरला यत्किंचित ।। तेच जाणण्याचे-त्यालाच जाणण्याचे सुत्र हवे आपणांपाशी. म्हणुनच नकार-स्वीकार हे या अभ्यासानंतर-मननानंतर-नीट वाचल्यानंतर-जो सांगतो त्याचेच हृदय जाणिल्यानंतर हे नकार-स्वीकार सारे गळून पडणार आहेत. अनन्य दास देवाचा, असे आपलेही होणार आहे. तर वरवरच्या या तार्कीक विधानांस काय अर्थ आहे. उथळ पाण्याचा खळखळाट नको. तो पुर्ण भरलेला घटच खरा. तोच खरा मंगलकारी-शुभसूचक-तृप्तीदायक असतो. त्या तशा भरीव कलशाच्या पूजनाची तर आपली परंपरा नां. रिकामा कलश पूजेस ठेवतो का आपण..! नाही. त्यालाही अभ्यास हवाच हवा. आपले सारेच एकूणच या पृथ्वीवरील सारे भाव हे अभ्यासिण्याजोगेच आहेत. विद्यार्थी व्हायाला हवे आपण. नी हा विद्यार्थ्याचाच ग्रं..त्या भक्ताचाच हा ग्रं आहे. त्या अनन्यदासाचाच हा

मुळारंभ श्रीसमर्थ सांगत आहेत. आपणांस असे वाटते की आपल्या फक्त कपाळावरच पाचवी लिहीते. परंतु केवळ आपल्या कपाळावरच ही पाचवी लिहीत नसून ती शरीरावर इतरत्रही संकेतचिन्हे देते. त्या जागा आपणांस उमगल्या पाहिजेत म्हणजे झाले. ही सटवाई-जोखाई कोण? ही जीवती कोण? अभ्यास हवा नां करायाला? ही पाचवी, जर विद्यार्थी घडविणार आहे. नी त्यासाठी करावयाच्या अभ्यासाची वह्या-पुस्तके ती जीवास वयाच्या पाचव्या दिवशीच प्राप्त करुन देणार आहे. तर..? आपण मात्र ती वह्या-पुस्तके वयाच्या १०० व्या वर्षापर्यंत पहाणे-उघडणे-कळणे, हे तर जाऊच द्या. ती आहेत, हे उमजणेही साधे होत नाही आपल्याकडून. काय म्हणायाचे? श्रीसमर्थांच्या चरणी ही ललाटपाटी, हा ललाटपट ठेवावा-घासावा-पुसावा-स्वच्छ करावा-धुवावा-दोहीबाजूनी स्वच्छ करावा. पाठ-पोट-कडांसहीत-कोपरा-वळणांसहीत-खाचाखोचांसहीत स्वच्छ ठेवावा. ठोकलेल्या खिळयांसहीत-सांधिलेल्या-बांधिलेल्या-जोडीलेल्या जागांसहीत-जमिनीपासून-पृथेपासून-मृत्तिकेपासूनच्या तिच्या उंचिपर्यंत ही पाटी स्वच्छ करुन घ्यावी सारी. येथे आपण वावरत आहोत भूतकाळात. भूतकाळतील ती पाटी आपणांस कुठे आठवली आहे बघा. भूतकाळातले वर्तमान काळात आठवणे हे जे सूत्र आहे नां तेही फार विलोभनीय नी अवर्णनीय सूत्र आहे. मागून पुढे आणणे. भूतकाळातून वर्तमानकाळात स्मरणसूत्राने स्मरण ओढून आणणे. जसे बापामागून पुत्राने पुढे येणे. श्रीगुरुंमागून शिष्याने पुढे येणे. रात्रीमागून दिवसाचे पुढे येणे. पश्चिमेकडून श्रीसूर्याचे पूर्वेस येणे. अज्ञानामागून ज्ञानाचे येणे. श्रीलक्ष्मींमागून श्रीनारायणांचे येणे. श्रीकपिवरांमागून श्रीरामरायांचे येणे. काय काय गोड-सुखद-मुलायम सूत्र आहे हे. पण हे फार फार वरच्या पातळीवरचे आहे. नी आपण या साऱ्यापासून फार दूर राहून विचार करतो. कसे दूर बघा, ही आपली पातळी कशी ती, कानामागून आली नी तिखट झाली. अशा या सामान्यपातळयाच आता आपण सोडून द्यावयाच्या आहेत. नी हे ही ध्यानात ठेवावयाचे की एवढ्या सामान्यपातळीसही एवढ्या उच्चपातळीवर नेणारे श्रीसमर्थ आहेत. भूतकाळासही वर्तमानाकाळात आणून त्याचे सोने

करणारे श्रीसमर्थ आहेत. आहेतच आहेत. हेच आपणास जाणायाचे आहे. 'ते' आपले, या जीवाचे, आहेत. नाम कसे घ्यावे, तर श्रीवाल्मिकमुनींसारखे. त्या नामातून त्यांस जे रुप भेटते झाले. ते त्यांनी जसे पाहिले, ते नी तसे लिहिले. नी त्याचप्रमाणे अवतारकार्य धरीले श्रीरामराये. एक धक्का बसला श्रीवाल्मीकिंना. ज्यांसाठी ते ही अघोर कृत्ये करीत असत ती कोणीच या अघोरकर्मांची फळे भोगण्यास तयार झाली नाहीत. पश्चात्ताप-अनुताप त्यांस झाला. नी त्यांनी तत्काल स्वतःत सुधारणा व्हावी म्हणून श्रीनारदस्थानाचे चरण धरीले. माझ्या पापात जर माझे रक्ताचे कोणी संबधित सहभागी नाहीत. तर दुसरे नातेच उरले नाही नां यापरते. **रक्तापैलिकडे दुसरे असे कुठले नाते असते का आपले? आपणासही या रक्ताच्या नात्यापलकडील नात्याचा शोध घ्यायलाच हवा.** श्रीनारदमुनींनी त्याचक्षणी, ज्या क्षणी अनुताप झाला त्याच क्षणी श्रीवाल्मिकमुनींना त्या श्रीरामरसाचा घोट दिला नी स्व पात्र अमृताचे कर म्हणून आज्ञापविले. लगेचच श्रीगुर्वदिशाचे पालन श्रीवाल्मिकमुनींनी केले. श्रीरामनामाने तो रामरस पात्री भरीला नी लगेच त्यांस नवे वस्त्रप्राप्त झाले. 'मुनिवस्त्र'. सर्वस्वी नवी धारणा. ज्याची कल्पनाच करता नये मना. नाम, एका नामाने त्यांस प्रचंड कर्तृत्व लाभले. प्रत्यक्ष श्रीरामायण लिहीण्याचे कर्तृत्व. श्रीरामच ध्येयविषय. श्रीरामच हृदयस्थान. श्रीरामांमुळेच भक्तीची उंची. श्रीरामच सत्प्रेरणा झाले. श्रीरामच भान-जागृति. श्रीरामरुप जगत्रय ही जाणिव. श्रीरामदास्याचे ज्ञान. सारे आगळे वेगळे घडीले. एका नामामुळे पार पालटले. जे न घडे ते घडविती सत्य. असे हे श्रीरामसूत्र. सत्य-परमसत्य सूत्र श्रीवाल्मीकमुनींना गवसले. एकदम दक्षिणेकडून पूर्वेसच ते आले. कोडे आहे हे ही. पूर्वेनंतर जर पश्चिम तर आपण दक्षिणेशी जातोच कसे?सोडवा कोडे. चालवा डोके. उघडा डोळे. श्रीगुरुभक्तीची सेवा ही फळे. सायुज्य लता वेली चहूकडे. हेचि सत्य जीवीचे. आपले होते काय, जो खरे बोलत असतो नां त्याच्यावरच विश्वास बसत नाही. साक्षिदार हवा असतो आपल्याला. मग साक्षिदार खोटे का बोलत असे ना, त्यावर विश्वास बसतो. ते खरे वाटते. काय न्याय आहे बघा. मी पाहीले आहे, असे म्हटले

की संपले. पण या ऐवजी 'मी जाणिले आहे', असा साक्षिदार असला तर? तर धाकच संपला नां मंडळी. मैत्रच नां मग सर्वत्र. जाणत्यांचिच वसति नां सर्वत्र. रामदास्य करुनी पाहे..सर्व सृष्टी चालताहे. हे आपणांस जाणायाचे आहे. बघा-एक मुलगा नी एक मुलगी असे दोघेजण चालले होते रस्त्याने. त्या दोघांकडे पाहून एकजण म्हणाला मित्र-मैत्रीणी असतील. एकजण म्हणाला असेच छंदीफंदी असतील. एकजण म्हणाला उद्योग काय दुसरा यांना. एक म्हणाला प्रियकर-प्रेयसी असतील. एक म्हणाला काही सांगता येत नाही हल्ली. एक म्हणाला बहीण-भाऊ निश्चिती. एक म्हणाला दिसत तसं नसतं. एक म्हणाला असतील कुणी, काय करायाचे आपणांस. ही झाली विचारांची सामान्य पातळी. परंतु त्या दोघांकडे पाहून श्रीसंत वदले, भक्त आहेति दोघे. बघा मी पाहीले, असे म्हणणाऱ्यांची वक्तव्ये. नी मी जाणिले आहे, त्याचे उद्गार.. वरवर काहीही दिसेल. वरवरचे पहाणे हे खरे नव्हेच की. अंतरीचे भक्त. ही अंतरदृष्टी. हीच सत्य सृष्टी. हीच महत्वाची. ही दृष्टी आपल्या ग्रंथाची आहे. हीच दृष्टी श्रीसमर्थ आपली उघडीत आहेत. प्रयत्नपूर्वक उघडीत आहेत. आपली दृष्टी उघडली की हेच प्रथम दिसायाला हवे आपल्याला. काय तर, ग्रं. ग्रं हे आपणांस पूर्ण करणारे पूर्णाक्षर. याच पुस्तकाची उकल करावयाची आहे. हाच ग्रं चा धडा वाचावयाचा आहे. हेच पुस्तक उघडावयाचे आहे. नी कसे आहे हे पुस्तक, तर या पुस्तकात प्रश्नच नाहीत. यात आहेत ती केवळ उत्तरे-उत्तरांचे धडे. अशा या ग्रं च्या ललाटावर या श्रीजिवति आई, जीवति माता, मूल लन्मास आल्यानंतर पाचव्या दिवशी लिहीतात. पूर्वीच्याकाळी संस्कारच असे तो. कुलधर्मापेक्षाही मोठा. कारण जो जन्मला, ज्या कुळात त्याची नामधारणा झाली. त्या कुळाचा धर्म ज्यास ज्ञात आहे. त्याकुळात येउन काय करायाचे, हे जो ऐकून आला आहे. त्याच्या जन्माचा सोहळा म्हणिजे ही पाचवी. काय करायाचे आहे पृथ्वीवर जाऊन, हे सांगणाराचें तर शोधायचा आहे. हे असे 'श्रवण' आपणही ऐकून आलो आहोत. श्रीमत् गंथराजास श्रीगुरुशिष्य संवादातून आपल्यापुढे हेच श्रवण तर आणायाचे आहे. दुसरे काहीच प्रयोजन नाही श्रीसमर्थांचे. एवढेच की, हे बाळा-लेकरा-वत्सा-सुज्ञा-

मुला-भाग्या-सौभाग्या-चिरंजीवा-अमोलिकहिऱ्या-माणिका-मोत्या-आनंदा-ऐश्वर्या, आठवते का? स्मरते का? तेव्हा जे तव कर्णि वोपिले, ते स्मरते का तुजला काही..

श्रीराम लागले कर्णी..जाहले हितगुज तेथ क्षणभरी
वोतिल्या ग्रं घागरी ज्या हृदयी..स्वये आणूनिया श्रीहरीनी
ते तिर्थ मनोहारी,..तो घडा तुजजवळी
बाळा जाई यमुनेवरी..तेथे सर्वत्र विवरी
तु भरुन घागर येथिली..वोपी त्या तिर्थामधूनी
होईल उदकी तुज..तुझेच बाळा दर्शन
उमगशिल तेव्हा बाळा..पाहुनिया प्रतिबिंबाला
जयाने वोपिले कर्णी ज्ञाना..मी जैसाचि तैसाचि
तोचि तो रघुनंदन आत्मा..

म्हणून याचे स्मरण हवे. काय काय जीवास बोधविले त्याचे स्मरण हवे. म्हणून भक्तीच्या नवविध पायऱ्यांमधील ही पहीली पायरी, श्रवण. 'पायरी' हा आकार आपल्या कानाच्या वरती असतो. बिग्बाळी किंवा 'सोनमोरणी' अशाप्रकारचा सोने व चांदी नी तांबे स्पष्ट मीश्रित दागिना घालतात ती जागा. ती जागा म्हणिजे पायरी. साऱ्या नवविधेतील पायऱ्या तेथूनच चढायाच्या आहेत. हा विषय सविस्तर नवविधा भक्तीत येणारच आहे. म्हणूनच कशी ही पायरी-कुठून चढायला सुरवात कर, हे सांगणारी; त्याचे स्मरण देणारी ही पाचवी होय. आता ही पाचवी कोण? दिसेना परंतु लिहीले नाना । न वाचिता ये, ना कळे मना । सोडवा ग्रंथी या दावाखुणा। श्रीस्वामिन् गजानना रामराया रामदासा ।।

श्रीसमर्थ ही उकल करीत आहेत. गाठी बांधिलेले दावित आहेत. बघूया पाचवी जे इतरत्र लिहीते ती संकेतचिन्हे. कानाची 'पाळ' हे पहिले संकेतचिन्ह. या पाचवी बरोबर सातजणी असतात. यासच श्रीमाऊली साता-पाचांचा मेळा असे म्हणतात. सात-पाच-तीन-दशकांचा मेळा..एकतत्वी कळा दावी हरी. ज्यास आपण साती आसरा कींवा तळ्यातील देवता-जलपऱ्या-मत्स्यकन्या-जलदेवता-पाण्याच्या काठी

वस्ती करणाऱ्या-नवस करणाऱ्या-कहाणितून भेटणाऱ्या-वसा वसणाऱ्या, असे म्हणतो त्या इजबरोबर पाचवी पूजनाचे दिवसी येतात. आता इथे प्रश्न नको पडायाला की या साती आसरा कोण ते म्हणून. कारण यांची नी आपली ओळख खूप पूर्विची आहे. लहानपणीची आहे. लहानमुलास पाण्याची फार ओढ असते. त्यास पाण्यात खेळणे फार आवडते. आपण हे सारे विसरुन गेलो आहोत. मोठे झालो म्हणिजे काय तर अधिक विस्मरणात गेलो झाले आपणच आपल्या. आपली सारी शक्ती-युक्ती विसरलो. न धरी शस्त्र करी..गोष्टी सांगेन युक्तीच्या चार..म्हणिजे जाणायाचे काय, की युद्ध नको आहे. श्रीभगवंत म्हणतात, मी शस्त्र धरणार नाही. त्याची जरुरीच नाही. नीट अभ्यास केला तर मैत्रच आहे सर्वत्र व्याप्त. युक्तिचीये खोली जाणायाला मति तशी हवी. ती प्राप्त करण्यासाठी तर 'ग्रं' ची उपपत्ती. दुसरी संकेत खुण स्कंधावर-तिसरी मानेच्या मागे प्रथम पेड पडतो तिथे. चौथी जानुवर, म्हणिजेच गुडघ्यावर. पाचवी पोटरीच्या मागे. म्हणजे गुडघ्याच्या मागे पोटरीशी एक खोलगट भाग आहे ती जागा. श्रीसमर्थांनी श्री कल्याणांस आम्ररस चाखविला ती जागा. पाचवी हाताचे कोपरे. सहावी मनगटे. नी सातवी तर्जनीच्या नखाखालचा कोमल भाग. याची फोड नंतर करु या. पण या सर्व संकेतस्थलांचा स्थलनिर्देश हा पाचव्या दिवशीच बालकास होतो. पुढे त्याचे पाय उचलणे. टाचा उचलणे म्हणिजे ज्यास पायाची सायकल मूल करते असे आपण म्हणतो ते. कुशीवर वळणे. स्वतःस पूर्ण उपडे करणे. म्हणिजेच पालथे पडणे. पहिला श्रीभूमिस साष्टांग दंडवत. ती तारीख, तिची ती वेळ-वार महत्वाचा. त्याचा जीवास पुढे लाभ होणार आहे. पाठ टेकणे म्हणिजे चीत होणे-हारणे. नी छाती धरणीस टेकणे-लागणे म्हणिजेच पट होणे-जिंकणे. बालकाची बालकानेच घेतिलेली ही पट. त्याचा पट उलगडणारी असते-ठरते. किती महत्वाचा तो क्षण की काळाची पाठ टेकवून त्याच्या छातिवर बसलेला हा जीव. काळाग्नी काळरुद्राग्नी..देखता कापती भये. कसे सूत्र आहे हे. भावबळे आकळे..येऱ्हवी ना कळे. ज्ञानियांचाराजा गुरुमहाराव..असे म्हणणाऱ्या श्रीतुकाराममहाराजांनी याच याच अर्थाने आपल्या या अभंगाचे

शेवटचे चरण लिहीले की तुका म्हणे नेणो युक्तिचीये खोली..म्हणुनी ठेविली पायी डोई. कोण जाणे ही 'युक्ती' काय आहे ती. कोणत्या मुक्तिचा हा समारंभ आहे. कोणत्या सुखाचा हा पर्वकाळ आहे की बाळानी पट घेतिली. त्यास ही पट उमगली-ही सातपटे. तीच ही सातवी तर्जनी. ती टेकते धरणीस हे पट होण्यानी. फार विलक्षण नी सुंदर 'ग्रंथ' आहे आपला सर्वांचाच. अभेद आहे हा पूर्णपणे. आपणही हे अभेद सूत्रातूनच घ्यायाचे समजून-उमजून. बाकी डोक्यातिल सारे बाजूला टाकून देऊन याकडे बघावयाचे. हे समजून-जाणून घ्यावयाचे आहे. कारण आपणांस अभ्यास करावयाचा आहे. हुशार व्हायाचे आहे. कीती कीती उपकार आहेत श्रीसमर्थांचे आपल्यावर. अभ्यास केला नाही तर श्रींना आवडणार नाही हे असे. रघुनाथ हा हेत जाणे मनाचा । सदा सर्वदा साक्ष सर्वेजनाचा ।। या साक्षित्वाची उमज पडावयालाच हवी. असे हे १२ वे-बारसे. १२ वाजण्यापूर्वीचे 'अकर'-समजून-जाणून-आचरणात यावयाला हवेत.

..बारावे संकष्ट - संरक्ष..

आता बारावे कष्ट संरक्ष. स्वत:स सुरक्षित ठेविण्याचे सर्व तंत्र उपलब्ध असतानाही ते न जाणिताच सोडून देऊन, आपणच आपला घात करुन घेण्यानी हे कष्ट जीवास पडतात. आपणच आपल्या पायावर धोंडा पाडून घेणे. सगळ्याची पुढे राख होणार आहे, सर्व संग्रहाचा वत्सा नाश हाचि अंत..असे जर पुढे आहे, हेच जर पुढे दिसत आहे, तर? तर आपल्या हातात काय आहे हे शोधायाला नको का? हात आहेत, नी हातात काहीच नाही असे होईलच कसे? या ग्रं सूत्रामधून त्या जगन्नियंत्यावरचा पूर्ण विश्वासच हातात काय आहे ते दाखवितो आहे नां. भेटवितो आहे नां. श्रीभगवंतांच्या सहस्त्रभुजांमधील त्यांचा सर्वात प्रिय-लाडका कर कोणता, तर 'तो, जो मैत्री' करीता पुढे होतो. 'अकरा' मधील ही पहिली एकादशी होय. जीवाचे एकंदरीत सरासरी १०० वर्षाचे आर्युमान जर धरीले. म्हणिजेच 'आयुषमन' धरीले. नीआयुषमन म्हणिजे कुश-दर्भ होय. दुसरे आयुषमन म्हणिजे कुशसम्मन-आवळा. नी आवळा म्हणिजेच ष्मानपर्ण होय. वाढ-वृद्धि करणारे-वाढविणारे. अशी ही पर्णराशी आहे. जसे अश्वत्थावर

श्रीभगवंतांचे शयन असते. तसेच जीवाचे या आवळ्याच्या पर्णावर सारे असते. चिंचेपेक्षाही यास फार बारीक पाने असतात. परंतु अजून जीव या आयुष्यमानापर्यंत पोहोचलेलाच नाही. तो अजून चिंचेवरच आहे. कारण डोहाळे लागले की चिंच खाविशी वाटणे हे प्रारंभिक लक्षण असते दिवस गेल्याचे. आयुष्याची १००-शंभर वर्षे म्हणूनच घेतिली आहेत. की एक गोष्ट कळायाला, म्हणजेच श्रीभगवंत कळायाला साधारण किती कालावधी लागतो तर, शंभरवर्षांचा. म्हणिजे एवढ्या कालावधीत त्यास ओळखायाचे असते. एवढे आयुष्य नरजन्मात जीवास लाभते. हे सारे याकरीता श्रीसमर्थ आपणास सांगत आहेत की, १०० वर्ष जगणे म्हणिजे आयु-आयुष्य असे संबोधन या शंभरवर्षे जगण्याचे आहे. दिर्घ-दीर्घायु म्हणिजे १०० ते १००० वर्ष जगणे होय. नी १००० चे पुढे कितीही जगला तर त्यास आयुष्मान म्हणण्याची पद्धती आहे. म्हणिजे १००० चे पुढे इच्छेनी गंतव्य आहे. श्रीपितामहांचे उदाहरण येथे आपणांस घेता येईल. ते इच्छामरणी होते. म्हणिजेच ते आयुष्मान होते. यावरुनच आपले ज्येष्ठ आपणांस आयुष्मान भव..असा आशिर्वाद देत असतात. त्यापाठीमागे निश्चितच हा अर्थ आहे. या साऱ्यातून आपण काय घ्यावयाचे? तर स्मरण-स्मृती किती दीर्घ त्यावर हे सारे आयुष्याचे गणित अवलंबून आहे. कारण एक १२ म्हणिजे जाण्याची तयारी. दुसरे घर-दुसरे वस्त्र-दुसरी योनीप्राप्ती. एक १२ म्हणिजे आल्यावरची तयारी. जे वसन-वस्त्र लाभले त्याचा सन्मान. म्हणजेच पाळणा-झोळणा-खेळणा-तोळणा-मळणा-वळणा-पाहणा-देखणा-डोळा-गोळा-काळा-पोळा-छोटा-वाळा-चाळा-बाळा-क्षाळा-माळा-लळा-पाळा-भाळा-खळा-फळा-गळा-दळा-मळा-हे सारे बाळाचे-बाळासाठीचे. बाळपणीचे हे सारे. बाळलेणी ही सारी. तोळणा म्हणिजे गोविंद घ्या, गोपाळ घ्या. बाळाच्या स्मरणाची कुणाशी तुलना तर या साऱ्यांशी. गोविंद-गोपाळ-कृष्ण-माधव अशासाऱ्यांशी. तेव्हा हे सारे उच्चीचे संदर्भ घेतिले जातात. छान छान पाळणे गायिले जातात. मौजमजा साखर वाटणी होते. म्हणिजे बाळ आल्यावर मुखात गोडघास पडतो. जन्मतःच जो साखर वाटतो. साखर जाणितो. गोडीस उमगतो. त्याचे तोंड कडू

पडणे, कुठेच-कधीच-कशानेच शक्य आहे का? विचार शोध नको का याबाबत..! खूप खोलवर अंर्तमुख होऊन विचार करावयास हवा आपण. आधी गोपा पाळण्यात ठेवितात. तेव्हा त्याची आधी दृष्ट काढतात. कारण का, तर एकदम कुणाची बाळावर नजर नको म्हणून. त्यास कुणाची दृष्ट होउ नये म्हणून. चला-छळा-जळा-ढळा, असे हे सारे टळा चे बाजूस टाकणे म्हणजे दृष्ट काढणे होय. अशी दृष्ट काढून टाकून गोपा ठेवून मग बाळाचे आगमन करवितात. सजविलेल्या पाळण्यात त्यास अंगडे टोपडे लेववून निजवितात. तिटी काजळ सारे घरचे. विकतचे काही नाहीच. तिट तेव्हा जी लावली जायाची, ती लोण्यात काजळ कालवून लावली जायाची. शुद्ध दूध-शुध्द लोणी-तूप. काजळी तांब्याच्या भांड्यावर कापराने धरुन केलेली-काढलेली असे. ताज्या गुलाबाच्या पाकळ्यांवर तांब्या ठेवायाचा. नी कापूर जाळून काजळी धरायाची. नंतर ती खलायाची. तिही मधल्या बोटाने-का तर बाळांस जी दृष्टी हवी ती अग्निप्रमाणे तेजस्वी-स्पष्ट-स्वच्छ नी सत्य दिसावे म्हणून हवी असते. गोड गोड देवाचे गोडगोड मूल. आईचे बाळ. आप्तइष्टांचे लाडके. मायभूचे प्रणेते-देशाचे उध्वर्यू असे ते स्वयंनारायणु..जो जो बाळा जो जो रे जु. किती छान ग्रंथ आहे हा आपला. १० व्यातून ११ व्यात. नी नंतर बारशात आलेला. बारसे आपण म्हणतो. श्रीसमर्थ यास 'अनुस्वरण-अनुस्वर्ण' म्हणतात. म्हणिजेच ग्रं च्या या तिवईवर-या झोळीत, बिंदुरुप जीव जोजविणे. नी हा आपणासाठी केलेला पाळणा कसा आहे बघा. जीवास ज्ञानरुप पाळणा करणे. विवेकाचे अंगडे. प्रेमाचे टोपडे. सोन्याचा घास. नी जो बाळा जो जो रे जो..

ड डणचा केला झोका तुवा..बाळा सुंदरसा
वरी मऊशी बाळा गादी..उशी आणिली क्षीराहूनी..
न्हाणिते, यशोदा बाळा तुला..अमृत घंगाळा..
पुशियेले कौसल्येने स्वये..बाळा श्रीरुपडे..
अंगडे हे सुंदरसे लडिवाळे आणिले पार्वतीने..
शिव म्हणती घाला कुंची वरती..हा अमुचा श्रीपती..
आले रे श्रीगणेश जोजावाया..मूषकी बैसोनिया..

वरी पंखा करी रे तुज शारदा..बाळा, उघडी नेत्रांला..
कार्तिक ते आले भेटावया..बाळा नाचिवरे मयूरा..
चोखणी ही नवग्रह सदनाहूनी..बाळा तूजसाठी
शशीसूर्ये तारांगण खेळणा..बाळा झोळीवरी
सटवाई हसवी बाळा तुला..दावूनी कर्तृत्वा..
हसविती तुजला बाळा यती..चिर सौख्याच्या राशी..
होवो नां दृष्ट ही बाळा कधी..ही अलाबला टाकीली..
तुवा दिधले राज्य हे दशअवतारी..तु बा साच करी..
रक्षी रे रक्षी या तू ब्रिदा..बापरखुमाईच्या मुला..
किती थोर, थोर ती मांदीयाळी..आली जोजावया..
नवविध ते केले सूत्रचि बाळा..करी ते कपिवरांच्या..
हुंकारा देई बाळा सदा..जाणी रामकार्या
स्वानंदे जोजवी..अंजनी तुजला..बाळा केसरीया..
कीती पापे घेऊ बाळाचे या..हसवी हा मजला
सुखसौख्य रामराज्य घरा..वेणितुलसी दारा..

किती किती उच्चिचा भाव आहे हा. कशावर पहुडला आहे बाळ, कीती नी कुठल्या उंचीवर. जोजविताना जर हा उच्चिचा भाव आहे, तर पुढे उभा राहील्यावर? याहीपेक्षा वर चढेल. मेरु-मांदार धाकुटे करील. म्हणिजेच अभेद अशी ही घडण आहे. हीच घडण न जाणण्याने फेरे पडतात. पुन्हा बाराचे पाढे-१२-२४-३६-४८-६०-७२-८४ एवढेच गणित. फीरफीरोनी १२ह्ल७=८४ येथपर्यंतच. पुढे-१२ह्ल८=९६, ९+६=१५ ही पौर्णिमा नाहीच. बघणे-कळणे नाहीच. म्हणून जाणायाचे-जाणण्याचे हे सुत्र श्रीसमर्थ आपणांस उलगडून देत आहेत. ग्रं परिचय करुन देत आहेत. कोणत्या तिवईवर म्हणिजेच कोणत्या आधारावर. जीवबिंदु आहे बघा. आठवा-स्मरा. व्हा सावध. जागा..जागा स्वरुपी जागा. नी स्वरुपाचा शोध आपला आपणचि घ्या.

हुशार भाई हुशार । अवघी असावे खर्बदार ।
काळोखी वाढताहे फार। एकी एक दिसेना ।।

चोरांचे कळप फिरती । अवचित दगा देती ।
निजो नका जागविती । मी दिवट्या साहेबाचा ।।
मी हराम नव्हे साहेबाचा । नफर इतबाराचा ।
मज राती जागण्याचा हुद्दा दिधला ।। मी सारी रात जागतो ।
अठरा महालाची खबर घेतो । साही नजरेत राखतो ।
मनी धरीतो चहुचे गुणं ।। जे जे झोपेने पिडले ।
ते ते अवघेची नाडले । यम यातनेशी जुडले । पाहुणेरे घ्यावया।।
अरे जागा स्वरुपी जागा । मुक्तीचा सोहळा भोगा ।
कर्म आपुलिये अंगा । लागोचि नेदावे ।।
रावण निजेने भ्रमला । कुलक्षय करुनी शोकी पडीला ।
मग म्यां खबरदार केला । मग झाला रामरुपी ।।
ऐसे ऐकोनी दृष्टांत। सावध करोनी करा स्वहीत ।
तरि आपुले फळ भोगा समस्त । मी सांगतोजी ।।
मी सांगतो उतराई । कोणापाशी काही मागत नाही ।
परोपकारास्तव पाही । हुशार करितो ।।
ऐसे दिवटा जाय बोलोनी । हिशेब घाली हाक देवूनि ।
दास म्हणे दिवट्या मानी । तोचि तरला मोहराती ।।

जीविचे हित करण्या कारण, किती किती रुपे श्रीश्रीसमर्थांनी घेतिली. देह धरुन वानरी । अखंड दास्य मी करी ।। शरीररुपी वस्त्रास किंमत देतोस। नी आत्म्यास विसरतोस ।। बघा किती रुपे श्रीमहाबली-श्रीसमर्थ-श्रीगजानन महाराज यांनी जनहितार्थ घेतिली. साऱ्यांचे एकच सांगणे, हुशार होणे. चुकवी गाऱ्हाणे बाराचे. म्हणूनी जोजविले पाळणे. स्मरण राखणे पुत्रा.

**..तेरावे संकष्ट - संकष्टी..**

आता १३ वे संकष्ट म्हणिजेच संकष्टी होय. क म्हणिजे मस्तक स्वरुप. कारण कष्ट निवारण हेतु जी बुद्धी दिली ती मस्तकात वसते. बुद्धीत कष्ट निवारण्याची सारी योजना आहे. परंतु तेच जाणण्याचे कष्ट न घेतिल्याने हे कष्ट जीवास पडतात. कष्ट म्हणिजे कसोटी. कसोटीचा दगड. सोन्याचा खरे खोटे पाहण्याचा दगड. शेवटी सोन्यास कुणास

परीक्षा द्यावी लागते. कोण सोन्याची परीक्षा घेतो. कोण त्यापुढे पेच टाकतो? तर दगड. घासून उजळलं तर सोनं. काळं पडलं तर भेसळ-भंगार. लोखंडासी 'भांगार'। परीस करुनी ठेवितसे ।। आयुष्यभर परीस जवळ असूनही लोखंडच सांभाळीत बसलो. पण त्या परीसास लागून-पाहून-मिळून सोने नाही करुन घेता आले. नी सारे कष्ट वाया घालविले. उगेच जननी कष्टविली. म्हणून कष्ट. नेमक्या परीक्षेच्या वेळी व्याधिग्रस्त-चिंताग्रस्त-भयग्रस्त-आपद्ग्रस्त-ग्रहण लागणे, असे कष्ट या सद्रात जीवास भोगावे लागतात. असे व्हायला नको. म्हणून तर श्रीनामदेव महाराज व इतर श्रीसंत मंडळींस या परीक्षेचेचवेळी श्रीगुरुंची आवश्यकता कीती, हे श्रीगोरा कुंभारांनी सांगितले. नी श्रीगोरा कुंभारांनी कशाने परीक्षा घेतली सार्‍यांची. तर 'घट', घडला की नाही ते पहाणार्‍या धोपटण्याने. नी ते धोपाटणे हे कपड्याचे धुपाटणे नव्हे. तर उजव्या हाताची तर्जनी वाकडी करुन-त्यातून नाद घेतिला. जो घडला, त्याचा नाद स्वरातून आला. बाकी पिचका. कारण पिचक्याचा स्वरचि वेगळा. हातातील कांकणे सुंदर-सुंदर असतात. परंतु त्यातील एकजरी पिचले तरी लगेचच आवाज कळतो. नी आपल्या वाडवडीलांचे म्हणणे असे की-बांगडी जर मधली पिचली तर भावास त्रास होतो. पहिलीच पिचली तर पुत्रास त्रास संभवतो. त्रास म्हणिजे संकट नव्हे, काही किरकोळ उद्भव घडतात. पण बुद्धीने सोडविता येतिल असेच हे असतात. आपणास फक्त 'पिचका' म्हणिजे कसा या नादाशी स्मरणसूत्र जोडायाचे म्हणून हे सारे सांगणे. या संकष्टांमधून श्रीगुरुसेवा-श्रीगुरुआदेश जीवाची सुटका करीतात. श्रीगुरुंचे महत्व विशेषे करुन आहेच आहे. परंतु बर्‍याच ठिकाणी सुर दिसतो की, श्रीगुरुंची काय आवश्यकता..आपणही सुरात सुर मिसळू की नाही आवश्यकता. पण बघा आपण अयोनी जन्मा आलो. नी चार खांद्याशिवाय गेलो. तर खरोखरच श्रीगुरुंची आवश्यकता नाही. परंतु थोडा विचार केला, अंतर्मनात जर शोध केला. त्या वेदपुराणे-शास्त्रे-उपशास्त्रे म्हणिजे उपनिषदे यांकडे जरा लक्ष वळवून पाहिले, आठविले, स्मरीले नी आता सुत्रजोड उकलली असेल-झाली असेल, तर बघा की, श्रीदेवांचे श्रीगुरु बृहस्पति आहेत. श्रीरामरायांनी

मानव अवतारात श्रीवसिष्ठांस आपुले श्रीगुरुस्थान दिधले. श्रीश्रीकृष्णांनी श्रीसांदिपनींस श्रीगुरुस्थानी बैसविले. मग आपण कोण असे म्हणणारे? आहोतच काय नी कोण आपण हे असे म्हणणारे. म्हणूनच एका बाजूने विचार नाही करायाचा. कारण नाव कलेल. एका बाजूने नाहीच बसायाचे. सम हवे सारे. नी मी खीर खाल्ली तर बुड घागरी, हा धोका आहेच आहे. भुकेनेच-वासनेनेच घात केला मांजरीचा. पण मग आता मांजरीच्या गळ्यात घंटा कोण बांधणार?हा वाक्प्रयोग आपण बऱ्याच वेळा ऐकला असेल. अतिशय कठीण वाटणाऱ्या प्रसंगी हा वाक्प्रयोग करीतात. पण म्हणजे नक्की काय आहे हे? मांजर नी घंटा? का मांजर नी नाद? का मांजर नी पूजा? का मांजर नी धोका? का मांजर नी उंदीर? की मांजर नी दूध? की मांजर नी बुद्धी? या साऱ्या प्रश्नांच्या मालिकेतून नक्की काय उत्तरसूत्र काढायाचे? मांजर आपल्या पिल्लांना जन्मदिल्यानंतर सातदिवस वेगवेगळ्या ठिकाणी फिरविते. एकाच ठिकाणी फार काळ ती पिल्लांस ठेवित नाही. म्हणजे एक रात्रही एका ठिकाणी ठेवित नाही. श्रीमहात्मा गांधींनी मांजरीस आदर्श शिक्षिका असे म्हंटले आहे. या सातदिवसात आपल्या पिल्लांना ती या जनलोकाचे तसेच या पृथेचे ज्ञान देताना ती सर्वप्रथम चालायला शिकवीत नाही. तर उड्या मारायला शिकविते. कसे? तर कीतिही उंचावरुन पडले तरी पायावरच पडतिल, असे उडीतिल कौशल्य ती आपल्या पिलास शिकविते. उडी मारताना शरीरास हलकेपणा देणे. वजनरहीत करणे, हे ती शिकविते. तसेच ज्या ठिकाणाहून ती स्वत:चे मस्तक बाहेर काढू शकते, त्याच ठिकाणाहून ती स्वत:चे संपूर्ण शरीरही बाहेर काढू शकते. फारसे काही वाटणार नाही आपणास याचे. पण बघा ग्रं शेवटी साऱ्यांचाच आहे. एकट्या मानवाचा तो नाही. श्रीसमर्थ श्रीमुख्यदेव-श्रीकपिवर-श्रीगजाननमहाराज या संपूर्ण विश्वास एक शितस्वरुप समजतात. या संपूर्ण जीवाच्या उत्पत्तिचे बीज स्वरुपच ते ग्रं. याच ग्रं ची या सर्व जगत्रयाकरीताच ते फोड करीतात. म्हणूनच हा फक्त जीवासाठीचा केवळ भाग नव्हे. म्हणजे काय, तर 'नर' योनीबरोबरच या १२x७=८४ लक्षयोनी पृथ्वीवरच जन्म घेउन वावरतात. नी आपापले कर्म

गाठोडे फेडून भले करुन नूतनवस्त्री जातात. करुन घेत नाही भले तो मानवच. भले शाबास. श्रीकृष्णांना गोधन नी श्रीरामरायांना मरुतधन प्रिय झाले. मत्स्य-कूर्म-वराह-नृसिंह या प्रथमावतारांमधे तरी काय सूत्र आहे?आहे कोण प्रिय त्यांना बघा. कां प्रिय..? अभ्यास याचाच हवा. लक्ष हवे. पूर्ण ध्यान-भान हवे. या ग्रं मध्ये सारेच व्याप्त-परीव्याप्त-परीलुप्त-अव्यक्त आहे. पुढे वामन-परशुराम या अवतारात तर परशुच प्रिय ठरला. म्हणून हे ग्रं सूत्र यच्चयावत् ८४ लक्षयोनींसाठी आहे. साऱ्यांचे बीजाक्षर एकसारखेच आहे. साधर्म्य-साम्य-सम-एक-ऐक्य-अभेद-अखंड-निरंजन असे आहे ते बीजाक्षर. चंदन जेवी भरला..अश्वत्थ फुलला..तैसा म्यां देखिला..निराकार वो माये..असा तो. अधिक देखणा..निरंजन-देहुडा श्रीभगवंत. तो सर्व व्याप्त आहे. नी तोच तू आहेस. तूच तो आहेस. साऱ्या सुत्रातील तोच तो. सर्वांचेच आत्मतत्व एकच-एकरुपच आहे. म्हणूनच मांजर-मार्जार हे ही या ग्रं चे भागीदार आहेत. मांजर हा योगकला जाणणारा प्राणि आहे. आणिमा-लघिमा या सिद्धीही हा प्राणी जाणतो. परंतु या सिद्धी म्हणिजे योगमार्गातील फसवी मोहरात्र होय. फसवी पायरी होय. जीथून पतन-घसरण-उतरण-ठेच-अध:पतन-शंका-संभव-भय-भिती, हे सारे धोके संभवतात. सावधपण नेमके याच पायरीशी आवश्यक असते. नी येथेच थांबले जात नाही. म्हणिजे हे सावध इत्यादीचे संकेत ऐकण्यासच थांबले जात नाही. जीवास वाटते, झालो आपण योगी. पण हा तर पुढचा भोगी आहे. योग याग विधी..येणे नोहे सिद्धी..वायाची उपाधि दंभधर्म..या. गोष्टींवर फळा रंगला पाहीजे. म्हणिजे मोठा धडा घेतिला पाहीजे यातून. कानाला खडा असा धडा. कारण तसा तो घेणे म्हणिजेच फळा रंगविणे होय. नी फळा म्हणिजे आपला अनुभव. पण शाळेत असे होते की फळ्यापासून जर लांब बसले तर फळा चमकतो. नी पुढचे लिहिलेले काहीच दिसत नाही. तसेच या पायरीशी होते की, तो सिद्धींचा चकचकाट थक्क करतो. स्वत:सही व इतरांसही चक्कीत करतो. नी त्या पायरीपुढेच अगदी जवळजवळ तिथेच असलेले श्रीभगवंताचे स्थान या चकचकाटात दिसायाचे राहून जाते. असंभाव्य असती सर्प..हिम झाकोनी घेती..श्रीभगवत्

सदनाचे वर्णन श्रीमद् ग्रंथराजात श्रीसमर्थांनी केलेले आहेच. ते आपण पुढे बघणारच आहोत. या सिद्धींनुसारच मांजर सातघरे पिलांस फिरविते.

सर्व योग-याग-विधी-नेम-नियम-श्रीईश्वरधारणा जाणणारी-जाणती-ज्ञानी-विरक्त-प्रेमळ-सर्व कला-विद्यांची जाणती-पूर्ण संपूर्ण वाहीनी अशी जर कोण संपूर्णा-सगुणा-सुंदरा असेल तर ती आपली पृथा आहे. गोमाता आहे. ते ग स्थान-ते ग्रं स्थानच समजून घेणे आवश्यक आहे. श्रीमंतयोगी 'गो'माता. गायच व्हावयाचे होते या मांजरीला, परंतु या योगमार्गात अलिकडच्याच पायरीवर थांबलेली, सिद्धीच्या अहंकाराने सर्व सत्यसौख्यापासून दुरावलेली नी गाय होता होता जी राहिली ती ही मांजर.. म्हणिजेच मार्जार होय. दुध पिता आले, पण गाय होता आले नाही जीला, तिला कोण सांगणार? सिद्धी प्राप्ती झाल्यावर, त्या मोहापुढे श्रीभगवंतांचे स्मरणही जियेस राहीले नाही. जियेने राखिले नाही. त्या कर्माचा हा परिपाक होय. मार्जारयोनी. तेथपर्यंत तो सांगणारा होता. तीही ऐकणारी होती. आदेश पाळणारी होती. पण पुढेच अहं फुटला. मी जागला नी घोटाळा झाला. हिने श्रीभवानींचे श्रीदेवींचे वाहन पाहिलेले आहे.

व्याघ्रांबर देखिले डोळा..अवलोकीले स्वतःला..
भस्मस्फुट देखियले व्याघ्र अंगी..स्वये आपुले मानी रुप तेचि
गेली धावून व्याघ्रावर..व्याघ्रे पंजा मारीला थोर..
घाबरली..फिस्कारीली..फेस आला मुखासि
व्याघ्रे देखियेले भयानक..देव्ये रक्षियेले तिजला तेथ..
घाबरले मार्जार अंतर..देव्ये दिधले अभय..
सात पावले माघारा जा..सातव्यावरी घंटा नाद..
ऐकीता होशी पूर्ववत..पुन्हा न यावे या धामाप्रत..जा काळे करी..

तेव्हापासून मांजर काळी असते. परंतु ती कोठपर्यंत श्रीगुरुंसोबत होती बघा. तिने मधेच ही सोबत-हे ज्ञान सोडून दिले नी अहंकाराचा गर्व फुगारा घेतला. यास काय सांगणे सांगा. म्हणून मांजराच्या गळ्यात घंटा कुणी बांधायाची? मांजर सर्व जाणूनही, एवढ्या उंचीवरुनही खाली आली. अधःपतित जाहली. जिला स्वहीत होता कळले नाही. तीस आता कोण

सांगणार. नी आता ती ते ज्ञान शोधिते आहे. ते श्रीज्ञानेश्वर शोधिते आहे. श्रीगजानन शोधिते आहे. म्हणून मुषकाचे मागे धावते सारखी. श्रीगजाननांचे वाहन आहे नां ते. तेवढेच स्मरण आहे तिला. पुढचेच आठवत नाही तिजला. पंजा मारते मांजर. कारण ती व्याघ्राकडून ती शिकली आहे. तो वाघाचा पंजा तिने पाहिलेला आहे. तेच वाघाचे रुप तिच्या मनीमानसी ठसावले. त्यामुळे ती तसाच पंजा मारते. अंधारात इयेची भिती वाटते. इस वाघाची मावशी म्हणतात ते याचमुळे. अज्ञानवश ही मुषकास खाते. म्हणजे एकूण काय, तर शुभ्र-धवल-स्वच्छ असे दूध हिस कळते. भावते. पण तेथपर्यंतच. पुन्हा कर्मवश-पूर्व कर्मवश त्या धवलारीवर पट पडतो. पुटे चढतात. झाकोळून येते. पडदा पडतो. नी ते सारे विसरुन त्या ज्ञानवहनास त्या मूषकास ती भक्षण करीते. म्हणूनच असे काळे-पांढरे, आत एक-बाहेर एक, ध चा मा. असे वागल्याने जे कष्ट जीवास परिणाम स्वरुप भोगावे लागतात ते हे संकष्ट होत. या संकष्टातून तारावया-या संकटातून सोडावावया-या संकटातून मोहबंधनातून विमुक्त होण्याला, धरावे ते पाय आधीआधी. करा तातडी..त्वरा..लवलाही..श्रीगुरुपायी ठेवी डोई..हेच महत्वाचे. अनुग्रह होणे. श्रीगुरु उमगणे हिच ज्ञानसृष्टी. हाच तो स्वर्ग. ज्यात केवळ आनंद आहे. ही सारी सृष्टी कळणे अवघड नाही. जे तुझ्या ग्रंथात तेच तयांच्या. पण सारे अज्ञानवश कोडे झाले. गुढ झाले. अवघड झाले. असाध्य वाटू लागले. परंतु बघा कारण १० या स्थानापासून ११ या स्थानापर्यंत गेल्याशिवाय का १२ मिळाले. आता १२ नंतर दोनच पायऱ्या १३-१४ की १५ पंधरावी पौर्णिमा. को जागरति? कोण जागे आहे बघा. जो जागा त्यानेच दुधात चंद्र बघावा. म्हणिजेच सर्व कला त्यासी प्राप्त होतिल. अनंतकोटी ब्रह्मांडनायक महाराजाधिराज योगीराज परब्रह्म सच्चिदानंद भक्तप्रतिपालक नुपेक्षी कदा राम दासाभिमानी.. असा श्रीराजाराम रघुनंदन श्रीराम. त्यास-त्याला भेटण्याची कला. ती 'चंद्रकला'. प्रतिपदा ते पौर्णिमा-प्रतिपदा ते अमावास्या अशी ही चंद्रकला. तीस दिवसांची तीस कलांची शाळा. त्यातील धडे शिकविणारे हे संकष्ट. पुस्तक किती सुंदर आहे बघा. ज्यांनी लिहीले ते श्रीसमर्थ. अभ्यास करावयाचा आहे धवलतेचा.

त्या ग रसाचा. ग्रं रसाचा. ज्यांनी या ज्ञानदुग्धावर पोषण केले जीवाचे. जीवासाठी या सहस्त्रामृतधारा दिधल्या, त्यांचाच अभ्यास करायाला हवा. तेच जाणायाला हवे. काय जीव सुखाचा बघा. खरा राजहंस, ज्याने जाणिला तो परमहंस. पाणी वेगळे करुन केवळ दूध जाणणारा. अशा त्याचा म्हणिजेच जीवाचा हात धरुन, त्याचे बोट धरुन श्रीसमर्थ फिरविताहेत. हे ज्ञानप्रांत. किती छान. श्रीसमर्थांचे बोट कधीच सोडायाचे नाही. त्यांनी धरीले करास म्हणोनिया आपण सुख सौख्यात. बघा आपण आईचे बोट धरणे, हा भाव भिती दर्शविती. नी आईने आपले बोट धरणे हा भाव काळजी दर्शविती. आईस बाळाची काळजी आहे. नी बालक निर्धास्त त्यामुळे. कुठल्या भावनेने आहोत आई जवळ आपण. आई हवी. मग काळजी नाही. बालपणाचा काळ सुखाचा. लहानपण देगा देवा-मुंगी साखरेचा रवा. मुंगीस साखर, एवढी सुक्ष्मता दे. मांजरीस योग कला आली नी ती आणिमा-गरिमापर्यंत पोहोचलीही. परंतु अहंकारे बुडाली. तसे अमुचे होऊ नये. निजेने घोरो लागू, एवढेही नको मंद ठेवू. तर सान ठेव. सानुले झोपले तरीही आईचे लक्ष असते. बाळ झोपल्यावरही लक्ष आईचे नी उठल्यावरही लक्ष तियेचे. निजल्या तान्ह्यावरी माऊली दृष्टी सारखी धरी..तिचा कलिजा पदरी निजला..जीवापलिकडे जपे त्याजला..कुरवाळूनी चिमण्या राजाला. चुंबी वरचेवरी, किती छान.

अजूनही जर हे सूत्र धरीले तरी श्रीसमर्थ पावले आपणांस. तेणे समर्थचि केले पायी लागता. शब्देचि लाभती रत्ने। शब्दरत्ने अमोल की । कोंदणामाजि ते सोने। तैसा अर्थ प्रचितीचा । अखंड देव निर्मळु । तयास काय रे म्हणू । अचंचळासी चंचळू। म्हणेल कोण तो खळु ।। म्हणून आपण खळु, या पंक्तीत बसो नये. त्या पंक्तीत बसावे, जी पंक्ती अढळ आहे. अचल आहे. अर्थव आहे. त्या 'अर्थवशिषचि' शिर्ष-हे संकट निवारण्यासाठी-जाणून घ्यायाचे नी निश्चयी व्हायाचे आहे. किती सुंदर अशा या निश्चयाच्या सदनी दासरामाचा वाट पाहत आहे. निश्चयाचा महामेरु, अशा या मेरु पर्वतावरी निवास करणाऱ्याच्या सदनी श्रीगजानना या. आता हा कधीच अधःपतित होणार नाही. यास ती उंची कळली आहे. ती उच्चता-ती

उर्ध्वता उमजली आहे. सुखकर्ता-दुःखहर्ता-श्रीगणेशाची मंगलमुर्ती-शुभपद्मांची ती आनंदमुर्ती उमजली आहे. आता असा हा निस्पृह आपुला भक्त. सारे निवारोनी संकष्ट. आपली सदनी वाट पाहत आहे. म्हणून 'भजन' आवश्यक. भजन म्हणिजे स्वर पंक्तीवरील गीत नव्हे, तर जनांसाठी भजणे. भ म्हणिजे होणे-जनांसाठी जनांचे होऊन जनमंडल करणे. त्याकरीता सारे आयुष्य वेचिणे. देह त्यागिता किर्ती मागे उरावी.. असे सारे आयुष्य आपले व्हावे.

श्रीसमर्थ-या ग्रं मध्ये काय काय दडलेले आहे ते सांगत आहेत. १३ संकष्ट-आपणास तरी कुठे विदित होते हो. **परंतु श्रीसमर्थ कृपा जीवावर झाली नी 'त्या उदाराने' ही 'गुप्तता' लुटविली.** आपुल्या सर्व हितकार्यार्थ हे सारे आहे हे ध्यानी धरावे. हे सर्व पाहता आपल्या लक्षात एक गोष्ट निश्चितच येते की मुळारंभाशी हे अज्ञान-शंका-तर्क असले काहीही नाही. अज्ञान पाठी लागले कधी ते उमगेना झाले. अग्निपात्रात अग्नी जयाचे फुंकरीने फुलला-चेतला-ती फुंकरच विसरलो. म्हणून हे पाठी लागले सारे. आता अग्नी पुढे ठेऊन शपथा घ्यावयाच्या. स्वतःस ओळखायाला शिकायाचे त्या प्रकाशात. कोणी फुलविला हा अग्नी. कोणी चेतविला हा वन्ही. वन्ही तो चेतवावा रे..चेतविताचि चेततो..कीती त्या स्फुलिंगाचीही जाणिव. त्याची जाणिव. त्याबाबतचा जिव्हाळा. श्रीसमर्थांचे सर्वांवर प्रेम. पण तो वन्ही? कुठे आहे तो? तो वन्ही सांप्रत राखेखाली आहे. त्या वरच्या राखेवरच कुणीतरी फुंकर मारणारा हवा. इथे फुंकर 'घालणारा' असा शब्द नाही योजिला. कारण फुंकर जखमेवर घालतात. इथे जखम नाही. इथे राख आहे राख. ती उडविण्याकरीता फुंकर मारीलीच पाहीजे. इथे जन्मो न् जन्मीची ती राख उडविण्यासाठी फुंकर मारावयाची आहे. ती मारण्यासाठी तेवढाच ताकदीचा हवा. असा हवा की तो पुन्हा ही राख कधीच होउ देणार नाही. कशाचीच होउ देणार नाही. नी जीवाचे सोने करील. असा हवा आहे आपणांस..

**कोपला रुद्र जे काळी..ते काळी पाहावेचिना**
**बोलणे चालणे कैचे..ब्रह्मकल्पांत मांडला..**



..धर्मसंस्थापनेसाठी
दास तो उठीला बळे..

ब्रह्मांडाहून जो मोठा..सूळ उंच भयानकु..
पुच्छ ते मुर्डिले माथा..पाऊल शून्य मंडळा..
त्याहून उंच सव्य बाहो उभारिला..
त्यापुढे दुसरा कैचा..अद्भूत तुळणा नसे..
मार्तड मंडळा ऐसे..दोन्ही पिंगाक्ष लाविले..
कर्करा घर्डील्या दाढा..उभे रोमांच उठिले..
अद्भूत गर्जना केली..मेघचि वोळिले भूमी..
फुटले गिरीचे गाभे..तुटले सिंधु आटले..
अद्भूत वेश आवेशे..कोपला रणकर्कशु..
धर्म संस्थापनेसाठी..दास तो उठिला बळे..
भयाभीत ते कापती दैन्यवाणे..
बहु गांजिले दुःख ते कोण जाणे..
सुरांकारणे कोप भीमासी आला..
मनामाजि आवेश तो र्थथरीला..
रुपे र्भभरीला..तमे र्गगरीला..
प्रसंगी तये मारुती गुप्त जाला..
मनामाजि आवाकीले सर्वकाही..
सीमा सांडीली तुळणा त्यासी नाही..
बहु मातिले गर्व मोठ्या बळाचा..
तया झोडीतो दास मी राघवाचा..

सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी । करी डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनी । कडाडिले ब्रह्मांड धाक त्रिभूवनी । सुरवर नर निशाचर त्या झाल्या पळणी । दुमदुमले पाताळ उठला पड्शब्द । थर्थरीला धरणिधर मांडिला खेद । कडाडिले पर्वत उड्डगण उच्छेद । रामी रामदासा शक्तीचा शोध ।। कोण पाहिजे–कसा पाहिजे–कशासाठी पाहिजे–नी का पाहिजे. असा सर्व 'श्रीमंतयोगी श्रीश्रीमहाबली अंजनीकुमारांनीच' आता या अनंतजन्मांच्या राखेच्या ढिगाऱ्यावर फुंकर मारावि. तो वन्ही..तो वन्ही..जगत्कार्यासाठी–स्व–धर्मरक्षण–'विश्व स्वधर्म' रक्षणासाठी चेतवावा.

बाकी विचारच नको. **महाबली प्राणदाता । सकला उठवी बळे ।। असा तो श्रीगुरु. कोण शके नाकारु-तया नाकारिता अनर्थ । होई सार्थ नमता पदी।** आपण जाणायाचे हेंच, की हा वन्ही त्यांचा आहे. त्याची आपण राख केली. राखिता नाही आले आपणां वन्हिसी. अहंकाराने ती राख केली. ती राख उडविण्यासाठीच जीवास श्रीगुरुंचि आवश्यकता असते. त्याचे त्यास त्या राखेतून बाहेर येता येत नाही. येता येणारच नाही. तो त्यातच संपतो. याकरीता श्रीगुरुंचा श्रीचिमटा हवा तो स्फुल्लींग-तो वन्ही त्या राखेतून बाहेर काढावयाकरीताजी. श्रीकुबडी हवीच दंडस्वरुपी मर्यादा दर्शवायासीजी. श्रीचिलिमही हवीच तो वन्ही स्वये चेतवावा कैसा ते उमजावयासीजी. राखेतून जीवासी बाहेर काढल्यानंतर, तो भोपळाही हवाच, प्रथम तिर्थस्नान त्यातूनचि व्हावे जीवाचे या करिताजी. श्रीझोळीही हवीच प्रथमग्रास-उष्टावण हेतू-श्रीप्रसादप्राप्ती जीवासीजी. श्रीमुखीचे जीव मुखीजी. स्मरणिही हवीच पुन्हा माघारा नाही व्हायाचे याचे स्मरण राखण्या कारणेजी. नी श्रीगदाही हवीच रावणांपासून राज्य-स्वराज्य म्हणिजेच अहंकाराच्या बंदीवासातून स्वजीव सोडवून पुन्हा श्रीरामराज्य प्रस्थापन हेतूजी. श्रीगदाही हवीच हवीजी.

का आवश्यकता श्रीगुरुंची तर या सर्व हितार्थ गोष्टींकरीता. हे असे चालणे जर झाले, तर दुग्धशर्करा. नाही तर घरघर सर्वत्रा. जाणावे या सूत्रा. नी हे किती लवकर कळावयास-उमगावयास हवे बघा. हे बारशाच्या दिवशीच कळले-उमगले पाहिजे, की ८४ लक्षवेळा राख होऊन परत जीवाचे सोने कराया आलो आहोत म्हणून. नी नाही उमगले तर या बाराव्या दिवसानंतर जीवास लक्ष चौऱ्यांशीचा टप्पा कसा पुढे भेटतो ते बघूया-पहिला टप्पा-सातवे वर्षी नी बारावे वर्षी-१२ह्न७=८४. बारावे वर्षी तरी जागे व्हावे. की पुन्हा राख व्हायाची नसेल तर ती श्रीगुरुचरणे शोध. वन्ही चेतव. जाग..जाग स्वरुपी जाग. पुन्हा १४ह्न६=८४. पुन्हा चौदावे वर्षी हलविले..जाग जाग..चेतव चेतव..शोध शोध..१४ व्या अथवा सहाव्या वर्षीही ही जाग येण्याचे जीवाच्या भाग्यात आहे. ज्ञानजागृति-ज्ञानप्राप्ती होण्याचे भाग्यात आहे. पुन्हा २१ह्न४=८४. पुन्हा २१ व्यावर्षी कळले तर

काही हाताशी तरी आहे अजून म्हणावयाचे. पुन्हा चेतविले जाग..जाग..स्वरुपी जाग..पण अजूनही काहीच हालचाल नाही. अंधार जैसा आणिला तैसाचि तो आहे. हलला नाही इतुकाही. जागला नाही. घोर निद्रेकडे चालिला बाळ. अंतःप्रेरणा संपली. सोडीली वैभवाने-भाग्याने ती साथीसोबती. जाण बा पुढे नदी कष्टाची. थांब, करी विचार. शोधि रे स्वतःसी..विनवितो रामदासी परंपरेने. अरेरे अरे अरे, २८x३=८४. २८ व्यात कळले तर भलताच उशीर जाहला. दगड जमला आता. तो फोडणारा हवा. नाहीतर त्याचा अचळ असा कठीण असा पर्वत होईल. नी पर्वतांच्या राशी होतील. पापांच्या राशी. पुन्हा पुन्हा..पुन्हा पुन्हा राख. पुन्हा फुंकर..पाहा वाट..करा प्रतिक्षा..जनन-मरण हाच प्रवास. येऊनही परिक्रमा-प्रदक्षिणा नाहीच घडीली. अरे अठ्ठाविसाव्या. तू २८ युगे उभे असणाऱ्यास विसरु नकोस रे. तो केवळ तुझ्याकरीता नी तुझ्याकरीताच उभा आहे रे. तयाच्या समोरी एक क्षण उभा रहा रे. जाग..जाग..अरे द्विदशक पाहीलेल्या अष्टा. अरे अजूनी कशी ना जाग तुजला. उठ..जाग..बघ-पर्वताप्रमाणे पातक करणे । वज्रलेप होणे अभक्तासी । नाही ज्यासी भक्ति। ते पतित अभक्त । हरीसी न भजत दैवहत । उपजोनि करंटा नेणे अद्वैत वाटा । हरीविण धावया न पवे कोणी । ज्ञानदेव सांगे दृष्टांताची मात । साधूचे संगति तरणोपाय ।। धावाधावा..पळापळा..त्वरा करा..करा त्वरा..तातडी करा. तातडी करा. शोधा स्वतःला. शोधा श्रीगुरुंना. जागवा..जागवा.. जागा..जागा..स्वरुपी जागा. जागर..जागर..उदो..उदो..उदे..उदे..उघड..उघड.. दार उघड..कपाट उघड..गोंधळ..गोंधळ..खंडोबाजागर..आणा दिवट्या..जागवा बुधल्या..कोजागरति..कोजागरति..जागवा..जागवा..जोगवा..जोगवा..जोजवा.. जोजवा..आली आली मोहराती..जागराला बोलवा. एकट्याने नाही यावयाची जाग. एकट्यास नाही यावयाची जाग. एकटा नाही तेवढा समर्थ. त्या श्रीसमर्थास बोलिवा. त्यास आवाहन करा. आवताण करा त्यासी. सोडीव म्हणावे आम्हासी. या मोहरातीतूनी. उदे उदे उदे..देवा उदे उदे उदे..

कैलासीच्यामहारुद्रा..व्याघ्रावरील्या ऱ्हींक्लीं रुपा..

क्षीरामधिल्या चंडचामुंडा..महाभैरवारुद्राकाळा..

पाताळीच्या उत्पाटा या..उच्चटनाच्या जागरासी या..
या..ब्रह्मदेवा..व्यासदेवा..ब्रह्मर्षिस्थला..महर्षिस्थला या..
मुनिस्थला या..यति..जपी..तपी..स्थला जागराला या या..
स्वर्ग्लोकीच्या महद्भाग्या..इंद्रा भद्रा या या..या या..
गंधर्वांच्या स्वरमयि प्राणा..गंध-सुगंधा मधु मकरंदा या या..
सागर-सरिता वहनासह या..वृक्ष-पर्णा वायूसह या..
पंचबांधवा स्वयेचि या या या या..चतुर्थभाना जागवाया या..
या या ऐक्यांनो या..द्वितियेसह तृतियाही या..
या षष्ठदिव्या त्वरितचि या..सप्तभाना भानुबिबंवा..
झडकरी याहो..झडकरी या..जागवाया या या या..
अष्टदिक्-अष्टशशि-अष्टभाना-अष्टांगयोगा..
अंग-उपांगा-अष्टविनायका-अष्टतीर्था..
अष्टप्राणा-अष्टचित्कला-अष्टदिव्या-अष्टभुजा..
अष्टपर्णा-अष्टसात्विका-अष्टसौंदर्या-अष्टप्रेरणा..
सअष्टांगा-साष्टांगा-साष्टांङ्णांनो यावे यावे यावे गा..
जीवा चेतविण्या..जागविण्या गा, यावे..यावे..यावे..गा.
नवमरुद्रा भगिनीवर्गा तुरंगवहना लो लोगला यावे..यावे यावेगा..
जीव फुरफुरे विद्यावैभवे न दवडिता समयो यावे गा..
या या दशमस्कंधे-दशमस्थाने
हे कलिमलदहने वृषभे हर्षे येई गा स्वस्थले..
या हो या हो..ती शक्ती घेऊनी प्रवेशा हो..
एकादश माये वारा हो..वारा हो..सारी संकटे, तारा हो..
द्वादश आदित्ये या हो..उगवा हो..मनमंडल जागवा हो..
त्रयदशाक्षरे रक्षा हो..सोडवा हो..या हो..जीवासी जागवा हो..
मंत्र लपला गुप्तचि जाहला..रामरुप अंतरात्मा आपणातूनी हो.
त्रयदशाक्षरातूनी भरिला जो तो द्या हो..द्या हो..या हो..या हो..
या हो..कोण्यागुणे व्हाल प्राप्त, कोडे ते उकला हो..
चर्तुदशे येई गे..येई गे. तुज का गे ठेविले रिक्तचि गे..

कळले गे कळले गे..भान जागावे या हेतू गे..
पूर्ण पाहसी चंद्र नी पूर्ण पाहसी अमावस गे..
येई ना गे जाग..जीव घेई ना गे जाग..
त्या जागवाया तू राहसी गे रिक्त..
जीवीचे बाई हे आर्त जागवी जगदंब..जगदंब
जाग दे गे..जाग दे गे..उदे उदे उदे कर गे..
पौर्णिमा करीगे..दाविगे. पूर्ण शशिबिंब प्रतापी गे.
बाईये येई गे षोड्षदशे येई गे..सकला जागवित..येई गे..
क्षेत्रे विस्फाटीत पूर्णब्रह्म वेगी येई गे..
येई गे स्वरुपी लवलाही येई गे..सप्तदशे लृ लृ देई गे..
भान जीवीचे जीवासी देई गे.. अष्टादशे आकळी गे..
अंधार नेई विलया गे..दावी गे प्राणेश्वरे एकोनविंशे..
घे घे हे अजीर्ण करी गे अमुची वसने..
राखी गे धूत यांस श्रीरामकार्यासी जी प्राप्त..
ना नेई गे..ना नेई गे परतोनी ही ना नेई गे..
जागलो गे. अगे..जाणिये गे आईये गे भवानी गे..
वाढवी गे तुझ्या राजासी तुचि वाढवी गे..उदे उदे उदे
विंशे बाईये, जपी गे..जपी गे..जपी गे..ठेवा तुझा तू जपी गे..
घेई गे..घेई गे वसा ऐसाचि तू घेई गे..
उतणार नाही गे मातणार नाही गे..
घेतिला वसा टाकणार नाही गे..फुगडी फू गे..फुगडी फू..
हे एकविंशा धामी या हो.. धामी या..
श्रीसमर्था मुख्यप्राणा..जाग आली आम्हा स्वरुपा..
रुद्रा पंचप्राणा आर्या भास्करा प्रेमळा निर्मळा..
भाग्या सौभाग्या दिव्या प्रचंडा हनुमंता कपिवरा..
गजानना श्रीरामसमर्था हे हे मुख्यदेवा
पंचप्राणप्रिया जीवा जीवति करा
मुहूर्ता परमेश्वरा उत्कट उत्कल बिदुंद्भवा

प्रार्थितो सिंधूला या..उदे उदे उदे
जागलो जी..जागलो जी श्रीमरुतराया जागलोजी..
आता शनैश्वरे कृपाकरी..यमदिव्ये न दाखवी पुढति..
कर्मयुद्धे सारथ्ये केली..अश्वशक्ती रक्षिली स्वये..
धन्य धन्य गा आम्ही जीव..श्रीचरणे लाभली शिव..
आता नाही अज्ञानधाम..सोडोनी दिधले अज्ञानपर्ण..
आता ऐशा वृक्षी लागलो..जेथून केवळ पर्णफुटी..
संपली..श्रीगुरुराये संपविली..
फळदक्षिणदिशा आजि अमुची..

किती किती हे श्रीसमर्थांचे आपल्यावरील प्रेम आहे बघा. वाचा मौनावली नां आपलीही या पुढति. की आपण काहीच केले नाही श्रीसमर्थांसाठी..तरीही ही सोबत..अखंड सोबत..तरी ही पाठराखण. का? का? श्रीगुरुराया आम्हाला आता हे पाय नाही सोडायाचे. नाहीच सोडायाचे. दृढ झालो. द्या आशिष दृढतेचा या जीवासी.

२८ह्न३=८४, म्हणिजे ज्ञान या पायरीपर्यंत आपणांस लाभू शकते. म्हणिजेच ते सोबत करते. १२-१४-२१-२८ या सर्व टप्प्यांवरही ही श्रीज्ञानसोबत जीवास जाणिवेसह प्राप्त असते. उपलब्ध असते. तद्नंतरही असते. परंतु नानाविध जबाबदाऱ्यांमुळे त्यास ही सोबत कळत नाही. जीव मागे पडतो. त्यास साऱ्यांनाच जुळवून-साऱ्यांशिच मिळून-मिसळून-साऱ्यांनाच समजावून-समजून घेउन, पुढे जाता येणे अशक्य होते. जीवास या गुंत्यातून बाहेरच पडता येत नाही. तसा निर्धार केला तरी माया भ्रमतच ठेवते. नी परिणामी जीव थकून वृद्धत्वाकडे झुकतो. नी येथेच काळ त्याची वाट पाहात असतो. येथपर्यंत काळ गाठेल, अशी वेळ येऊ दिलेली नसते. पण आपण ती जाणलेलीही नसते नां. नी आता यापुढे ८४ चुकविण्यासाठी-८४ चुकविणारे-८४ चुकले-चुकावे म्हणून काही करु तर वय हाती नाही. नी ज्ञानही जवळ नाही. नी सांप्रतकाळी तर चित्र असे की या वरील सर्ववयांच्या टप्प्यात अध्यात्मातच कोणी येत नाही. नंतरच्याही वयात हेच असेच. याचक्रमानी. बघू-करु-काय घाई आहे. पुष्कळ आयुष्य पडले

आहे देव देव करायला. म्हातारपणच्या गोष्टी या. नी म्हातारपणी मग. त्रिविधताप आले झाकाळोनी. चंद्र व्हावो पांडूरंगा मन करा थोर. मधु मागसी माझ्या सख्या परी..मधुघटची रिकामे पडती घरी..ढळ ला रे ढळ लागूनी सखया..संध्याछाया भिवविती ह्दया..आता मधुचे नाव कासया..लागले नेत्र हे पैलतिरी..कशातूनही घ्या. अध्यात्माचे हेच सांगणे आहे की हित करुन घ्या. जाग येऊ द्या. कोण सोडविल. गुडघे-खांदे-कंबर-डोळे-कान-ह्दय-रक्त-डोके-काही काही जागेवर राहात नाही. उठली सर्वांची ठाणी. सोडीला ठाव साऱ्यांनी. आता या दुर्गुणांनी अंतरीला देवो. अहो सदासर्वदा यांजवळच बसावे लागते मग. नी आज डोके दुखते-. उद्या गुडघे-परवा सांधे हेच ते..हेच ते ८४ शी चे रडगाणे. लाजिरवाणे-केविलवाणे..

नसे आंथराया-नसे पांघराया । नसे धाम ना दृढ छाया निजाया।
नसे अन्न खाया । नसे रम्य जाया । वृथा सीण संसार करीती रडाया ।।
नसे द्रव्य काही । घरी धान्य नाही । बहू वेष्टीला काम-क्रोधादी देही ।
पराधिनता वेळ नाही मराया । वृथा सीण संसार करिती रडाया ।।
मना सारिखा मित्र तोही मिळेना । खरे सत्य ते ज्ञान पोटी वसेना ।
सदा कोप आरोप संतप्त काया । वृथा सीण संसार करीती रडाया ।।
मनासारीखा सोईरा ही मिळेना । मनी पाहता चित्तशुद्धी असेना ।
उणे बोलती सर्व काही छळाया । उगा सीण संसार करिती रडाया ।।
म्हणे दास हे आस कैची पहा हो । सुखाची बहू होतसे श्लाघ्यताहो ।
पुढे जाहली सर्व काया पडाया । वृथा सीण संसार करिती रडाया ।।

किती ते सांगणे. आपण हे सारे जाणिले म्हणिजे 'त्यांची' संतुष्टी. नी त्यांची संतुष्टी म्हणिजे आपली चुकलीच-संपलीच-ओटोपलीच संकष्टी. आपण ओळखणे हे सारे म्हणिजे 'ते' आनंदी. हे सारे सांगणे का तर, तो जीवाचा सीण निर्शावा म्हणून. भाग गेला शीण गेला..अवघा झाला आनंदु..आता कोठे धावे मन..तुझे चरण देखिलीया. म्हणूनच बारशातच पाळणा. ऐसा जोजवा की जाणा, ८४ लक्ष फेरे सात वेळा तू घेतिलेस. नी आता ही नरतनु तुज प्राप्त जाहली. आता तू या नरदेही आलास. आता

जाग. आता जाण. स्वरुप ओळख. 'वानर' हो नी कपिवरास जाण. जा भेट. राख उडविणारे-राखेवर फुंकर मारणारे, ते श्रीमुख. त्यांसच हा वन्ही दे. अरे त्यांना ही तु नाही म्हणतोस??? अरे बघ, श्रीगजाननमहाराजांसाठी एक विस्तवाचा खडा श्रीजानकीराम सोनाराकडून आणा असे श्रीबंकटलाल श्रींजवळ बैसिलेल्या मुलांस सांगतात. मुलेही तैसे करीतात. श्रीजानकीरामास विनवितात. विस्तव पाहिजे समर्थांस. असे ते सांगतात तेव्हा, जानकीराम अद्वातद्वा यथामती श्रींना बोल लावितो.

जिव्हा नामात भिजली असेल, एखाद्यातरी जन्मी तियेस नामाचा स्पर्श झाला असेल, तरच विवेक जागतो. भाग्याची संधी-भाग्याची वेला कळते. संधी उमगते. नाहीतर दुर्भाग्य आहेच सोबती. ते नेते ऐशापंथी, की जेथे दैव देते नी कर्म नेते ऐशी गती. ऐशी संगती. जानकीरामाची **भाग्यवेला आलीच होती हो रुजाया. पण कापली कर्माने.** त्याचे बीज सजग जाहले. पण याचे अहंकारे याने त्या मातीसी दूरी केले. जया सिंचनाने बीज अंकुरले असते..तेच दूरी केले. आधी बीज एकुले..बीज अंकुरले..रोप वाढले..ही प्रथाच, हा पंथच ठावकी नाही. वृथा सीण जननिस दिधला. नी कुणास हा विस्तवाचा एक-केवळ एक खडा नाकारला? तर त्यास. ज्यांनी हा जीवाचा स्फुल्लिंग चेतविला. ज्यांनी तो वन्ही राख नाही होऊ दिला. पेटता ठेविला. धगित नाही ठेविला. तर चेतिलेला ठेविला. चेतत ठेविला. विझविला नाही. विझू दिला नाही. स्फुल्लिंग रुप धरिलेला तो **इवलासा केशरीबिंदू.** ती ठिणगी, ज्याने रक्षण केली नी तुजसी अंश बनविले, त्या त्या श्रीकपिवरांना-श्रीसमर्थांना-श्रीमहाराजांना विस्तव देण्यास जानकीरामाने नुसताच नकार नाही दिला तर, बोललाही वाट्टेल तसे. तेव्हा ते समयी श्रीवदले, नाही आपणां प्रयोजन। मुळीच त्याच्या विस्तवाचे । ऐसे म्हणूनी घेते झाले । चिलीम आपुल्या हाती भले । बंकटलालासी बोलले । काडी एक वरती धरी । नी काय जाहले तर, वैश्वानरअग्निचे प्रगटीकरण जाहले. प्रगट जाहला वैश्वानर । काडी नुसती धरीता वरी । काडी प्रती विस्तवाचा। अंशही नव्हता साचा । हा प्रभाव शक्तीचा । महाराजांच्या लोकोत्तर । काडी तैसिच राहीली । चिलीम तीही पेटली । कशाचिही नाही उरली । गरज

खऱ्या साधूला । याचे नाव साधुत्व। उगा नव्हे थोतांड मत । नी इकडे जानकीरामाकडे काय झाले. तर श्राद्धघात झाला. श्राद्धावेळी केलेले चिंचवणे पूर्ण नासले. त्यात आळ्यांचा बुजबुजाट झाला. छी थू वाटली लोकांला. सारे पात्रावरोनी उपोषित उठीले. पात्र टाकोनी चालिले. तेव्हा डोक्यास हात लावला जानकीरामे. ललाटास चापसले-चाचपले. शोध-विचार झाला, नी कळले. सकाळी वन्ही मागायाला श्रीसमर्थ आले होते. मीच दिला नाही. तेणेच आहे झाला घात. माझा मीची दोषी. नी त्याने ते चिंचवणे श्रीसमर्थांपुढे आणिले. नी अनुतापे रुदन करीता जाहला..गजाननाची अगाध लीला । मी ना खचित जाणिली । गजानन जान्हवी नीर । मी त्या मानिले थील्लर। गजानन राजराजेश्वर । मी त्या भिकारी मानिले हो। त्रिकालज्ञ गजानन । मी त्या मानिले वेडा पूर्ण। कल्पतरु कारण मी बाभूळ मानिली । गजानन हा चिंतामणी । मी लेखिली गार जाणी । गजानन हा कैवल्यदानी । मी ढोंगी मानिला हो । हाय हाय रे दुर्दैवा । त्वां कैसा साधिला दावा । माझ्या करे संतसेवा। होवो ना तु दिलीस । मसी असो हा धिक्कार । मी भारभूत साचार । जन्म पावलो भुमीवर । द्वय पायांचा पशू मी । आज माझ्या भाग्यकाळी । बुद्धी कशी चळती झाली । सुयोगाची दवडीली वेळ आलेली म्यां करे । काही असो आता जाऊ । समर्थांचे पाय पाहू । पदी त्यांच्या अनन्य होऊ । क्षमा मंतूची मागावया ।।

कळले-उमजले-घडले. पण कधी? एक धक्का बसल्यावर. तत्पूर्वी नाहीच. एक संकष्ट आल्यावर. भोगिल्यावर. असे नकोच. हे ज्ञान नाही. ज्ञान निर्मळ आहे. निर्मळाचे ते आहे. निर्मळाने ते घ्यावयाचे आहे. त्यास कुठलेच कडे-कंगोरे नाहीत. दुःख-हाय हाय नाही. पण हे सारे जाणायासाठी, जे करणे ते वेळेवर. अरे वेळ गेल्यावरी कूप खणणे निरर्थक. १२ तच कळले पाहीजे. २८ पर्यंत ओढायाचेच नाही. **खरे ज्ञान हे लांब नाही. दूर नाही. अंतरावर नाही. तर जवळच आहे. आतच आहे. अंतरातच आहे. कारण ते देणाराच तर आत आहे नां. बाहेर तो व्याप्त आहे. परंतु अंतरात तो प्राप्त आहे ना. ते दिले टाकोन। व्यवहारी गोविले मन । याचेच करा सदा मनन। कशापासोनि जग झाले।।**

अशाश्वताचे पोषण । केले शाश्वता विसरुन ।। शाश्वतास विसरुन अशाश्वताचे पोषण करणारी, अशी या जीवाची ची ची-छी छी करणारी पाने नकोतच. कदापिही नकोत. ती हवीत तर अशीच..अशीच..अशीच..**हनुमंत आमुची कुळवल्ली । राममंडपी वेला गेली।।** अशीच हवी. हिच हवी. ते रोप लावियेले श्रीरामदासे. प्रतिपाळीले श्रीजानकीराये. सिंचियले श्रीशारदे रेवे.. शाखा..पल्लव बहरविले. मुक्तीयेचे मांगल्याचे जियेस घोस. मोतियांचे पर्णरव. हिर्मुजी रस..रुप..रंग. अंतरंगी जानकी. सुगंध कीर्ती विमल. प्राणस्वरुप अंतरंग. मोहर बहर श्रीनामाचा. झुले ब्रह्मांडाही वर झुला. असे हे पुर्णकुसुम श्रीरामदास्य..श्रीरामराये चरणी वोपियेले. श्रीरामरायपदी लावियेले. कुसुमाहूनी कुसुम कोमल भेटविले. श्रीगुरुराये कपिवरे..बीजासी भेटविले त्या वृक्षा. **हिच ती अनन्य अशी आपुली ग्रं रचना.** श्रीसमर्थरामदासस्वामिमहाराज-श्रीकपिवरमहाबलीश्रीहनुंमतराये-श्रीश्रीप्रगटोद्धारणश्रीगजाननमहाराज आपणांस उकलून सांगित आहेत. कथित आहेत. ते श्रीवक्ता नी आपण श्रीश्रोता. ते सुखकर्ता दुःखहर्ता. आपण तयांस प्रर्थिता. दासरामाचा वाट पाहे सदना.. या या..या या..या या. नी मग सुखासी..भाग्यासी..ओहोट हा नां शब्द उरलाजी.

ग्रं अजून पूर्ण झालेला नाही. त्यास खूप शाखा नी पल्लवांचा बहर आहे. तो सारा रसपूर्ण उमजून घेतिला, की मग आपण त्या कुसुमापासी जाणार आहोत. नी ते सुगंधवहन-दिव्यवहन-ते वायूवहन त्या श्रीवायुपुत्रांकडून उकलून घेणार आहोत. नी आपल्या अनंतजन्मींचे आयुष्य उपवन सुगंधित करणार आहोत. **तोपर्यंत विश्रांती घेणार नाहीच...**

**श्रीसमर्थ रामदासस्वामी महाराज कृपेकरुन ग्रं या एका अक्षराची उकल केवढी झाली आहे बघा. नी अजुनही या अक्षराची उकल पुर्ण झालेली नाही. ग्रं ची अधिक गुढरम्यता पुढीले पुस्तकात जाणून घेउ.**

**..राजाधिराज श्रीरामचंद्र भगवान की जय..**

**..महाबली अंजनीकुमार की जय..**

**..जय जय रघुवीर समर्थ..**

**..सद्‌गुरु समर्थ श्रीश्रीगजानन महाराज की जय..**

**...जय गजानन...**



# ..श्रीमद्‌चंडचंडांशु महाप्रागट्य श्रीनवमशाबर्य..



# ..आमुची इतर प्रकाशने..
















संपर्क-मैत्रेयी-९८५०४३४५५७,९८२२६६०९७६

